आंतरभारतीय पुस्तकमाला

# नीलशैल

सुरेन्द महान्ति

अनुवाद

वसुधा माने




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# भूमिका

ओरिसाच्या सांस्कृतिक व आध्यात्मिक इतिहासात जगन्नाथाचे स्थान सर्वश्रुत आहे. कोणत्याही विशिष्ट धर्माने, संप्रदायाने किंवा असल्याच संकुचित मतमतांतराने जगन्नाथ बद्ध नाही. शबर विश्वावसूपासून ते आर्य इंद्रद्युम्न, शैव शंकराचार्य, पंचरात्रिक रामानुज, शुद्ध भक्तिवादी श्री चैतन्य महाप्रभु, शून्यवादी बलराम, जगन्नाथ व शीख धर्मगुरू नानक या वेगवेगळ्या संप्रदायांच्या लोकांना श्री जगन्नाथ सारखाच प्रिय आहे. श्री जगन्नाथाला बौद्ध महाबोधिसत्त्वाच्या रूपात पाहतात व त्याची आराधना करतात कारण तो बौद्ध–दंत–गर्भित आहे, अशी त्यांची समजूत आहे. मुस्लिम सालबेग आणि यवन हरिदास सारख्या त्याच्या भक्तांनी देखील अनेक मर्मस्पर्शी ‘जणाण्या’नी त्याची आराधना केलेली आहे. खरोखर, कुणाही मानवाचे श्रद्धास्थान म्हणून जगन्नाथाचे स्थान जसे अद्वितीय आहे तसाच तो उदार व सगळ्यांना पोटाशी धरणारा उदारधी विराटही आहे.

प्रत्येक ओडिया माणसाच्या अंतरंगात श्री जगन्नाथाला एक श्रद्धायुक्त स्थान आहे. ही त्याला जाणवणारी श्रद्धा म्हणजे त्याच्या पदस्पर्शाने पवित्र झालेला बुक्काच म्हणा ना. यात त्याची भक्ती, पूजा किती हा प्रश्न गौण आहे. श्रद्धाच प्रमुख. जगन्नाथाइतका ओडिया जातीचा अंतरंग–सखा, हितचिंतक, कळकळीचा दुसरा कुणीही नाही. महाराष्ट्रात पंढरीच्या विठ्ठलाचे जे स्थान तेच ओडिसात श्रीजगन्नाथाचे म्हणूनच श्रीजगन्नाथाचे मंगल स्मरण करताच ओडिया गृहस्थाच्या साऱ्या विपत्ती, भयभीती दूर होतात. ओडिया माणूस जगन्नाथाला "काळतोंड्या" म्हणून शिवीही देतो. तितक्याच प्रेमाने "जगाचा उद्धारक" (जगा–बलिआ) म्हणतो. "काळसर्प" म्हणून रागावतो, त्याची रथ–यात्रा निघतेवेळी त्यांच्या मूर्तींना उचलतो, खाली आदळतो......हेही सगळे ओडिया माणसाच्या दृष्टीने श्री जगन्नाथाच्या भक्ति–पूजेतच मोडते. जगन्नाथाकडे अशा प्रेमळ दृष्टीने पाहण्याची ही परंपरा फार जुनी आहे. बहुधा जगन्नाथ शबरी–नारायण होता आणि शबरांच्याकडून पूजा–अर्चा ग्रहण करत होता तेव्हाची.

वस्तुत: जगन्नाथाजवळ देवता माणसं बनली तर त्याच्या प्रवेशद्वारांशीच माणसांनी देव बनले.

## 2

हे सर्वांना ठाऊक असलेलंच मी पुन्हा म्हटलं आहे. पण उत्कल साम्राज्याच्या राजनैतिक इतिहासात जगन्नाथाचे जे महत्त्वपूर्ण स्थान आहे त्याबद्दलची चिकित्सा फारशी कुणी केल्याचे दिसत नाही. जगन्नाथ फार प्राचीन काळापासून उत्कलची राष्ट्रदेवता म्हणूनच स्थान पटकावून आहे हे सगळ्यांना माहीत आहे. पण "मादला–पांजि" पाहता अनंगभीम देवापासून उत्कल साम्राज्याच्या सिंहासनावर कुणाही सम्राटाला राज्याभिषेक करायची प्रथा नाही. "मादला–पांजि" म्हणजे अकराव्या शतकापासून जगन्नाथ–मंदिर, गजपति राजा व समाजपरिस्थिती यांची कालानुक्रमाने केलेली नोंद व विवेचन. ही नोंद म्हणते, "एहांक (चूडगंग) पुअ (पुत्र) अनंगभीम देव एहांक इच्छारे कहिले आम्भ नाआं पुरुषोत्तम देव। ए नगर कर के थाइ श्री पुरुषोत्तम देव श्री जगन्नाथ देवं कु समस्त सर्मापि राऊतपणे था आंति........ओडिसा राज्य राजा श्री जगन्नाथ महाप्रभू एमंत कहि अभिषेक नोहिले।" (चूडगंगाचा पुत्र अनंगभीमदेव आपल्या इच्छेनुसार म्हणाला की आम्ही राजे नव्होत. या नगराचे राजे श्री जगन्नाथ आणि इतर त्यांचे सेवक. ओडिसा राज्याचे महाप्रभु म्हणून श्री जगन्नाथालाच अभिषेक. एरव्ही नाही.)

सूर्यवंशी सम्राट देखील गंगेपासून गोदावरीपर्यंत पसरलेल्या विस्तृत उत्कल साम्राज्याचे अधीश्वर श्री जगन्नाथ आहेत असेच मानीत होते. म्हणून त्यांच्या वेळी प्रत्येक राष्ट्रीय महत्त्वाची घोषणा श्री जगन्नाथाच्या समोर त्याला साक्षी ठेवून होत असे. जगन्नाथ–मंदिराच्या जय–विजय द्वारावरचे शिलालेख याचे प्रमाण देतील. उत्कल साम्राज्याच्या सीमांचे रक्षण करण्याकरिता श्री जगन्नाथ आपले रत्नखचित सिंहासन व तिथले षोडषोपचार सोडून कांची विजय–यात्रेच्या वेळी स्वत: सामान्य सेवकाच्या रूपात कामगिरीवर निघाले होते; आणि या एका घटनेने पुरुषोत्तम दासाच्या "कांचि-कावेरी" या काव्यापासून ते ओडिया साहित्यातील कितीतरी कथा–नाटकांना स्फूर्ती दिली आहे. या कांचि–यात्रेची चित्रं काढली नाहीत तर ओडिया चित्रकारांना जणू आपल्या कथेचे सार्थक झाले असे वाटत नाही.

सोळाव्या शतकात ओडिसाचे स्वातंत्र्य संपुष्टात आले व ते मोगल वर्चस्वाखाली गेले. तरीही अकबराचे सेनापती राजा मानसिंहाने श्री जगन्नाथासाठी खोर्ध्याचे राजनैतिक स्वातंत्र्य मान्य केले, व अशी घोषणा केली की : " ओडिसाची भूमी माणसांच्या उच्चाकांक्षा, एकमेकांवरचे विजय–पराजय यासाठी नाहीच आहे. ती देवभूमी आहे. ओडिसाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत ही समस्त मानवजातीचे तीर्थस्थान आहे. "

(स्टर्लि)

" कपिल–संहिते "तही ओडिसाचे वर्णन " सर्वपापहरं देशं क्षेत्रं देवैस्तु कल्पितम् " असेच आहे. उपकथेतल्या रक्तबाहूच्या आक्रमणापासून ते इतिहासात वर्णन केलेल्या मोगल सेनापतींनी उत्कलवर केलेल्या अनेकानेक हल्ल्यांपर्यंत कुठल्याही आक्रमणापासून श्री जगन्नाथ स्वतःला वेगळे ठेवू शकले नाहीत. दर वेळी त्यांना स्वतःचे रक्षण करण्याकरता कुठेतरी लपून बसावे लागे. आणि तसे करून त्यांनी उत्कलच्या स्वातंत्र्य-संग्रामाला दर वेळी प्रेरणाच दिली. जगन्नाथाप्रमाणे ओडिसाचा आत्माही प्रत्येक संघर्षात अजेयच राहिला. ओडिसाच्या जनमानसातले श्री जगन्नाथाचे हे असाधारण स्थान जाणूनच ओडिसावर कबजा केल्यावर देखील फोर्ट–विल्यम मधून ईस्ट इंडिया या कंपनीने खालील घोषणा केली होती की :

" It has been the anxious solicitude and desire of the commissioners founded upon the express orders of His Excellency the Most Noble Governor-General that no interference or intervention should be experienced at the Pagodah of Juggernath by any act of their authority. "

3

अठराव्या शतकात खोर्ध्याच्या भोइ राजघराण्यातला एक राजा दुसरा रामचंद्र देव मुसलमान झाला होता आणि हाफिज कादर बेग या नावाने प्रसिद्ध होता. मुसलमान झाल्यावर देखील कटकच्या हिंदुद्वेषी नायब नाजिब तकीखांच्या आक्रमणापासून जगन्नाथाचे रक्षण करण्याकरता आणि उत्कलचे स्वातंत्र्य अबाधित ठेवण्यासाठी विश्वासघात, स्वजनांचे कपटाचरण आणि लोकापवाद हे सर्व सोसूनही मुसलमानांशी

त्याने जो सामना दिला तो जसा रोमांचकारी आहे तसाच प्रेरणादायीही आहे. " मादला–पांजि "मध्ये याचा उल्लेख आहे. गेल्या शतकात पुरी राजघराण्यातल्या महाराणी सूर्यमणि पाट महादेईने राजा मुकुंददेवाला मान्यता देण्याकरता इंग्रजांना जे निवेदन केले त्यातही हाफिज कादरचा उल्लेख आहे.

" As a precedent I take the liberty to bring to your notice that one of my ancestors named Rajah Ramchandra Deb who ascended the throne in 1660 Sakabda (1725 a. d.) having been compelled to associate with a daughter of the then Mohammedan Noble was not allowed to perform the services of Jagannath or to enter the Temple and as he expressed his desire to worship the idol of Patitpaban Dev, a representative of Jagannath was set up at Singhaduar (the Lion Gate of the Temple) in order that the fallen Raja might be able to see and worship it from outside. "

रामचंद्र देव हाफिज कादर बेग झाले तरी श्री जगन्नाथावरची त्यांची श्रद्धा व भक्ती कमी झाली नाही. त्यांना मंदिरात जाता येत नव्हते पण त्यांना दर्शन घेता यावे, जगन्नाथाची सेवा करता यावी म्हणून सिंहद्वाराबाहेर जगन्नाथाची पतितपावन मूर्ती स्थापन झाली होती.

जाति–धर्म संप्रदाय यांपासून मुक्त असलेल्या, सर्वांना सारख्याच पूजनीय असलेल्या श्री जगन्नाथाचे रक्षण करण्याकरता हाफिज कादर बेगने केलेल्या संग्रामावर प्रस्तुत कादंबरी आधारलेली आहे.

रामचंद्रदेवाच्या दुःखदायक एकाकी संग्रामातला हा फक्त एक अध्याय आहे. तकीखांच्या धर्मांध आक्रमणापासून उत्कलच्या इष्टदेवतेचे – जगन्नाथाचे रक्षण व्हावे म्हणून रामचंद्रदेवाने (हाफिज कादरने) त्याला चिलिका प्रांतातल्या कोनाकोपऱ्यापासून ते आठगड (गंजाम) च्या मेरदा जंगलापर्यंत – किती ठिकाणी लपवले असेल; आणि श्री जगन्नाथाबरोबर स्वतःही एखाद्या चोरदरोडेखोरासारखे लपून राहिले. शेवटी धर्मांध तकीखां हरला. तो जगन्नाथाला साधा स्पर्शही करू शकला नाही. त्यामुळे खोर्धा राज्यही अजिंक्य राहिले. पण या सगळ्या इतिहासाचे चित्रण करणे हा काही या कादंबरीचा हेतु नाही; म्हणून (या दृष्टीने) ही अपूर्ण वाटायचा संभव आहे. पण तसं तर काय, जीवनाप्रमाणेच कलाही अपूर्णच आहे. खुद्द श्रीजगन्नाथाची मूर्तीही अपूर्णच आहे. त्यातच त्याची मधुरता असावी. कलेच्या क्षेत्रातही हाच नियम दिसून येतो.

## 4

ओडिया साहित्यात फकीरमोहनच्या नंतरच्या काळात ऐतिहासिक कादंबऱ्या अगदी वैभवाच्या शिखरावर होत्या म्हणा ना, पण 'लछमा'नंतर बरंच दुय्यम दर्जाचं साहित्यच निर्माण झालं. म्हणजेच ते असून नसल्यात जमा. अशा एकंदर पार्श्वभूमीवर मी अठराव्या शतकातल्या राजनैतिक इतिहासावर आधारित ऐतिहासिक कादंबरी लिहिणं एक धारिष्टच आहे याची मला जाणीव आहे. यात मी यशस्वी झालो आहे किंवा नाही हे सूज्ञ वाचकांनीच ठरवायचं आहे.

या कादंबरीतील तकीखां, रामचंद्रदेव, बक्सी वेणु भ्रमरवर, दिवाण कृष्ण नरींद्र, रजिया, ललिता महादेई वगैरे ऐतिहासिक व्यक्ती आहेत. अकराव्या शतकापासून श्री जगन्नाथाचे मंदिर, उत्कलचा राजवंश व एकंदर उत्कलची समाजपरिस्थिती याबद्दलचे लेखन उपलब्ध आहे. तिला मादला–पांजि म्हणतात. उत्कलच्या ऐतिहासिक साधनात ते प्रमुख आहे. तर वरच्या व्यक्तींचा नामनिर्देश त्यांत व इतर ऐतिहासिक कागदपत्रांत मिळतो. बरेच इतिहाससंशोधक दुसऱ्या रामचंद्रदेवाला नायब–नाजिब मुर्शीद कुलीखांच्या काळातला गणतात. पण 'मादला–पांजि'नुसार महंमद तकीखां व रामचंद्र देव समकालीन आहेत; मी तोच कालक्रम ग्राह्य धरला आहे. नाहीतरी इथे इतिहासाचे स्थान मुख्य नव्हेच.

येथे प्रमुख आहे उत्कलच्या इतिहासातले सर्वंकष दुष्काळातही उठून दिसणारे उत्कलच्या कधीही न नमणाऱ्या, अजिंक्य अशा प्राणशक्तीचे चित्रण. उत्कलच्या आत्म्याने प्राणपणाने दिलेला हा लढा कुणा एका धर्माविरुद्ध, जातीविरुद्ध किंवा देशाच्या कुणा शत्रूविरुद्ध नाही आहे. मानवजातीच्या शत्रूशी दिलेला हा एकाकी, दु:खवेदनांनी ओथंबलेला, जातिधर्म–संप्रदायापासून मुक्त असा आदर्शनिष्ठ, अभूतपूर्व संग्राम आहे. खरं तर अभूतपूर्व कसा म्हणावा ? कारण प्रत्येक युगात या संग्रामाने भिन्न भिन्न रूपं धारण केली आहेत. माझ्या 'अंध–दिगंत' कादंबरीतही हीच मर्मस्पर्शी कहाणी आहे.

सतराव्या अठराव्या शतकातील ओडिसाचे सामाजिक व ऐतिहासिक वातावरण कादंबरीत उभे करण्यासाठी मी तत्कालीन अनेक शब्द बुद्धिपुर:सर वापरले आहेत. एरव्ही सर्व ठिकाणी जरी नव्हे तरी आजही ते शब्द जगन्नाथाच्या मंदिरात प्रचलित आहेत. हे प्राचीन शब्द किती समर्पक आहेत, किती विशुद्ध ओडिया आहेत व त्यांचा

पुनरुद्धार तसेच पुन्हा वापर ओडिया भाषेला किती समृद्ध करीत आहे याचे हे उदाहरण म्हणता येईल.

अशा तऱ्हेची कादंबरी लिहिण्याची कल्पना प्रथम माझ्या मनात नव्हती. पण १९६४ मध्ये रथयात्रेच्या वेळी मला अगदी जवळून पहंडी (देवमूर्तींची मिरवणूक) पहायला मिळाली. जगन्नाथ समस्त ओडिया जातीचे पंचप्राण आहेत हे त्यावेळी त्या जनसमुद्रात मला जाणवले. रथयात्रेचे ते संपूर्ण दृश्य अखिल विश्वात प्रेरणादायी व सर्व मानवजातीला एकत्र आणणारे गौरवशाली चित्र ठरेल. त्याचवेळी कादंबरीतली बलदेवाची पहंडी, तिन्ही ठाकुरमूर्तींचे फुलांचे मुकुट, शंखशिंगांचा नाद व घंटांचा आवाज माझ्या मन:चक्षूसमोर जणू जिवंत झाला. इतिहासाची जखमांकित अंगं आणि उत्कलचा अजेय आत्मा यांचं मला दर्शन झालं. त्या दिवशीची ती अद्भुत प्रेरणा म्हणजेच "नीलशैल." वाचकांनाही माझ्याप्रमाणेच या कादंबरीच्या पृष्ठापृष्ठातून उत्कलच्या उज्ज्वल आत्म्याचे दर्शन घडल्यास मला धन्य वाटेल.

—सुरेन्द्र महान्ति

# प्रस्तावना

ओडिया कादंबरीच्या विकासातली प्रथम कादंबरी म्हणजे "पद्ममाली" (1888). ती काय किंवा तिच्या नंतरची "विबासिनी", "लछमा" या सर्वांत जो थोडाबहुत इतिहासाचा वास दिसतो त्याला कारण त्या त्या वेळची भारतातली राजनैतिक व आर्थिक परिस्थिती कारणीभूत झाली होती यात शंका नाही. ओडियाच काय सगळयाच भारतीय भाषांतला हा काळ म्हणजे ऐतिहासिक कादंबऱ्यांचा अभ्युदय काळ असावा. त्यावेळी ओडिया भाषेत वर निर्देश केलेल्या कादंबऱ्यांशिवाय 'कमलकुमारी', 'वीर ओडिआ', 'पद्मनी', 'बलागी', 'प्रतिभा', आणि 'सीमांत आव्हान' वगैरे सुमारे पन्नासेक ऐतिहासिक कादंबऱ्या प्रकाशित झाल्या.

स्वातंत्र्योत्तर काळात नवीन आकांक्षा, नवे शोध बोध, वाढत्या अपेक्षा व त्यानुसार प्राप्त होणारे हर्षखेद वगैरेमुळ भारतीय कादंबऱ्या समाजोन्मुख बनल्या. समाजातील विविध प्रश्न, त्याचे यथार्थ चित्रण व एकंदरच समाजमनाचा शोध घेण्यात ती जास्त गुंतली. आंतरराष्ट्रीय कादंबऱ्यांतून जसे वेदनाविह्वल, निःसंग मानवाच्या कठोर जीवन-संग्रामाचे चित्रण आढळते तसेच चित्रण भारतीय कादंबऱ्यांतूनही आढळून येऊ लागले तर नवल काय ! आजच्या काळात पूर्वीची मूल्ये धडाधड कोसळून पडताहेत, तरुण मनाला 'पूर्व दिव्य' असलेला इतिहास किंवा आस्तिक्य भावनेने भरलेला, भक्तीने भारलेला दैवतांचा इतिहास आकर्षित करू शकत नाही. व ती 'हिप्पीझम्'च्या नास्तिकतेकडे दिवसेंदिवस जास्त झुकताहेत; अशा परिस्थितीत "नीलशैल"सारखी भक्तिरस–मिश्रित ऐतिहासिक कादंबरी लिहावीशी वाटणे ही गोष्टच सुरेन्द्र महान्तींच्या स्वतंत्र आणि निर्भीड दृष्टिकोणाची द्योतक आहे. "नीलशैल" केवळ ओडिया भाषेतच नव्हे तर इतर भारतीय भाषांतही लोकप्रिय झाली. त्यामुळे मुद्दाम या स्वतंत्र दृष्टिकोणाचा परिचय करून द्यावासा वाटतो.

लेखकाची दुसरी कादंबरी "अंध–दिगंत" आणि ही "नील शैल" यांचे मूळ लेखकाच्या पहिल्या कथेत – 'बंदी' (उत्कल साहित्य 1938–39)त दिसते. पण कथाकाराचा पिंड असूनही त्यांची प्रतिभा निव्वळ कथालेखनात समाधान मानणारी नव्हती. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात जी अनेक सामाजिक संक्रमणे झाली त्यांचे परीक्षण निरीक्षण करून त्यांवर पोसून महान्तींच्या कथांनी ओडिया साहित्याचे कथा–

दालन समृद्ध केले. साहित्यात संक्रमण येऊ घातले आहे अशा वेळी आत्मचरित्र, कादंबरी इत्यादि (विशाल पट असलेल्या) साहित्यप्रकारांकडे त्यांची सर्जनशक्ती वळली आहे. चिरंतन साहित्याचा मुख्य गुण म्हणजे त्याच्या ठायी असलेली 'भावोद्रेककारी शक्ती' व मानवाच्या अंगच्या टिकून राहण्याच्या, आव्हान स्वीकारण्याच्या सुप्त प्रवृत्तींना (evocative aspect) जागृत करणे या दोन्ही गोष्टी महान्तींच्या साहित्यात दिसतात. 'अंध–दिगंत' व 'नील–शैल' यांचे अंतर्गत विषय म्हणजे मानवाच्या चिरंतन संग्रामाचा वेदनांनी ओतप्रोत भरलेला, करुण विह्वळणारा आलेख. या दोन्ही कादंबऱ्या वाचताना वाचकाच्या मनात वर वर्णन केलेला आलेख जो भावभावनांचा कल्लोळ उसळवतो तोच दोन्ही कादंबऱ्यांची सार्वकालिकता ठरवण्याचा मापनदंड होय.

"नीलशैल" सर्वसाधारणपणे भक्तिरसात्मक ऐतिहासिक कादंबरी समजली जाते. हे झाले तिचे बाह्य किंवा वरवरचे स्वरूप. खरं तर हिच्यात आढळते निरंतर संग्रामात मग्न असणाऱ्या माणसाच्या अविनाशी आत्म्याची लिपी. या संग्रामात आवश्यक असणारी अतूट श्रद्धा इथे भक्तीच्या रूपात प्रगट झाली आहे. मानवाच्या अजिंक्य आत्म्याची चाहूल इथे महासंगीत बनून गुंतले आहे म्हणून येथे इतिहास गौण आहे.

"नील–शैल"चे कथानक सतराव्या किंवा अठराव्या शतकात घडते आहे. याचवेळी खोर्ध्याच्या भोइवंशातला दुसरा रामचंद्र देव धर्मांतरित होऊन हाफिज कादर बेग बनला होता; आणि तरीही कटकच्या हिंदुद्वेषी नायब–नाजिम तकीखाँच्या आक्रमणापासून उत्कलचे व उत्कलचा अंतरंग–प्राण जो श्री जगन्नाथ त्याचे रक्षण करण्यासाठी झटत होता. त्याच संग्रामाचे चित्रण म्हणजे प्रस्तुत कादंबरी. "नील–शैल" यांतील तकीखाँ, रामचंद्र देव, वेणु भ्रमरवर, दिवाण कृष्ण नरींद्र, रजिया आणि ललिता महादेवी ही ऐतिहासिक पात्रे व जगुनि, सरदेई, सान परीछा (छोटे पुजारी) विष्णु पश्चिम कपाट महापात्र वगैरे काल्पनिक पात्रे यांद्वारा उत्कलच्या दुर्दिनांचा करुणरम्य गोफ लेखकाने विणलेला आहे. इतिहासात दिसणाऱ्या अनेक जखमांनी अंकित असलेल्या उत्कलच्या अजिंक्य आत्म्याचे दर्शन म्हणजे "नील–शैल."

ऐतिहासिक कादंबरीत देखील इतिहास असतोच. तेव्हा इतिहासाची साधने असलेले मादला–पांजि सारखे ग्रंथ, जनश्रुति, दंतकथा वगैरेंचा उपयोग करून लेखकाने चिलिका सरोवराच्या प्रांतातील एकाकी पाइक वस्ती, सरदेइची धर्मशाळा, किंवा शून्यगिरी बंदर, गुरुबाई टापू वगैरेंची यथार्थ वाटण्याजोगी वर्णने केली आहेत; तसेच अनेक घटनांची मालिका गुंफून त्यातून जो जीवनाचा स्रोत खेळविलेला आहे त्यामुळे आख्यायिका, दंतकथा यांच्या कितीतरी वर ही कथावस्तू जाऊन पोचते. त्या सर्वांचा तपशीलवार परामर्ष घेणे येथे शक्य नाही. सबंध कादंबरीत कथानक व घटना एवढ्या

खऱ्याखुऱ्या स्वाभाविक वाटतात की त्यामुळे कादंबरीला खरेपणाचे मूल्य प्राप्त होते एवढे सांगितले म्हणजे पुरे. यातल्या लहानमोठ्या सर्व व्यक्ती व कथावस्तूभोवती गुंतलेली त्यांची व्यक्तित्वे आणि त्यांची होणारी मानसिक स्पंदने किती जिवंत आहेत हे रामचंद्र देव, जगुनि, सरदेई आणि मालकुदा गावची वेडी पाइकीण यांसारख्या काही पात्रांवरून सिद्ध होते.

कादंबरीचा नायक रामचंद्र देव प्रथमपासूनच संघर्षात आकंठ बुडालेला आहे. पुरीमध्ये श्री जगन्नाथाच्या मंदिरासमोर आक्रंदून मनाची व्यथा सांगत गाऱ्हाणे घालणारा म्हणून, निर्जन घोर रात्रीच्या वेळी स्वर्गद्वारापाशी आलेल्याच्या स्वरूपात त्याचे धाडस व भक्तीने भरलेला अभिमान स्पष्ट दिसतो. मधून मधून येणाऱ्या काही परिच्छेदातून तो बुद्धिबळाचा डाव मांडून बसला आहे. त्याचा कौशल्यपूर्ण उपयोग करून त्याच्या ठायीचे वरचे गुण अधिक उघड केलेत; त्याच्या व्यक्तित्वाची ही बाजू अधिक वेदनाविह्वल केली आहे. ज्या रीतीने हा धीरोदात्त नायक देश व देव सुरक्षित ठेवण्यासाठी घरच्या व बाहेरच्या शत्रूंबरोबर विश्वासघात, हीन स्वार्थ व नीच कारस्थानामध्ये राहूनही एकाकी लढा देतो त्यात व आधुनिक काळातल्या मानवाच्या यंत्रांच्या प्रभावाने हृदयशून्य बनलेल्या समाजस्थितीशी चाललेल्या मुकाट लढ्यात काहीही फरक नाही. म्हणून यातील भूतकाळाचे चित्रण केवळ भूतकाळापुरतेच मर्यादित नाही. त्याची सीमा वर्तमानातही येऊन घुसते. ज्याप्रमाणे हॅमिंग्वेच्या **The Old Man and the Sea** चा नायक प्रत्यक्षत: समुद्राशी झगडतो पण खऱ्या अर्थाने त्याचा झगडा अंतहीन जीवनाशी असतो म्हणजेच कधीही न संपणारा असतो; त्याचप्रमाणे सुरेन्द्र महान्तीचा रामचंद्र देव एक सार्वकालिक लढा लढत असतो. या लढ्यातल्या सर्वग्रासी नैराश्यातही आशेची जी एक क्षीण रेषा दिसते ती मानवाच्या शाश्वत प्रेरणेप्रमाणे आहे. म्हणून उत्कलचा मागासलेपणा, सगळी संकटे, संशय, प्रेम वगैरेच्या पार्श्वभूमीवर हे पात्र धीरोदात्त व आकर्षक वाटते. धर्मांतरित आणि म्हणून समाजाने त्यागलेला रामचंद्र देव भर मध्यान्ह रात्री तळपणाऱ्या एकट्याच नक्षत्राप्रमाणे संपूर्ण रिक्त होतो. तरीही पराक्रमाचा, पौरुषाचा अभिमान, गौरव त्याच्या ठायी अविचल राहतो; असे हे पात्र निर्माण करून लेखकाने सध्याच्या युद्धमग्न विश्वाबद्दलची आपली आशा व निष्ठाच दाखवून दिली आहे. "शब–इ–रात"च्या मुहूर्तावर त्याचे व रजियाचे प्रथम मीलन झाले तेव्हा त्याच्या मनात हजारो हजार वेदनेने भरलेले विचारतरंग उठले; त्या मानसिक कल्लोळाने ग्रस्त होऊनही रामचंद्र देव अविचलच राहतो. खरं तर, मानवाची चाललेली अव्याहत जीवनयात्राच रामचंद्र देवाच्या माध्यमातून या कादंबरीत वर्णिलेली आहे.

राष्ट्रीय अभिमान हा रामचंद्र देवाचा उल्लेखनीय गुण आहे. चिलिका प्रांतातल्या गुरुबाई बेटावर श्री जगन्नाथाची स्थापना केल्यावर रामचंद्र देव जे बोलतो त्यातून होणारी राष्ट्रीय भावनेची अभिव्यक्ती मोठी सहजसुंदर आहे.

थोडक्यात सांगायचे म्हणजे रामचंद्र देव भक्ती, वीर, देशप्रेम, त्याग व कर्तव्यदक्षता या सर्व गुणांची मूर्ती म्हणूनच या कादंबरीत वावरतो आहे. लेखकाने त्याच्या स्वभावाचे अनेक बारकावे, त्याचे मानसिक कल्लोळ उत्तम प्रकारे वर्णिलेले आहेत.

रामचंद्र देवाच्या भूतकाळाच्या या वास्तव चित्रणाचा त्याच्या भावनाशील प्रबुद्ध, तत्त्वज्ञानी मनाशी सांधा जोडण्यात लेखकाने असामान्य कौशल्य दाखविले आहे. करुणा म्हणजे जिज्ञासा व अनंत नैराश्य यांचा आतला आवाज हे तर खरेच; पण हे पूर्ण सत्य नव्हे. मानवाच्या आशानिष्ठ जीवनाची ती अव्यक्त लिपी आहे. धर्मांतर केल्यावर रामचंद्र देवाने स्वत: उपस्थित केलेल्या प्रश्नांना जी उत्तरे स्वत:च दिली आहेत त्यांच्यात त्याची ओळख पटते. इतिहासाला कदाचित् त्याचा परिचय धर्मद्रोही हाफिज कादर बेग किंवा दुर्बळ मनाचा रामचंद्र देव असा असेल; पण इतिहासाच्याही वर जे कोणी आहे त्याच्या सर्वसाक्षी दृष्टीला मात्र रामचंद्र देव सतत चालणारा संघर्ष, आत्मग्लानी आणि पश्चात्तापाने पोळणारे हृदय यांची मूर्ती वाटली असेल यात शंका नाही.

रामचंद्र देवासारख्या कादंबरीच्या नायकाचा विचार करून झाल्यानंतर याच कादंबरीतल्या एका छोटया – अगदी छोटया – पात्राचा, मालकुदा गावच्या वेडया म्हाताऱ्या पाइकिणीचा, विचार करून पाहता लेखकाच्या सामर्थ्याचा आणखी एक पैलू दिसून येतो. ही म्हातारी सारखी शिव्यागाळयांचा वर्षाव करत असते व म्हणून वाचकाला क्वचित् हिचे हसूही येते. त्या दृष्टीने पाहिले तर हिचे फकीरमोहन सेनापतीच्या, रेवतीच्या म्हाताऱ्या आईशी साम्य आहे; पण या हास्यामागे सुद्धा देशप्रेमातून उत्पन्न झालेली व्याकुळता व करुणा यांचा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाही. तेच या पात्राचे वैशिष्टय होय.

दुसऱ्या बाजूला जगुनि आणि सरदेई ही वाऱ्यावर उडणारी दोन वाळकी पाने आहेत. भूतभविष्याचा आगापिछा नसलेल्या या पात्रांचे दैन्य मोठे विचित्र आहे. शारीर पातळीवरच्या द्वंद्वात आणि अनेक भावनिक कल्लोळात बुडलेली ही पात्रे खरीखुरी जिवंत वाटतात. विटंबित जगन्नाथाच्या दर्शनाची अतीव उत्कंठा असलेली, मनातल्या दोन प्रवृतींचा झगडा चाललेली, सरदेई विटंबलेल्या स्त्रीत्वाची उज्ज्वल मूर्ती भासते. रथयात्रेनंतर निर्जन सराईत तिच्या मनात आलेले प्रश्न मानवाला नेहमी पडणारे व कधीही न सुटणारे असेच आहेत. पापपुण्याचे भय तिच्या मनात सतत जागतं आहे; पण भागीरथीकुमाराला पाहून एक रात्र तिच्या मनात पातिव्रत्य व

मोह यांचा झगडा सुरू होता. म्हणून अनेक शारिरीक उद्रेकही होतात. त्याची निसर्गाच्या सहाय्याने केलेली वर्णनेही यात आहेत. म्हणून सरदेईचे रिक्त, वेदनागर्भ जीवन तिच्या शेवटच्या बेशुद्धीतल्या बडबडीत प्रतीत होते. ती खरं तर, एक गौण पात्र; पण सर्व कादंबरीवर तिचे सावट आहे. लेखकाच्या भाषेत 'सरदेई' त्यांच्या 'अवचेतनाची निर्मिती' आहे. त्यातून जणू दैवाने ओडिसाची जी विटंबना केली तीच व्यक्त झाली आहे.

जगुनि सरदेईची कर्मशक्ती आहे, आधार व आदर्शाचा जागृत पहारेकरी आहे. सामान्य माणसाप्रमाणे त्यालाही मोह, माया वगैरेचे पाश आहेत. त्यामुळे हे पात्र जिवंत वाटते. कादंबरीच्या शेवटी शेवटी तो सरदेईबाबत निर्मम होतो. त्यातून त्याच्या कर्मनिष्ठेचा परिचय होतो. श्री जगन्नाथाला चिलिकेतल्या एका सुरक्षित जागी ठेवण्याची जबाबदारी घेताना त्याच्या मनातल्या निरीच्छ भक्तीत केवळ सरदेईच नव्हती. जे काही त्याच्या हृदयात होते ते एका धीट कर्मशाली व्यक्तीप्रमाणे 'जगन्नाथ' व 'चलंति विष्णु प्रतिमा', गजपति खोर्धा राजा यांच्याबद्दल अथांग भक्ती होती; त्यामुळे कर्तव्यपालन करताना तो वास्तवालाही विसरून गेला होता. म्हणून हे पात्र गौण असले तरी वस्तुत: याचा क्रमांक बराच वर लागेल.

अशाच तऱ्हेने अनेक मुख्य व गौण पात्रांनी घटनाप्रवाहाच्या सोबत 'नीलशैल'ला शोभिवंत केले आहे. वर्णनापेक्षाही अधिक सूचकता आणि घटनांचे आवर्तन यातून हेतू सफळ झाला आहे.

पुष्किनप्रमाणेच कादंबरीकार महान्ति आपल्या स्वभावरेखेत ऐतिहासिक सत्य, व्यक्तित्व व तत्कालीन परिस्थिती यथाकाल गुंफतात. कादंबरीत उत्कलचे सर्वांगीण चित्र, त्याची आशानिराशा, वीरत्व-भीरुत्व, त्याचा ऐतिहासिक गौरव-अपमान सर्व आले आहे. लेखकाला बऱ्याच ठिकाणी वैचारिक निबंधशैलीचा आधार घ्यावासा वाटला. कारण इतिहासातले लुप्त भागही त्यांना उपयोगात आणायचे होते. पण प्रत्येक क्षेत्रात त्यांचा स्वत:चा ठसा दिसून येतो. सतराव्या व अठराव्या शतकातला उत्कल चित्रित करायचा असल्याकारणाने लेखकाने त्या वेळची भाषाही बऱ्याच ठिकाणी वापरली आहे. ती चपखल आहे. कथानक एकसंध आहे. कविता असावी तसा त्यांचा प्रत्येक शब्द ध्वनी, संगति व व्यंजना आदि साहित्यिक लक्षणे व्यक्त करतो.

कलेत स्वत:सिद्ध सौंदर्य असते हे मानूनदेखील उद्देश्यमूलकता लेखक विसरत नाही म्हणून डी. एच्. लॉरेन्सप्रमाणे त्याने स्वत:ला पात्रांमध्ये हरवून कथानक भरकटू नाही दिले.

"नीलशैल"ची शैली ओजस्वी व पात्रांच्या संघर्षांना योग्य अशीच आहे. त्याची वर्णने वास्तविक आहेत. जो संघर्ष लेखकाला अभिप्रेत आहे तो केवळ शारीर, इहलोकीचा नाही. हा देह व आत्म्याचा संमिश्र संग्राम आहे. कादंबरीत भक्ती व देशप्रेम एकमेकात बेमालूम मिसळले आहेत. त्या दृष्टीने ही राष्ट्रीय वृत्तीचा जसा परिपोष करते तसा भक्तिप्रेमाचाही करते. अशा कोमल व रुद्र-कठोर भावांचा संगम करून इतिहासाच्या पानाचे भक्ती व श्रद्धायुक्त वर्णन करणारी ऐतिहासिक कादंबरी भारतीय भाषेतही विरळाच होय. म्हणून कुंजगडनायक, सरदेई किंवा रामचंद्र देव यांच्या भावनामय जीवनातली कडू-गोड स्थिती व जीवनाबद्दलची जिज्ञासा विसरणे कठीण आहे. जीवनसंग्रामात ते केवळ ओडिया जातीचा किंवा उत्कलचा दुर्दम्य अभिमान नाहीत, तर 'नीलशैल'च्या श्री जगन्नाथाप्रमाणे अखिल विश्वाचे, समस्त मानवतेचे प्रतिनिधी आहेत. म्हणून ही पात्रे अपराजित, अथक आणि महापूर्णतेची अनादी अनंत भावविह्वल रूपे आहेत.

कथानक, पात्र, वातावरण आणि भाषा इत्यादी सर्व दृष्टींनी "नीलशैल" एक यशस्वी कादंबरी आहे तसेच साधासुधा व विषण्ण इतिहासही आहे. यात शुभ आहे, अशुभ आहे... ..आणि आहे महाचेतनेचा एक दुर्दान्त प्रकाश !

—पितांबर प्रधान 'उपगुप्त'

# एक

## 1

उन्हात होरपळणाऱ्या ठेंगण्या वडाच्या पारंब्या, जमिनीच्या भेगांतून कशीतरी वर आलीशी वाटणारी अर्धमेली खजुराची झाडे, वांडगुळांनी वेढलेली आंब्याची काही झाडे, पळस करंजांच्या झाडांचा थोडासा आडोसा; एकाददुसरी सुनीसुनीशी धर्मशाळा आणि या सगळ्यांच्या मध्यभागी धुळीने भरलेली वाकडीतिकडी जगन्नाथ सडक मेल्या अजगरागत पडली आहे. आकाशात राखी रंगाचे ढग जमा झालेत आणि त्यांच्या पदराखालून मध्याह्नीचा सूर्यही कोमल वाटतोय. सगळीकडे राख फुंकल्यागत वाटतंय. सडकेवर कुणीही दिसत नाही. सडकेच्या दोन्ही बाजूला जी झाडं होती त्यावर पक्षी-देखील गुपचुप होते. ही दुपारची शांत वेळ खरी, पण तिच्यात स्वाभाविकपणा नव्हता. अशा त्या निर्मनुष्य रस्त्यावरून एक घोडेस्वार चितातुर दृष्टीने नाकासमोर बघत धीम्या गतीने चालला होता. बहुधा पुरीला निघाला असावा. आज भाद्रपद शुक्ल एका-दशी. श्री जगन्नाथाचे पार्श्व-परिवर्तन. उद्या 'सुनिआं' वामनजन्म, त्यानंतर यदु-वंशाचे वीर श्रीगजपती गौडेश्वर नवकोट कर्णाट कलवर्गेश्वर वीराधिवीर श्री श्री श्री रामचंद्र महाराजांचा सातवा अंक संपून आठव्याला सुरुवात होईल.

घोडेस्वार अचानक वेड्याप्रमाणे जोरजोरात हसू लागला. घोडादेखील ते हसणं ऐकून बिचकला. रस्त्याच्या दोन्ही बाजूला दाणे शोधत फिरणारी कबुतरे त्या आवाजाने दचकून उडाली. आपल्याच हसण्याच्या आवाजाने तो घोडेस्वारही दचकला. शंकित मुद्रेने त्याने चारी बाजूंना नीट न्याहाळून पाहिले; मग घोड्याला हलकीशी टाच मारून त्याने आपली गती वाढवली. पाठीमागे धुळीचा ढग उडू लागला.

सुनिआं व वामन जन्मादिवशी तर जगन्नाथाचा हा रस्ता 'पंचकोशी' यात्रेकरूंनी भरून जायचा. पश्चिमेकडून आलेला एकटा-दुकटा यात्रेकरू कधी बैलगाडीत बसून तर कधी पालखीत तर घोड्या-उंटावर बसलेला किंवा पायी-पायी चालणाऱ्या इतर पंचकोशी यात्रेकरूंत वेगळा उठून दिसत असे. या रस्त्यावर एरव्ही निळ्या-तांबड्या, पिवळ्या साड्यांचा रंगीबेरंगी मेळा, स्त्री-कंठातले हसणे-खिदळणे, एखाद्या यात्रेकरूने दुसऱ्याला अकारण मोठ्याने मारलेली हाक, वगैरेचा नुसता गदारोळ उसळलेला

असायचा. या वर्षी यातले काहीसुद्धा नाही. गौड देशातून येणारा तुरळक एकटा–दुकटा वैष्णव देखील नाही. जेव्हापासून उत्कलमध्ये पुन्हा मोंगलांच्या हल्ल्याची अफवा फैलावली; जवळजवळ तेव्हापासून श्री क्षेत्रात होणारी गर्दी कमी–कमी व्हायला लागली होती. पण सुजाखाँच्या नायब–नजिमीच्या कारकीर्दीपासून जिझियाचा उपद्रव नाही आहे. पूर्वी रस्त्यावर जिझियाचे ठेकेदार लूटमार करायचे, ते देखील तसे बंदच आहे म्हणायचे. सुजाखाँच्या कारकीर्दीत खुद्द श्री जगन्नाथसुद्धा मोंगलांच्या हल्ल्या–उपद्रवातून वाचलेच होते. पण जेव्हापासून तकीखाँ कटकचा नायब–नाजिम बनलाय; मोंगलांची वाकडी नजर पुन्हा श्रीजगन्नाथावर वळायला लागलीय. मोंगलांच्या भया-मुळे दिवसाढवळ्या जगन्नाथ सडकेवर कुत्री रडताहेत; तर यात्रेकरू कुठले ?

पिपिलीमध्ये पुन्हा एकवार मोगलांनी तळ ठोकलाय. तिथला बाजार ओलांडून जाईतोवर एका भीतीने घोडेस्वार जलद गतीने जात होता. पिपिली मागं पडल्यावर त्याच्या घोड्याची चाल जरा मंदावली.

समोर भार्गवी नदी. वाळूने भरलेल्या या नदीची बारीक धार एका ठिकाणी कृशांगी युवतीच्या कमरेगत लचकून वळली होती. संध्यासमयीची सूर्यकिरणे तिथे झगमगून माणकांचा कमरपट्टा आवळत होती.

एक सुस्कारा सोडून घोडेस्वाराने चढणीचा रस्ता तुडवायला सुरुवात केली. भाद्रपद अर्धा गेला, पण एक थेंब पडला असेल आभाळातनं तर शपथ ! कृपणाच्या हाताच्या बोटातून तेल गळावं तेवढे शितोडे श्रावणात पडले. त्यात शेतकऱ्यांनी आपलं काहीबाही उरकून घेतलं. आसपासच्या वैराणीतून मधूनच कुठकुठल्या शेतांच्या तुकड्यात कोवळी पाती डोकी वर काढत होती. पण 'झूलन एकादशी' झाली तरी पावसाचं चिन्ह नव्हतं. श्रावणी पौर्णिमेला तरी बाबा यायचा पण या वर्षी कोण जाणे काय झालं ते ! शेतं तशीच राहिली कोरडी ठाक. शेतातली कोवळी धान्यं सूर्याच्या प्रखर देखरेखी• खाली कोळपायला लागली. जगन्नाथसडकेच्या दोन्ही बाजूला जिथवर नजर टाकावी तिथवर सुकलेल्या शेतांखेरीज इतर काही दिसतच नव्हतं. हाडांचे सापळे घेऊन गाई – म्हशी शेतातली माती हुंगत फिरत होत्या. काळ्या सावल्यांगत दिसणारी हाडकुळी माणसंही शेतातून काय शोधत फिरताहेत हरी जाणे !

दुष्काळ आता ठेवलेलाच आहे. कितीवर धारण बसेल कोण जाणे ! माणूस माणसाला खाणार ! सगळ्यांना एकदाच नाहीसं करून टाकायचं या पक्क्या इराद्या-नंच बहुधा निसर्गानं हा आपला अक्राळविक्राळ जबडा उघडला असावा.

पुरी अजून दूर आहे. भार्गवीची आणखी एक धार समोर आलीय. घोडेस्वाराने लगाम खेचला आणि घोडा उभा केला.

त्याच्यासमोर; पण त्याच्याकडे पाठ करून दंडवत घालत पुरीला जायचा नवस बोललेला यात्रेकरू उभा होता. घोडेस्वाराला संभ्रम पडला हा जिवंत माणूस की भूत ? इतक्या दिवसांच्या वाटचालीने त्याचे हातपाय सुजले होते. गुडघे फुटले होते व त्यावर ज्या चिंध्या लपेटल्या होत्या त्या रक्ताळून गेल्या होत्या. अतिशय घाणेरड्याही झाल्या होत्या. घामावर धूळ बसून सगळ्या अंगाला राप बसला होता. विस्कटलेल्या जटा पाठीवर लोंबत होत्या.

आपले हाडकुळे हात छातीवर उचलून मुठीतला विटेचा तुकडा त्याने समोर फेकला. जिथवर तो पडला तेवढ्या अंतरावर धूळभरल्या सडकेवर साष्टांग दंडवत त्याने घातला.

पुन्हा उठला. पुन्हा तो तुकडा फेकलान्, पुन्हा दंडवत घातला त्याने.

अनेकवार चढत, पडत, धक्के खात, धक्के देत, दु:ख वेदना अनुभवत जो यात्रेकरू क्षितिजरेषेप्रमाणे पुढं पुढं सरकणाऱ्या ध्येयामागं लागला होता तो बहुतेक याच्याच सारखा असणार. अपराजित, दमणूक माहीत नसलेला, फक्त स्वत:च्या आत्म्याच्या मुक्तीमागे जाणारा.

ही यात्रा अटळ आहे.

तर्कीखांची भीतीदेखील ही यात्रा खंडित करू शकली नाही.

आज एकादशी.

पण महाप्रदीपाची महाआरती करताना श्रीमंदिरात पुजारी आज थोर्घराजाच्या नावाने गाऱ्हाणं घालत नाही आहे.

आज पुकार होतोय बक्सी वेणु भ्रमरवर हरिचंदन महापात्रच्या नावाचा. काय असेल बक्सीचा कावा ? पुष्कळ गोष्टी कानावर आल्यात. पण आज आता समक्ष जाऊन पाहिलेच पाहिजे.

घोडेस्वाराने वेग वाढवला.

## 2

" तू कधी कुणाची अब्रू राखली आहेस ? अरे, स्वत:ची अब्रू तरी कुठं सांभाळली आहेस ? हे जगन्नाथ ! अरे तुला राजुखां कालापहाडनं चामड्याच्या पट्ट्यानं बांधून

बैलगाडीला जखडून धान्याच्या गोणत्यासारखं फरफटत नेलं. तरी देखील तू का ऽऽऽही केलं नाहीस. तू काय माझा लौकिक अन् अब्रू वाचवणार ? हं: !"

श्रीमंदिराच्या सिंहद्वारासमोरच्या मेघनाद तटाला ओठंगून, रात्रीच्या अंधारात नीलचक्राकडे बघत कुणी एक जगन्नाथाला आपली व्यथा ऐकवीत होता. त्याचे डोळे कोणत्याशा आवेगाने तुडुंब भरून आले होते.

निर्मनुष्य रस्त्याने दुपारी चालणारा घोडेस्वारच होता तो. अंधारात समजत नव्हते पण दिवसाउजेडी कळलं असतं.

तो जणू आपल्या मनाशीच बोलत होता, " नाही रे. मला मानसन्मान नकोय. तुझा मान राहिला पाहिजे श्रीजगन्नाथ. त्यासाठी तर मी तुझ्यापासून दूर गेलो. बघ, अजून-देखील तुझ्या माळेतून 'दयना' फुलांचा वास कसा घमघमतोय. तुझे राजीवलोचन मला खुणावताहेत – बोलावताहेत. म्हणताहेत – 'मी मरणाचंही मरण आहे. मी म्हणजे महामुक्ती आहे. मूढा, सगळा मान अभिमान, गर्व सांडून माझ्याजवळ ये. इथेच शांती, मोक्ष, जन्म – पुनर्जन्माचे फेरे तोडणारे नील–निर्वाण......सगळं काही येथेच आहे. माझ्या मार्गात काटे आहेत, हे महाप्रभू. मीच पसरले आहेत ते माझ्या हातानंच. पण मला त्याचा खेद नाही. जगन्नाथा, मी पतित झालो तरी चालेल पण पण तुझा मान, उत्कलचा मान राहिला पाहिजे."

ढगांनी झाकलेल्या चांदण्यातून दिसणाऱ्या नील–चक्राकडे दृष्टी लावून उभे असलेल्या त्या अभाग्याला एक पूर्वीची आठवण झाली. तेव्हा तो बारा–चौदा वर्षांचा असेल. त्यावर्षी वादळाचा भयंकर तडाखा बसला होता. इतका की मंदिरावरचे श्री चक्र देखील उडून पडले होते. अजूनही त्यावेळच्या हाहा:काराची आठवण लोक सांगतात. त्या रात्री वादळाच्या जोराने श्रीमंदिरावरचे नीलचक्र तुटून 'भंड गणपती'च्या देवळाजवळ पडले होते. " नीलचक्र पडले " ही बातमी आल्याबरोबर तो वडिलांबरोबर घोड्यावर स्वार होऊन सुनाखलागढहून आला होता, त्याची अजून आठवण आहे.

नीलचक्र तुटल्याचा अपशकुन झाला आहे. आणि बहुधा मोंगलांची स्वारी होईल त्यासाठी तयार रहा – अशी कुजबूजही लोकांत झाली होती.

जगन्नाथासमोर गाऱ्हाणं घालणाऱ्याच्या डोळ्यांसमोर महाराज दिव्यसिंहाची मूर्ती आली. आजानुबाहू, भरदार छाती आणि गंभीरतेचे डोह असलेले विशाल डोळे.

खरोखरच, त्यावर्षी नायब नाजिम सुजाखाँने खोर्धावर हल्ला केला होता. पण दिव्यसिंहाने त्याच्या फौजेला पार सारंगगडापर्यंत पिटाळून लावले. मोंगल हल्ल्यानंतर महाराज दिव्यसिंहाने पुन्हा एकविसाव्या 'अब्दां'मध्ये श्रीमंदिरावर नीलचक्र चढवले.

त्यावेळी महाप्रदीप उचलून महाआरती करताना चारणाने गाऱ्हाणे घातले होते, " महाप्रभु ! महाराज दिव्यसिंह देवाला शंखात ठेवून चक्राच्या पदरी ठेवा, महाराज."

आजदेखील महाप्रदीपाचा व महाआरतीचा दिवस.

पण पुजारी आज बक्सी वेणु भ्रमरवर हरिचंदनच्या नावाने आशीर्वाद मागतील. आज त्याच्या नावाचा पुकारा होईल. खोर्धाच्या महाराजांचा नव्हे. आपल्याच करणीनं खोर्धा राजा राजसिंहासनाला मुकलेत.

वटवाघळाच्या पंख झाडण्याने धूळ उडावी तसे चांदणे मुकाट झरत होते. निर्मनुष्य ' बडदांड ' रस्त्यावर जगन्नाथ मंदिरापासून माऊसी मंदिरापर्यंत जाणारा हा रस्ता, गुपचुप पडून होता. रथदांड रस्त्यावरून दूरच्या नारळी आणि देवदार गोसाव्यांच्या जटांगत दिसत होती. कान देऊन ऐकायचा प्रयत्न केला तरी काही ऐकू येत नव्हते. काही नाही. घंटांचा आवाज, आरतीचे सूर, संध्याकाळी फुंकलेले शंख, लहान मुलाचे रडणे देखील नाही.

नाही म्हणायला घोड्याच्या खुरांचा खट् खट् आवाज येत होता. पण तो त्या घोडेस्वाराचाच घोडा होता. मघा आल्यावर त्याने तो दक्षिणेच्या गल्लीत बांधून ठेवला होता.

विष्णु पश्चिम कपाट महापात्र म्हणजे श्रीमंदिराची देखरेख, कारभार बघणारे अधिकारी. गौरी राजगुरू प्रमुख त्यानंतर विष्णु महापात्रच. त्यांनी आज यावेळी इथं भेटण्याचं नक्की केलं होतं. विसरले की काय कोण जाणे !

घुमटीच्या आतली शेंदुराने माखलेली मारुतीची भीमकाय मूर्ती दिव्याच्या उजेडात भयंकर दिसत होती. वेदीखाली मंदिराचे दोन पहिलवान शिपाई भांग चढवून मस्त नशेत भिंतीला टेकून बसले होते. कुस्ती कसरत करून करून त्यांची शरीरं भक्कम झाली होती. दंडावर चेंडू दिसत होते. एकेक लंगोट खेरीज करून ते उघडेच होते. बेंबीखाली बांधलेल्या पंचाच्या गाठीवरून पोटं खाली उडी मारायची धडपड करीत होती.

रथयात्रा बघायला आलेले यात्रेकरू मोंगलांच्या भीतीने निघून गेले होते. खरं म्हणजे रथयात्रेला आलेले यात्रेकरू झूलन एकादशी करूनच जातात. पण जेव्हापासून कडवा हिंदुद्वेष्टा तकीखाँ कटकचा नायब – नाजिम झाला तेव्हापासून सबंध उत्कल एका भयाने भारून गेला होता. म्हणून तर एकही पंचुकोशी यात्रेकरू दिसत नाही. इथलेच राहणारे दर्शनासाठी ये जा करताहेत झालं, सावल्या फिराव्यात तसे. त्यांच्यामुळे मंदिरातली शांतता अधिकच गडद होते.

येणाऱ्या–जाणाऱ्याची चाहूल कधी कधी भांगेत चूर झालेल्या त्या पहिलवानांना

चाळवायची. जागे होऊन ते आपले मुद्गल सांभाळायचे. पण बहुधा आलेलं व्यक्ती कुणीतरी गौड वैष्णव तरी असायची किंवा तिथलीच म्हातारी – जिला मोंगलापासून कसलंही भय नसलेली. हॅं: ! यांच्यापासून काय लाभ व्हायचाय ? पहिलवानांच्या चेहऱ्यावर चीड दिसायची.

त्यातलाच एक मल्ल खोकत बाहेर आला. सिंहद्वारासमोरचा बडदांड निर्मनुष्य होता. सडकेच्या दोन्ही बाजूची घरे आणि मठ यातून प्रकाशाची अस्पष्ट तिरीपदेखील सांडत नव्हती. आकाशात ढग जमले होते. काळोख दाटून आला होता. हवा गारठायला लागली होती.

सिंहद्वाराच्या घुमटीआत तेवणारी ज्योत एकदम प्रज्वाळली. त्या प्रकाशात मल्लानं पाहिलं की सिंहद्वाराला टेकून कुणीतरी उभं आहे. त्याने विचारलं, "कोण आहे रे ? ठाणवईसारखा उभा आहेस ?"

घोडेस्वार तसाच गुपचूप राहिला. भीतीने त्याचं मन भरून गेलं.

तोवर दुसरा मल्लही बाहेर आला. दोंदावरचा पंचा आवळत त्याच्याकडे नीट निरखून बघण्याचा प्रयत्न करू लागला. मग आपल्या सोबत्याला म्हणाला, "अरे हा कापालिक दिसतोय. चल, चल याच्याबरोबर. तंडू नकोस. 'भस्म हो' असं म्हणून जर यानं झोळीतील विभूती फुंकली तुझ्यावर तर आत्ता इथंच तुझी होळी पेटेल."

कापालिक देखील जगन्नाथाचे भक्त आहेत. पण ते मंदिरात जात नाहीत. दोघाही मल्लांना ती व्यक्ती म्हणजे कापालिक असल्याची खात्री पटली. ते आत निघून गेले.

आपल्याला कापालिक ठरवल्याचे ऐकून घोडेस्वाराचा चेहरा दु:खाने, अपमानाच्या वेदनेने पिळवटला. मनातल्या मनात तो पुटपुटला, "खरंच, कापालिकच तर आहे मी."

लांबून कुणी चारचौघे मंदिराकडे येत होते. सायंआरतीची वेळ झाली होती. आसपासच्या शुकशुकाटात त्यांच्या बोलण्याचा अस्पष्ट आवाज येत होता.

त्यातला एक जण म्हणत होता, "खरं म्हणजे आता काही म्लेच्छांच्या हल्ल्याची भीती नाही. गजपती रामचंद्र देव मुसलमान झाले. यवनीच्या हातचं खाल्लं... . जगन्नाथ तूच रे बाबा......त्यानी कलमाही पढला म्हणे. तकीखाँचे मेव्हणे झाले ना. आता कशाला उत्कलवर तो हल्ला करतोय ?"

पण दुसरा उत्तरला, "अरे मुसलमान होऊन राजाचा जीव वाचला पण जगन्नाथाचं काय ? तो वाचला का ?"

खरंच, रक्तबाहूपासून ते काळापहाडपर्यंत ज्यांनी ज्यांनी म्हणून उत्कलवर स्वाऱ्या केल्या होत्या त्यांना श्रीजगन्नाथ जिंकल्याशिवाय उत्कल-विजय पुरा झालासा वाटलंच

नव्हतं. म्हणून कुराण वाचून रामचंद्र देव फार तर सुटेल पण जगन्नाथ कुठला सुटायला ?

पहिल्या प्रथम बोललेला माणूस म्हणाला, "काय होईल ते खरं. वेणु भ्रमरवर गजपती बनले तर जगन्नाथाचे रक्षण होईलही. अखेर जगन्नाथ ठरवील तेच व्हायचं."

बोलत बोलत ते मंदिरापर्यंत आले. सिंहद्वाराशी पोचल्यावर तिथल्या वाघांच्या पायांना स्पर्श करून त्यांनी धूळ मस्तकाला लावली आणि गालावर चापट्या मारत ते आत गेले.

त्यांनी मंदिरात प्रवेश करताक्षणी मंदिराच्या पैलवानांपैकी एकजण ओरडून म्हणाला,

"अरे, इथं कवडी ठेवा अन् मग जा. जगीया हनुमानाला कवडी न ठेवता सरळ दर्शन करायला कसे रे चाललात ? रथयात्रेच्या वेळी पश्चिमेचे यात्रेकरू पुष्कळ येतात... श्रावण पूर्णिमेपर्यंत तशी गर्दी राहिली असती तरी कमाई झाली असती. पण आता तर बडदांडवर कुत्री रडताहेत. यावेळी जेवढी रथयात्रेला माणसं लोटली होती तेवढी महाराज दिव्यसिंहानंतर कधीच आली नव्हती."

भांगेच्या नशेत अडखळणाऱ्या स्वरात त्याचा साथीदार म्हणाला, "तुला समजत नाही बघ दोस्ता, गर्दी कशाला झाली होती सांग ? अरे, वेणु भ्रमरवरने गुंडिचा मंदिरात जगमोहन बनवलाय की नाही ? तो बघायला लोकं आली होती. समजलास ? महाप्रभु जगन्नाथाचे एवढे भक्त आहेत पण राजगादीवर कोण बसला तर एक म्लेंच्छ ! बाटगा !! आणि बिचारे भ्रमरवर तसेच राहिले."

पुन्हा दोघेजण नशेत चूर झाले. बाहेर घोडेस्वाराने एकवार अंधारून आलेल्या ढगाळ आकाशाकडे पाहिलं. एक उसासा सोडला. एक बारकीशी चांदणी आकाशात लुकलुकत होती.

त्या ताऱ्याकडे पाहता पहता घोडेस्वाराला चिंता–काळज्यांत तळमळत काढलेल्या कैक रात्रींच्या आठवणींच्या इंगळ्या पुन्हा डसू लागल्या. आज उत्कलभर वेणु भ्रमरवर हरिचंदन महापात्रचा जयजयकार होतोय. कुणास ठाऊक... खोर्धाच्या भोई राजवंशाची लाज राखतील तर तेच अन् जगन्नाथाचा मानदेखील... कोण जाणे !

त्यांचे वडील भगवान भ्रमरवर हरेकृष्ण देव महापात्रचे दिवाण होते. श्रीमंदिरात महाप्रसाद आणण्यासाठी रसोड्यापासून ते महाप्रसादमंदिरापर्यंतच्या पायऱ्या त्यांनीच बनवल्या आहेत.

आता त्यांच्याच धाकट्या मुलानं वेणु भ्रमरवराने गुंडिचा मंदिरात जगमोहन सभामंडप बनवला. जगन्नाथासाठी स्वतःच्या नावानं रोज भोग चढवायची व्यवस्था केली.

जगले वाचले तर तिसरे इंद्रद्युम्न म्हणवितील. उत्कलच्या या टोकापासून ते त्या टोका-पर्यंत यात्रेकरूंच्या गुमास्त्यांकरवी हाच नि असाच प्रचार त्यांनी स्वतःच करवला होता.

कावळ्याच्या नजरेने श्रीक्षेत्र न्याहाळणाऱ्या तकीखाँला समजू न देता जगमोहन सभामंडप बांधणं काही सोपं नव्हे. पण वेणु भ्रमरवरनं हे असाध्य काम करून दाखवलं. तेलंग मुकुंदाच्या वेळेपासून उत्कलच्या गतेतिहासासारखे उपेक्षित शे-सव्वाशे संगमरवराचे खांब पडले होते. त्यांचाच उपयोग करून हा जगमोहन सभामंडप वेणु भ्रमरवरने बनवला होता. दिवसभर सगळं गुपचुप असायचं, रात्रभर काम चालायचं, शेकडो कारागिरांनी अशा तऱ्हेने काम करून काही दिवसांतच हा विशाल जगमोहन उभा केला. अशा तऱ्हेचे गुणगान यात्रेकरूंची व्यवस्था पहायला नेमलेले गुमास्ते सगळीकडे करत होते.

या वर्षी तर रथयात्रेच्या दिवशी 'छेरापहरा' देखील वेणु भ्रमरवरनेच केला. ठीक आहे. राजा म्लेंच्छ झाला, बाटला. तो कसा करणार ? पण युवराज भागीरथीकुमार तर होते. त्यांना का नाही सांगितलं ? खरं म्हणजे, या सर्वांचं आदिमूळ आहेत मंदि-राचे मुख्य संचालक गौरी राजगुरू. त्यांनीच सांगितलं की युवराज अज्ञानी आहेत; म्हणून 'छेरापहरा' केला. कुणी तर वेणु भ्रमरवरनं ! आजवर गजपतीचाच हा अधिकार होता – राजसेवकाचा. राजा रामचंद्र देवापासून तो हिरावला गेला. तोही वेणु भ्रमरवरसारख्या धूर्ताकडून.

घोडेस्वाराने पुन्हा एकदा त्या चांदणीकडे पाहिलं. भ्रमरवराचे हिंस्त्र डोळे त्यातून त्याच्याकडे पहात होते. हळूहळू सर्व चेहरा दिसायला लागला. भक्ष्याकडे पाहताना जिभल्या चाटणारा. चेहऱ्यावर ढोंगी नम्रता आणि साधुपणाचा आव. कपाळावर चंदनाचा टिळा, गुळगुळीत केलेले केशविहीन मस्तक, गळ्यात रुद्राक्ष न् तुळशीमाळा. दाढीमिशा सफाचट असलेले तोंड पण डोळे मात्र भयंकर... भयंकरच !

ढग आता हळू हळू विरळ होत चालले होते.

मघाच्या त्या एकट्याच चांदणीशेजारी आणखी एक नक्षत्र झळकलं. खोर्धाच्या आकाशातलं दुसरं अपशकुनी नक्षत्र...भागीरथी कुमार राय.

एकांत अधिक गडद होतोय. सायंपूजेचं शिंग वाजलं नाही अद्याप. ज्या दिवशी मोंगलांच्या हल्ल्याची अफवा फैलावली तेव्हापासून श्रीक्षेत्रातल्या इतर मंदिरातूनही आरत्यांच्या वेळचं शंख घंटा शिंग नगारा बंद झालं आहे. एक निराकार भय अंधाराचे काळे हात लांबवून पंज्यात गळा आवळतंय.

खोर्धाच्या चारी बाजूला सर्वनाशाचं जाळं पसरलेलं आहे. हलके हलके त्याचे पाश

घट्ट व्हायला सुरुवात झालीच आहे. दक्षिणेला चिकाकोल प्रांताच्या सुभेदाराने रघुनाथपुर टिकालीपासून ते चिलिकापर्यंत प्रदेश घशात घातला तरी त्याचं पोट भरलं नाही. उत्तरेकडून तकीखाँ आशाळभूत नजर रोखून फक्त निमित्ताची वाट बघतोय. आणि खुद्द घरातच दोन शत्रू आहेत – एक वेणु भ्रमरवर आणि दुसरे...खुद्द युवराज भागीरथी कुमार राय.

उपाध्याय विष्णु महापात्र संकेत विसरले काय ? घोडेस्वार आता निराश व्हायला आला होता.

एकदम तिथली निर्वेध शांतता शंख शिंग घंटांच्या आवाजाने डहुळली.

मंदिराच्या आत समुद्राच्या गर्जनेसारखा आवाज उठला, " मणिमा, महाबाहू...... तुझ्या कृपेची पाखर..."

लहानसान इच्छा नव्हे. बारकी प्रार्थना नव्हे. एका असीम महाशून्यतेची तितक्याच विराट् शून्यतेत विलीन होण्याची कांक्षा प्रगट करणारी ही प्रार्थना......" मणिमा महाबाहू "

घोडेस्वाराला काही दिसले नाही, काही ऐकू आले नाही. एका लाटेनं तो पार वर उचलला गेला. भय, चिंता आदि इहलोकातला चिखल मागं ठेवून अभयलोकी गेला.

आकाश उजळलेय. सांध्यसमयीच्या हजारोहजार किरणांनी ते श्वेतकमलाप्रमाणे प्रफुल्ल दिसते होते. त्याच्याच पार्श्वभूमीवर शंख – चक्र – गदा – पद्मधारी भुजा अभय देत होत्या. काळाचा प्रवाह त्याच्या चरणकमलाशी रुंजी घालत होता. त्याच्या सपाट्यात अनेक दुर्ग, राजसिंहासने, राजमुकुट वर आले होते. कोसळले होते. इतिहासाच्या त्या अटळ अनिवार ओघात कोण जिंकलं न् कोण हरलं हे विचारणं व्यर्थच आहे. या सर्वांवर त्या अनंताचे मुक्तिदायी वरदायी मुख हसत आहे. भय नाही...भीती नाही... ही तर रात्रीची समाप्ती सुचवणारी प्रभातकाळची प्रथम चाहूल आहे.

घोडेस्वाराने आवेगाने " मणिमा...मणिमा " पुटपुटत बडदांडच्या धुळीत साष्टांग दंडवत घातला व तो तसाच पडून राहिला. कोण जाणे किती वेळ. मग एका मृदू स्पर्शाने तो जणू शुद्धीवर आला. तेव्हा पुन: एकवार मूर्च्छेसारखा काळोख त्याच्या चारी बाजूला पसरला होता.

दुय्यम उपाध्याय विष्णु पश्चिम कपाट महापात्र त्याच्याजवळ बसले व संयत स्वरात म्हणाले, " रस्त्यावर असे पडून राह्यला आलात ? पिपिलीच्या सुभेदाराने नाहीतर गुप्तहेराने पाहिलं तर सत्यानाश होईल."

घोडेस्वाराने स्वत:ला प्रयत्नपूर्वक सावरले. विचारले, " महाआरतीला अजून वेळ आहे काय ?"

छोटे उपाध्याय उत्तरले, " जोवर मोंगलांच्या हल्ल्याची भीती आहे तोवर महा-आरती आम्ही बंदच ठेवली आहे. याचे दोन अर्थ होतात."

घोडेस्वार खिन्न आवाजात म्हणाला,

" एवढ्याशा गोष्टीसाठी आपण एकादशीची महाआरतीदेखील बंद केलीत ? काय म्हणावं ?"

त्या जागी थांबणं योग्य नव्हतं. छोटे उपाध्याय म्हणाले, " घोडा बालीसाहींच्या वळणावर बांधलाय. आपण सातलहरी मठात चलावं. मंदिरांतली कामं आटोपून मी येतोच.

## 3

मंदिरातले सगळे विधी, कामकाज आटोपून छोटे उपाध्याय जेव्हा सातलहरी मठात पोचले तेव्हा चांगलीच रात्र झाली होती.

एकादशीचा अस्तंगत होऊ पहाणारा चंद्र मधूनच ढगांत लपायचा, बाहेर यायचा. खोर्धाचा भोई वंशही असाच नशीबाशी लपंडाव खेळत होता गेली कैक वर्षं.

उत्तर ओडिसात कधी अफगाण मोंगल सल्तनतीविरुद्ध बंड करून उठायचे, तर कधी दिल्लीमध्ये आपापसात होणाऱ्या मोंगल लठ्ठालठ्ठीत इकडचे काहीजण या पक्षाचे अथवा त्या पक्षाचे असायचे; तेव्हा या सगळ्या कटकटींना तोडगा म्हणून कटकच्या नायब नाजिमाची ओडिसाच्या उत्तरेकडील सीमेवर नेमणूक झाली होती. तेही या सगळ्या भानगडीतच दंग असायचे. म्हणूनच बहुधा खोर्धाच्या राजाला काही काळ सुखाने श्वास घेता येण्याजोगी परिस्थिती असे. श्रीक्षेत्रात मंदिराचे रंगकाम चालू होते. वर्षाच्या बारा महिन्यांचे तेरा उत्सव आणि छप्पन पर्वे विनायास चालू होती. जत्रा भरत होत्या. हे सगळं चालणं आवश्यकच होतं. नाहीतर खोर्धाची राजधानी अज्ञात गावातच आत्मरक्षणार्थ वणवण करत राहिली असती. पण खोर्धाची राजधानीच कशाला खुद्द जगन्नाथाला देखील मोंगलांच्या भयामुळे भ्रमंती स्वीकारावी लागलीच होती. कधी होडीमधून दोबंधाच्या मार्गे चिलिका प्रांताच्या आतमध्ये तर कधी पालखी-तून दक्षिणेकडच्या जंगलातून भटकणं त्यालाही चुकलं नव्हतं. केवळ एवढ्यासाठी त्याच्यासाठी स्वतंत्र नोकरवर्ग होता. " चापदलाई आरिआ सेवक " म्हणून हा नोकर-वर्ग केव्हाही तयार असायचा. जरूरीच्या वेळी जगन्नाथजीना श्रीक्षेत्राहून चिलिकाच्या

आतल्या एखाद्या गुप्त जागी हलवण्यासाठी; माणिक पाटणा व खालकाटि पाटणाच्या खाड्यांतून होड्या घेऊन हा सेवकवर्ग वर्षभर तयार असायचा. थोडा इशारा व्हायची खोटी की पातेलवणीसरशी जगन्नाथ, बलभद्र व सुभद्रा तिघांच्याही मूर्ती घेऊन चिलिका प्रांतात दडी देत असत. इकडे खोर्ध्याचा राजाही कधी रणपूरच्या सीमेवर असलेल्या माणत्रीला तर कधी खंडिआपाडा, बोलगड, चंदनपूर, दांडमुकुंदपूर, वा कपिलेश्वरपूर अशा आडबाजूंच्या गावांतून रहात असे.

दिव्यसिंह देवाच्या कारकीर्दीच्या २४ व्या वर्षी नवाब सुजाखांने लढाईत पराजय पदरी घेतला; तेव्हापासून ही भ्रमंती बंदच आहे म्हणायची. पण हिंदुविद्वेषी तकीखां आता कटकचा नायब – नाजिम आहे. परिस्थिती पुन्हा एकवार अशांत झाली आहे. कशाचंच काही सांगता येत नाहीसं झालंय.

सायंपूजेच्या वेळी सिंहद्वारासमोर छोटचा उपाध्यायाची – विष्णु पश्चिम कपाट महापात्रची वाट बघणारा घोडेस्वार आता सातलहरी मठाच्या जवळ समुद्रकिनाऱ्यावर फेऱ्या घालत दुर्दैवाच्या याच फेऱ्यावर विचार करीत होता.

समोर अंधाराने ग्रासलेला समुद्र. वर ढगांनी वेढलेले आकाश. क्षीण अशी नीलाभ-वलय क्षितिजरेषा अगदी हलकेच समुद्रापासून आकाशाला विलग करत होती. समस्त अंधाराच्या सीमांतावरील प्रकाशाच्या संभावनेसारखी! फेसाळल्या लाटा किनाऱ्याला गिळायसाठी अहमहमिकेने पुढे येत होत्या. आणि फेसाचा मुकुट वाळूवर फेकून ज्या लाटा मागे जात होत्या त्या पुढे येणाऱ्या लाटांत मिसळून दिङ्नाग डसल्यागत भला मोठा आर्त्तनाद करत पुनश्च किनाऱ्यावर कोसळत होत्या...

आक्रमण......स्वसंरक्षण......पराभव !

आक्रमण......स्वसंरक्षण......पराभव !!

लाटांनाही खोर्धा इतिहासाच्या या चक्रासारखीच उत्थानपतन, अग्रगती, आणि पश्चात् पदसरणापासून विश्रांती नव्हती. चारी बाजूला विषण्णता पसरली होती.

घोडेस्वार सातलहरी मठात परतला पण विष्णु महापात्र आले नव्हते.

क्षीण चंद्रप्रकाशात सातलहरी मठ अंधाराचा स्तूप करून ठेवावा तसा दिसत होता.

शून्यवादी संतकवी जगन्नाथ दास जेव्हा गजपती प्रतापरुद्रदेवाच्या आज्ञेवरून पुरीतून हद्दपार झाला तेव्हा त्याने आपल्या साधना–पीठाची स्थापना इथेच केली होती. असं म्हणतात की, जगन्नाथ दासाच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन समुद्र सात पावलं मागं हटला आणि राजसत्तेच्या शासनापासून मुक्त असलेली भूमी त्यानं जगन्नाथदासला प्राप्त करून दिली. अतिबडी जगन्नाथदास इथंच समाधिस्थ झाले.

पण हल्ली वैराग्यपूर्ण संन्यस्त वृत्तीचा अतिबडी शून्यवादी संप्रदाय लुप्त झाल्यासारखाच आहे; आणि वैष्णव, भक्तजन मधुराभक्तीतच मग्न होऊन श्रीक्षेत्रातल्या भोगैश्वर्यपूर्ण मठाकडे झुकले आहेत. म्हणून सातलहरी मठ बाभळी, केकतांडाच्या काटेदार झुडुपात निर्जन होऊन एकटा पडला होता. किनाऱ्यावरनं मंदिराचा कळस तेवढा दिसायचा. कधीमधी एखादा संन्यासी किंवा भटक्या भिकारी मठात आसऱ्याला यायचा.

मठाच्या जवळ येताच पायरीवर पडलेली प्रकाशाची तिरीप पाहून घोडेस्वार क्षणभर थबकला. मग त्याला वाटलं कदाचित विष्णु महापात्रच येऊन त्याची वाट पहात असतील. पण आत जाताच तो चमकला. जगन्नाथ दासाच्या समाधीजवळ फाटक्यातुटक्या कांबळ्यावर एक अस्थिपंजर वृद्ध निजला होता. समाधीवर मंदपणे तेवणाऱ्या दिव्याच्या अंधुक उजेडात आतलं एकंदर वातावरण भीतीदायकच वाटत होतं. वृद्धाच्या नेत्रात क्षीण जीवनज्योतीची अतिमंद रेखा मधूनच चमकायची, लुप्त व्हायची. त्याचे दोन्ही पाय सुजले होते. त्यांना कात्रे पडले होते. कपाळावर चंदनाचा टिळा होता, गळ्यात तुळशीमाळा. भिंतीवर एक श्रीजगन्नाथाची तसबीर टांगली होती. तिच्याजवळ वेताची एक लाल छडी होती. पताका होती. काही फुलं इकडे तिकडे विखुरली होती; आणि एका कढईत नेवैद्य होता.

घोडेस्वाराची चाहूल ऐकून वृद्धाने वळून पाहिलं. छाती, गळा, कफाने भरल्यामुळे श्वासाबरोबर त्याला घरघर लागल्याचाही भास होत होता आणि म्हणून तर ते सगळं दृश्य अधिकच भीषण दिसत होतं.

विष्णु महापात्र कुठे गेले ? हा म्हातारा कोण ? असा मनाशीच विचार करीत घोडेस्वार उभा होता; एवढ्यात निद्राजड डोळे चोळत पंचवीस तीस वर्षाचा तरुण कुठून तरी येऊन दाखल झाला. पेहेरावावरून तो उत्तर भारतीय यात्रेकरू वाटत होता.

घोडेस्वाराने काही प्रश्न करण्याआधीच पश्चिमेकडच्या बोलीत त्या तरुणाने सांगितले, "आम्ही सर्व यात्रेकरू आहोत !" पण हा म्हातारा कोण आहे ? या निर्जन जागी असा का पडून आहे? या सर्व प्रश्नांच्या उत्तरादाखल त्या तरुणाने जे सांगितले त्यावरून घोडेस्वाराला एवढाच बोध आला की तो म्हातारा त्याचा बाप आहे. दोघेजण गेले वर्षभर पायी फिरत आता बाहुडा दशमीला श्रीक्षेत्रला पोचलेत. म्हाताऱ्याची इच्छा रथावर बसलेल्या जगन्नाथाचे दर्शन घेऊन देह ठेवण्याची. एक दोन दिवसांचाच प्रश्न आहे तेवढ्यात म्हातारा स्वर्गद्वार जवळ करील असं लक्षण दिसतंच आहे. तसं झालं की त्यास स्वर्गद्वारी टाकून तो परत निघून जाईल.

ह्याच एकटा नव्हे, असे कैक जण या पुण्यभूमीवर देह ठेवण्याच्या लालसेने लांब-लांबून येतात. पण ही मनोकामना पुरी होणारे भाग्यवान् फार थोडे असतात. हा देव मोठा विचित्र आहे. याच्याकडून मनुष्य काय इच्छितो तर मोक्ष, महामरण, जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका.

वृद्धाची शिणलेली दृष्टी जगन्नाथाच्या तसबिरीवर खिळली होती. पाठीमागून समुद्राची गर्जना ऐकू येत होती.

सगळ्या हिंदू समाजात ही जी जगन्नाथावरची अविचल भक्ती होती – आणि म्हणून खोर्धाच्या राजगादीशी प्रखर एकनिष्ठा होती त्या शक्तीचाच समूळ उच्छेद करण्याची प्रतिज्ञा तकीखाँने केली आहे. त्याला चांगलं ठाऊक आहे की जोवर श्रीजगन्नाथ आहे तोवर खोर्धाचे राजसिंहासनही अजिंक्य आहे. म्हणून मुळालाच हात घालण्याच्या इरादानं त्याने श्रीक्षेत्रावरच चालून जाण्याचे ठरवले होते. तकीखाँने या सर्वनाशी प्रतिज्ञेपासून परावृत्त व्हावे म्हणून घोडेस्वाराने म्लेंच्छ धर्माचाही स्वीकार केला. म्हणजे मग कदाचित् खोर्धा वाचेल आणि बरोबरच श्रीजगन्नाथही. पण तकीखाँ महाधूर्त. त्याने ह्या आत्मरक्षणाचा डाव ओळखला.

घोडेस्वाराने एक मोठ्ठा श्वास घेतला. तो चिंतातुर वाटत होता. अस्वस्थ होऊन तो बाहेर आला. निष्फळता, पराभव आणि विषाद या भावनांपासून जसजसा तो दूर जाण्याचा प्रयत्न करत होता तसतशा त्या सावलीसारख्या त्याचा पाठलाग करीत होत्या. बाहेर येताच समुद्रावरची खारी आर्द्र हवा त्याच्या तोंडावर आली. त्या मोकळ्या हवेत श्वासोच्छ्वास केल्यावर त्याला जरा बरं वाटलं.

तो बाहेर येताच छोटे उपाध्याय त्याच्याजवळ येऊन किंचित रागाने म्हणाले,

"तुम्हाला मंदिरात जातेवेळी जर कुणी बघितलं असतं तर केवढा अनर्थ झाला असता काही कल्पना आहे का? श्रीक्षेत्रात फोडणी मिरची पडली तरी कटकला तकीखाँला त्याचा खाट जातो. बाबा, काय सांगायचं? सगळीकडे बिभीषण भरलेत."

सातलहरी मठाला लागूनच वेळूचं दाट जंगल होतं. ते दोघे त्याच जंगलात शिरले. पिसाट वाऱ्यामुळे सगळं जंगल उसासे टाकत असल्यासारखं वाटत होतं. मधूनच विरळ चांदणं कवडशा-कवडशाने आत येऊन सगळ्या वातावरणाला गूढता प्राप्त करून देत होतं. छोट्या उपाध्यायांची भीती आणि घोडेस्वाराच्या मनातलं दुःख जणू त्यामुळं द्विगुणित होत होतं.

भयग्रस्त स्वरात छोटे उपाध्याय म्हणाले, "महाराज, आपल्या वारंवार होणाऱ्या श्रीक्षेत्राच्या फेऱ्या तकीखाँला कळल्या नाहीत म्हणजे झालं."

सिंहद्वारासमोर जो कापालिकाचा छद्मवेष व दाढी घोडेस्वाराने धारण केली होती ती त्याने एक एक करून फेकून द्यायला सुरुवात केली. म्हणाला, "असं लपून छपून 'किती दिवस निभणार, महापात्र ? सत्याला सरळ सरळ तोंड कधीतरी द्यावं हे लागणारच, नाही का ? "

शरीरावर लपेटलेल्या कृत्रिम आवरणातून मुक्त झालेला चेहरा आता गर्व, देशाभिमान व राजतेजाने परिपूर्ण असा गंभीर दिसत होता. चंद्रप्रकाशात कमरेचा चांदीचा कमरबंद चमकत होता. तलवारीच्या टोकासारखं धारदार नाक, शिंगासारख्या अक्कडबाज वक्र मिशा आणि अधरावरचे भीतीचा लवलेश नसलेले मंद हास्य... घोडेस्वाराच्या अंतरात्म्याची असीम शौर्यपूर्ण निष्ठाच जणू त्यातून प्रतीत होत होती.

संध्याकाळपासून जो प्रश्न छोटे उपाध्याय टाळीत आले होते तोच घोडेस्वाराने अचानक विचारला, "काही निष्पन्न झालं का महापात्र ? "

एक उसासा सोडत महापात्रनी संक्षिप्त उत्तर दिले, " अंहं, काहीसुद्धा नाही."

वरवर तरी ऐकणाऱ्यावर याचा काही परिणाम झाला नाही. पण बारकाईने पहाणाऱ्याला दिसून आले असते की त्याचे डोळे एकदम क्रोधाने धगधगून उठले होते.

शांत आवाजात त्याने विचारलं, "विश्वनाथ बाजपेयी काय म्हणताहेत ?"

"त्यांच्या एकट्यानं काय होणार ? मुक्तिमंडपात जमलेल्या बहुतेक पंडितांचं मत तर विरुद्धच होतं." महापात्र क्लांत स्वरात उत्तरले.

सगळी घटना एवढी अप्रिय होती की बहुधा म्हणूनच महापात्र उत्सुक नव्हते तिचं साग्रसंगीत वर्णन करायला. पण घोडेस्वार त्यांना तसं सोडायला तयार नव्हता. त्यानं पुन्हा विचारलं, "पण हा खोडा कुणी घातला ? हरेकृष्णपूरचे बलदेव विद्यालंकार कोणत्या बाजूने बोलले ? "

महापात्र उद्विग्न स्वरात उत्तरले, "ते जर आपल्या बाजूचे असते तर प्रश्नच नव्हता."

घोडेस्वार उत्तरला, "म्हणजे माझा होरा चुकला नाही म्हणायचा. तुम्हाला ठाऊक आहे हरेकृष्णपूरचं राज्य कुणी वसवलेलं आहे ? नाही, तुम्हाला माहीत नाही. वेणु भ्रमरवराच्या पूर्वजांनी या राज्याची स्थापना केली. तेव्हा शास्त्र, धर्म यांच्या व्याख्या देखील त्याच्या मर्जीप्रमाणे ठरल्या तर नवल नाही. पण गोविंद वाजपेयी काही वादविवादात सहजासहजी हार जाणारे नाहीत."

छोटे उपाध्याय म्हणाले, "बाजपेयींनी अनेक शास्त्राधार दिले. अकबर बादशाहाच्या वेळी तोडरमल, मानसिंहानी अनेक यवनींना अंतःपुरात स्थान दिलं होतं. मुली, बहिणी

देऊन अकबर, जहांगिराशी त्यांनी सोइर संबंध जोडले होते – इथवर चर्चा झाली. तरीदेखील त्यांना कुणी मंदिर प्रवेशाला नको म्हटलं नव्हतं, मग महाराजांनाच मनाई का ?

" तेव्हा बलदेवाने काय म्हटलं की ते विजेते होते व अर्थातच त्यांना सात खून माफ होते !

" पुन्हा बाजपेयींनी सूर्यवंशी कपिलेंद्रदेवाच्या मुलाचं पुरुषोत्तमदेवाचं उदाहरण दिलं. ते देखील जगन्नाथाचे परम भक्त होते. हीनकुळातल्या मातेच्या पोटी जन्म घेऊनही त्याला जगन्नाथाला स्पर्श करण्याची मुभा होती.

" आता बलदेव मोठमोठ्याने हसू लागले. बाजपेयींचा कच्चा मुद्दा त्यांनी बरोब्बर पकडला होता. आताचा प्रश्न व बाजपेयींनी दाखला दिलेला प्रश्न सर्वस्वी भिन्न होते. हजार स्मृतिशास्त्रेदेखील काही उपयोगी पडू शकली नसती. विजयी हास्य करून तर्का-लंकार म्हणाले, " कशाची कुणाबरोबर तुलना करताहात, बाजपेयी ? कुठे तो वीरमणी गजपती गौडेश्वर नवकोट कर्णाट कलवर्गेश्वर अभिराय भूत भैरव दुःसह दुःशासन राऊतराय अतुलबल पराक्रम संग्रामे सहस्रबाहू 'धूमकेतू श्री श्री श्री पुरुषोत्तमदेव आणि..."

विष्णू महापात्र पुढं बोललेच नाहीत. पण पुढचे तर्कालंकारांचे शब्द समजणं काही कठीण नव्हतं. थंड स्वरात त्यानं विचारलं " हं पुढं ? "

अनिच्छेनं छोटे उपाध्याय सांगू लागले, " त्यावर बाजपेयी म्हणाले – म्लेंच्छ गणिका करमाबाईचा खिचडीचा नैवेद्यदेखील श्रीने मानून घेतला. सर्वश्रुत आहे ही गोष्ट. तो नैवेद्य ग्रहण करूनही महाप्रभु पवित्रच राहिले.

" पण तर्कालंकार तत्काळ म्हणाले,

' गणिका हिंदू किंवा मुसलमान असूच शकत नाही म्हणून करमाबाईला म्लेंच्छ म्हणता येणार नाही. महाप्रभूच्या सेवेतल्या इतर दासदासीसारखी ती नव्हती याला काय पुरावा ? ' तेव्हा बाजपेयींनी पुन्हा असहाय्य स्वरात सांगितले,

' पण गणिका म्लेंच्छांनी भोगायच्या नसतात – असतात याबद्दल तर्कालंकारांच्या शास्त्रात काही आदेश असतीलच ना ?'

या उपहासामुळे तर्कालंकार रागावले आणि कानातली मकरकुंडले हालवीत म्हणाले ! पण यवनाने भोगलेली गणिका यवनी बनते हे कुठलं शास्त्र सांगतं ? बाजपेयी, ही धरती देखील यवनभोग्य झालीय, पुढेही राहील. मग काय तिलाही अस्पृश्य समजायचं ? गणिका, गुत्ता, नदी आणि माती स्पर्शास्पर्शाच्या दोषापासून मुक्त असतात.'

"मुक्तिमंडपात हजर असलेले सोळा राज्यातले विद्वान भांगेची नशा चढवून हा वादविवाद ऐकत होते. तपकीर नाकात कोंबत ते सगळे 'साधु साधु' म्हणत तर्कालंकारांना पुष्टी देत उठले.

"बाजपेयींनी मग तर्काऐवजी तत्त्वांचा आश्रय घेतला. म्हणाले, "श्रीजगन्नाथ सर्वाधार आहे. पतितपावन आहे. महिमाच असा आहे की म्लेंच्छ तर श्रीक्षेत्राचा माणूसच आहे पण गाढवदेखील श्रीस्वरूप चतुर्भुज होतं. शास्त्रवचन सगळे जाणतातच. 'अहो तत्क्षेत्रमहात्म्य गर्दभोऽपि चतुर्भुजः' अशा परिस्थितीत जगन्नाथाला एकाच जाती धर्माला जखडून संकुचित बनवण्यात काय अर्थ आहे ?'

"तर्कालंकारानी उत्तर दिलं,

'हे म्हणणं योग्य नाही. जगन्नाथाने पतिताचा उद्धार करणं आणि पतिता—पतितांनी त्याचे सेवक बनून त्याची चाकरी करणं या दोन गोष्टी परस्परापासून भिन्न आहेत. धर्मत्याग केलेली व्यक्ती – मग ती कोणीही असो – विशेषत: जर म्लेंच्छ असेल तर प्रभूच्या रत्नसिंहासनाला तिचा स्पर्श होणं हे कोणाही हिंदुधर्मीयाला सहन होणार नाही.'

"पंडितांनी भरलेला मुक्तिमंडप एका आवाजाने म्हणाला, 'बरोबर आहे ! बरोबर आहे !!'

बाजपेयींचं घराणं आणि त्यांची विद्वत्ता सगळ्या उत्कलमध्ये प्रसिद्ध आहे. अशा रीतीने एका सामान्य शास्त्र्याकडून ते अपमानित व पराभूत होतील अशी कुणी कल्पना केली नसेल. त्यांना स्वत:लाही तो अपमान फार जाणवला. ते गप्प बसले. मग वल्लभपूरचे भागी पढिआरी पुढे झाले, म्हणाले, 'ही सगळी निरर्थक बडबड राहू द्या. तर्कालंकारजी, मला एक सांगा. यवनीबरोबर राहिल्याने पुरुष पतित ठरतो की ठरत नाही ? भोई पुरुषोत्तमदेवाच्या कारकीर्दीतल्या सोळाव्या वर्षी कल्याणमल्ल कटकचे नायब – नाजिम बनून आले होते. ते फक्त नावाला हिंदू होते. जहांगीराबादेत त्यांची रखेली होती—उस्मानीबाई आणि त्यांनी तिच्या नावाने पुष्कळ जमीनजुमलाही खरीदला होता. वस्तुत: यात काही दोष नाही. पुरुष हा बहु–संभोगशील आहे. शास्त्रात तर बीजनिक्षेप पुरुषाचा धर्मच म्हणण्यात आला आहे. तेव्हा यवनीशी शरीरसंबंध ठेवून कल्याणमल्ल काही पतित ठरले नव्हते. त्यांच्यासाठी सिंहद्वार बंद नव्हतं झालं. रत्नसिंहासनाजवळ जाऊन ते पूजा–अर्चा करू शकत होते. मग महाराज रामचंद्रदेवांनाच हा प्रतिबंध काय म्हणून ?'

मुक्तिमंडपातल्या जमलेल्या शास्त्र्यांच्या गर्दीला हा युक्तिवाद देखील पटलेला दिसला. यावेळीही ते म्हणाले, "बरोबर आहे ! बरोबर आहे !!"

पढिआरी अजूनही बोलणार होते. पण नाकात तपकीर कोंबत तर्कालंकार त्यांना मध्येच थांबवून म्हणाले, 'अरे, अरे पढिआरीजी, मला एक सांगा. कल्याणमल्लनं उस्मानीबाईशी निका लावलान् होता काय ? ती त्याची रखेली होती. तो हिंदूंचा पक्का द्वेष्टा होता, अधर्माचरणी होता पण त्यानेही एकाद्या क्षुद्र कारणासाठी कल्मा पढून यवनीशी लग्नसंबंध नव्हता केला. समजलं ना ? हां, आता तुमचे महाराज म्हणत असतील की राणी आमची रखेलीच आहे...'

घोडेस्वार स्फोट व्हावा तसा किंचाळला, "बस् बस्. हे सगळं ऐकण्यात काही लाभही नाही महापात्र !"

पिसाट वाऱ्यामुळे विस्कटलेल्या केशसंभारासारख्या झुलणाऱ्या वेळूच्या पानांमधून चंद्राचे म्लान मुख दिसत होते. त्याच्याकडे पहाता पहाता राजा रामचंद्रदेवासमोर वनहरिणीसारख्या व्याकुळ, सुरम्याने विभूषित दोन नेत्रांमधील असीम वेदना आणि पक्व डाळिंबासमान लाल अधरोष्ठांवरील अव्यक्त विनंती तरळून गेली. बघता बघता चारी दिशा त्या डोळ्यांच्या विद्ध नजरेने भरून गेल्या.

विमनस्कपणे राजा म्हणाला,

"पतित झालेल्याचा उद्धार राहू दे. खुद्द जगन्नाथाला कसं वाचवायचं ते बघायला हवं."

महाराजांच्या स्वरात अचानक उमटलेल्या उद्विग्नतेने विष्णु महापात्र चकित झाले. हिंदूंचा कट्टर द्वेषी औरंगजेब मृत्यू पावल्यापासून श्रीजगन्नाथ तसे मोगल आक्रमणापासून सुरक्षित होते. दिव्यसिंहदेवाच्या कारकीर्दीत सातव्या वर्षी एकरामखाँने एकदा श्रीक्षेत्रावर आक्रमणाचा प्रयत्न केला होता; त्यानंतर कुणाही नायब-नाजिमाची शनिदृष्टी पुरीकडे वळली नव्हती. औरंगजेबानंतर एवढा क्रूर धर्मांध बादशहा कुणी झाला नव्हता. कटकचा नायब-नाजिम सुजाखाँ होता तेव्हापासून श्रीजगन्नाथ तसे सुरक्षितच होते; कारण सुजाखाँ सूफी होता म्हणून त्याची जगन्नाथावर अपार श्रद्धाच होती. म्हणून तर त्याने जगन्नाथ-रस्त्यावर चौक्या बसवून दस्यु वा मुसलमान फौजदार व अधिकाऱ्यांच्या अत्याचारांपासून दूर दूरच्या यात्रेकरूंचे रक्षण करण्याची व्यवस्था केली होती. औरंगजेबाच्या वेळेपासून तो लांछनास्पद जिझिया कर तर त्याने रद्द केलाच होता. तेव्हा जगन्नाथावरील मोंगल हल्ल्याची कल्पना उत्कलवासियांच्या डोक्यातून दुःस्वप्नासारखी केव्हाच हद्दपार झाली होती. म्हणून तर छोटे उपाध्याय जगन्नाथावर पुन्हा आक्रमण होणार आहे वा होण्याची शक्यता आहे या वार्तेवर एकदम विश्वास ठेवायलाच तयार नव्हते. मात्र पुरीतलं वातावरण भयग्रस्त होतं.

छोटे उपाध्याय म्हणाले, "जगन्नाथ म्हणजे अजिंक्य उत्कलचा आत्मा. प्रत्येक उत्कलवासियांच्या पंचप्राणांत त्याचा निवास आहे. तिथून त्याला कोण हलवणार ? शिवाय असं पहा, रक्तबाहु, मग राजुखाँपासून कालापहाड व एकरामखांपर्यंत ज्या ज्या हिंदुद्वेषी लोकांनी जगन्नाथावर आक्रमण केले ते सगळे मातीला मिळाले. पण नीलशैलवर अजूनही सुदर्शन चक्राची पताका फडकतेच आहे ना !"

दोन्ही हातांची घडी छातीवर बांधत उपहासपूर्ण स्वरात महाराज म्हणाले,

"तुमच्या या गोष्टी ऐकायला फारच छान आहेत. पण एक विसरलात. सुजाखाँ आता ओडिसाचा नायबनाजिम नाही आहे. त्याचा रखेलीपासून झालेला मुलगा तकीखाँ बहादूर दिलेरजंग त्याजागी आहे. हिंदूधर्माचे उच्चाटन आणि मूर्तिभंजन या बाबतीत राजुखाँ, कालापहाडलाही मागं टाकण्याची त्याची महत्त्वाकांक्षा आहे. बालेश्वर बंदरावर जेव्हा तो प्रमुख म्हणून होता तेव्हा सुवर्णरेखापलीकडचं एकही देऊळ त्याच्या तडाख्यातून सुटलेलं नव्हतं हे विसरलात महापात्र ?"

विष्णु पश्चिम कबाट महापात्र उतरले,

"पण शाहजहानाबाद दिल्लीत मोंगल बादशहा मुहम्मद इब्राहिमचं आसनही डळमळीत आहे. राजपुतान्यावरून जे गुमास्ते व यात्रेकरू आलेत ते म्हणत होते की दिल्ली दरबारात अमीर उमराव वजीर सरदार एकमेकात झगडताहेत आणि परिणाम म्हणजे मोंगल राजशक्ती खिळखिळी होतेय. चौथाई सरदेशमुखीच्या वसुलीसाठी मराठ्यांनी दिल्लीचे दरवाजे ठोठावायला प्रारंभ केलाय. मोंगलांचे विषारी दात पडायला लागलेत. जे स्वत:ला सांभाळू शकत नाहीत ते जगन्नाथावर कसलं आक्रमण करणार ?"

महाराज कडवट स्वरात म्हणाले, "भांगेत चूर असलेल्या यात्रेकरूंच्या शब्दावर तुम्ही संपूर्ण विश्वासायला लागतात तेव्हा खरोखरच श्रीजगन्नाथ धोक्यात आहे म्हणायला हरकत नाही. औरंगजेबाच्या मरणानंतर दिल्लीच्या बादशहापेक्षा त्याचे सुभेदारच जास्त शक्तिमान झालेत हे कसं विसरता तुम्ही ? बंग, बिहार व ओडिसात आता मोंगल शक्तीने घट्ट पाय रोवले आहेत. त्यातून मुर्शिदाबादचे काय विचारावे ? दिल्लीचे मयूरसिंहासनही फिक्कं पडतंय त्यापुढं. अफगाण डोक्यावर चढलेत. बंगाल्यात मराठ्यांनी धुमाकूळ घातलाय. दक्षिणेत हिंदूंचा द्वेष्टा प्रबळ पराक्रमी निजाम उलमुल्क फतहजंग बसलाच आहे. औरंगजेबाच्या वेळी उठवलेला तो जिझिया पुन्हा लादलाच गेला आहे. तरीही मराठे हात जोडून चूप बसलेत. कटकेत राज्य आहे हिंदू द्वेष्टचा तकीखाँचं. त्याच्याशी मैत्री करून प्रथम निजामाने चिलिका प्रांतावर हल्ला केला आणि तेवढा टापू मांडीखाली घातला त्यानं. त्याबरोबरच रघुनाथपुर–टिकालीही गेलं. प्राणांची बाजी लावून लढूनही निजामाला थोपवता आलं नाही.

महाराजांची छाती फोडून एक दीर्घश्वास बाहेर पडला. स्वतःला आवरत त्यांनी महापात्रला विचारले, " या सर्वांचा काय अर्थ होतो काही लक्षात येतंय का ?"

विष्णु महापात्र म्हणाले, " चिलिकेतली मिठागरं म्हणजे पैसा देणाऱ्या दुभत्या गाईच. त्या एकदा हातात आल्यावर निजाम थोडाच सोडणार ?"

महाराज असहिष्णु स्वरात म्हणाले, " मीठ नव्हे महापात्रजी. आजवर जगन्नाथ चिलिकेत आश्रय घेत आलेत प्रत्येक हल्यावेळी. म्हणून प्रथम चिलिका हस्तगत करून तो मार्गच बंद करण्यात आलाय. नंतरच अंतिम हल्ला. तकीखांचंही कृत्य याला पुष्टी देतं. नाहीतर पाठीमागून त्यानं खोर्घ्याच्या सेनेवर हल्ला कशाला केला असता ? आः! वेणु भ्रमरवरानं जर त्यावेळी विश्वासघात केला नसता तर... !"

महाराज गप्प बसले. भावनांच्या आवेगाने त्यांचा कंठ रुद्ध झाला होता.

मग स्वतःला सावरून ते म्हणाले,

" यासाठी आतापासून तयार रहा महापात्र ! या पंचवीस वर्षात एवढी शांतता लाभली होती की बहुधा रत्नसिंहासनावरून उचलून जगन्नाथाला कुठेतरी लपविण्याचे कौशल्य सगळेजण विसरूनच गेले असावेत. पहिल्यापासून दक्ष राहिलो नाही तर पुन्हा एकदा जगन्नाथाला रस्त्यावरून चामड्याच्या वाद्यांनी बांधून फरफटवलं जाईल...... त्यात अशक्य काही नाही."

समुद्र जणू त्यावेळी अनैसर्गिक रीतीनं स्तब्ध झाला होता. त्याच्या पापण्यांत वरच्या मलिन आकाशातील ढगात गुरफटलेल्या विकलांग चंद्राच्या स्वप्नातुर चांदण्याने जणू नीज भरली. बांबूच्या वनातला वेडा वाराही चूप बसला होता. चंद्रप्रकाशात जंगलातली ती तोरणासारखी, निद्रिस्त पायवाट, तिच्यामध्ये समुद्राची वाळूच दिसत होती. समुद्रतटीचा सपाट वालुकामय प्रदेश...आणि त्याच्या पलीकडे तंद्रामग्न समुद्र !

श्रमाने आणि दुःखाने महाराजांनी कित्येक वेळा कपाळावर हात फिरवला. त्यांच्या डाव्या हातातली हिऱ्याची अंमठी अंधारात स्फुल्लिंगासारखी चकाकत होती.

त्या डोळ्यांत किती किती रात्रींची झोप साठली होती. बांबूचं वन मंद सुरात अंगाई गुणगुणत होतं...त्यानं पापण्या जड होत होत्या...पण वेळ नाही . अंतहीन मार्ग समोर...चाललंच पाहिजे.

महाराज सातलहरी मठापाशी आले. त्यांनी घोड्यावर टांग मारली आणि तीरासारखे सुटले. जाताना सांगून गेले, " महापात्र, चलतो मी. कदाचित एवढ्यात तुमची माझी भेट व्हायची नाही. पण दक्ष रहा...समजलं ना ? जागृत रहा."

दोघेही जण जणू रात्रीच्या घनांधकारात अदृश्य झाले.

ते दोघेही गेल्यावर चंद्रप्रकाशात एक जण जंगलातून आला आणि मठाजवळच प्रतीक्षा करत असलेल्या मुख्य उपाध्याय गौरी राजगुरूजवळ आला. सातलहरी मठात मृत्यूशय्येवर पडलेल्या वृद्धाचा मुलगा म्हणवणारा तोच होता तो.

गौरी राजगुरू त्याच्याकडे पाहून म्हणाले, " सगळं ऐकलंच आहेस तू. पिपिलीचा फौजदार मुनीमखाँ जंगबहादूर आहे ना, त्याला सांग शब्दन् शब्द. खोर्धा राजाची मान खाली झाली आहे, फणा ठेचलाय पण म्हणावं, दातांत विष शाबूत आहे अजून. म्हणून म्हणावं, जगन्नाथाचे नाव घेत इकडे तिकडे फिरून लोकांना चिथावणी देत भडकावताहेत. पण म्हणावं जोवर गौरी राजगुरू आहेत तोवर तकीखाँला हवं त्याचप्रमाणेच श्रीक्षेत्रात चालत राहील. राजा रामचंद्र देवाचं प्रत्येक कारस्थान, प्रत्येक हालचाल त्याला कळत राहील. काळजी करू नका."

मघाचा तरुण पिपिलीच्या फौजदाराचा गुप्तहेर होता. त्याने विचारले,

"हे रामचंद्रदेव कुठले ? हे तर खोर्धाचे राजा हाफिज कादर आहेत."

गौरी राजगुरू म्हणाले, " तेच रे बाबा तेच. कटकमध्ये असले की वारंवार कलमा पढतात न् मुसलमान बनतात. आणि 'वालिअंताघाट' पार करून आले की राजा रामचंद्रदेव होतात. कुठे गेले ते तैलंग मुकुंदाचे पुत्र, नातू, गजपती सिंहासनाचे उत्तराधिकारी ! आणि आता ज्याच्या कुळशीलाचा पत्ता नाही अशा सुनाखलागढाच्या नरसिंह जेनामणीचे हे नातू रामचंद्र देव, महाराज हरेकृष्ण देवांचा पुतण्या बनून येतो काय न् गजपती सिंहासनावर हक्क सांगतो काय !"

जेव्हा तो तरुण घोड्यावर स्वार होऊ लागला तेव्हा राजगुरू मागाहून ओरडून त्याला म्हणाले,

"आणि हे बघ, खाँसाहेबांना म्हणावं माझं इनाम मला अजून मिळालं नाही. तिन्ही त्रिकाळच्या संध्येत मी त्यांना आशीर्वाद देतो. त्यांना मुर्शिदाबादची नबाबगिरी मिळावी अशी प्रार्थना करतो म्हणावं. काय ?"

छद्मवेषधारी युवक अदृश्य झाला.

त्याच्याकडे आपली बुभुक्षित नजर रोखून गौरी राजगुरू किती तरी वेळ स्वतःच्या तासलेल्या डोक्यावरून हात फिरवत राहिले.

# दोन

## 1

खोर्द्याच्या बरूणेड राजमहालातलं अंत:पुर विलक्षण नि:स्तब्ध होतं. कुठे सुई जरी पडली असती तरी आवाज ऐकू आला असता. किल्याच्या तीन बाजूला बांबू आणि वेताचे जंगल आहे; आत फक्त कबुतरांचे घुमणे ऐकू येते आहे. शिवाय सांजवेळ आहे. उदासीनता अधिकच वाढलीय.

रामचंद्रदेव उर्फ हाफिज कादर बैठकखान्यात एका हस्तिदंती आसनावर एकटेच बुद्धिबळाचा डाव मांडून बसलेत. आसनाच्या चारी बाजूला रंगीबेरंगी मखमलीनी मढवलेली आसनं रिकामी पडली होती. आज तिथं विश्वासू सहकाऱ्यांपैकी किंवा इतर दरबारीयांपैकी कुणीही नव्हतं. रामचंद्रदेव सुद्धा खरोखर खेळत होते की खेळाचा बहाणा करून डाव्या हातावर मस्तक टेकवून विचारात गढले होते कोण जाणे ! त्यांच्या प्रशस्त ललाटावर चिंतेच्या रेषा दिसत होत्या. कपाळावर झेपावलेली केसांची बट आणि वाढलेली दाढी यामुळे चेहरा झाकोळल्यागत दिसत होता. गळ्यातली रुद्राक्षांची माळ, कपाळावरचा टिळा आणि नेसलेले भगवे धोतर यामुळे ते एखाद्या कापालिकासारखे दिसत होते. त्यांना न ओळखणाऱ्यांपैकी कुणीही पाहिले असते तर हेच म्हटले असते. त्या दिवशी संध्याकाळी याच वेशात पुरी मंदिरासमोर ते उभे होते तर लोक त्यांना कापालिक समजले होते.

बुद्धिबळाच्या पटावरती दोन्ही बाजूंनी घोडे व तिसऱ्या बाजूने हत्ती असा राजा घेरला होता. रामचंद्रदेव बहुधा राजाला वाचवण्याच्या चालीचा विचार करत असावेत. एकच बाजू राजासाठी सुरक्षित होती. पण त्या बाजूने गेले तरी दोनतीन खेळीत राजाला शह बसला असताच. वाढलेल्या दाढीवरून हात फिरवत राजा रामचंद्रदेव त्याच खेळीवर विचार करत होते.

पण बारकाईने पहाणाऱ्यास सहज कळून आले असते की त्यांचे लक्ष खेळावर नाही आहे. मधून मधून ते इकडचं प्यादं तिकडं उचलून ठेवत होते. मधूनच ते स्वगत पुट-पुटले, " अजून नाही मात झाली...अजून नाही. त्यादिवशी जर ऋषिकुल्या खाडीतून

चिलिकेत जायला होडी मिळाली असती तरी मालुदच्या सेनापतीला कळलं असतं मला रोखून धरणं म्हणजे काय असतं ते ?"

पण तसं व्हायचं नव्हतं. तसं झालं नाही. मालुद सेनापतीच्या एकाच खेळीत मात झाली.

त्यानंतर लोखंडाच्या पिजऱ्यात बंद करून एखाद्या जंगली श्वापदासारखं त्यांना वारंवार कटकला आणण्यात आलं होतं.

त्या कडू लाजिरवाण्या आठवणी जाग्या झाल्याबरोबर त्यांचे मस्तक एकदम गरम झाले. मस्तकावरचे केस मुठीने उपटत ते उठले आणि खिडकीपाशी येऊन उभे राहिले.

राणीहंसपुराचे प्रासाद निर्जन होते. रामचंद्रदेवांनी धर्मांतर केले व रजियाशी निका लावला ही बातमी कळताच महाराणी ललितादेवी युवराज भागीरथीकुमारला घेऊन माहेरी निघून गेली होती. नुसती नव्हे, प्रतिज्ञा करून गेली होती की आमरण खोर्ध्याच्या मातीलादेखील शिवणार नाही. दुसऱ्या दोघी सवतींनीही तिचंच अनुकरण केलं होतं. परित्यक्त राणीहंसपुराच्या पश्चिमेच्या बाजूला रजियासाठी नवा महाल बांधण्यात आला होता. पण रजियाही कटकमध्येच होती. ओलीस ठेवल्यागत. आठवड्यातून एकदा तरी रामचंद्रदेवांनी कटकला यावं आणि आपल्या निष्ठेचा पुरावा अशा रीतीने तकीखाँला द्यावा म्हणून रजिया लालदुर्गात बंदिनीचं जिणं कंठीत होती.

खोर्ध्याचा किल्ला चारी बाजूने मेघनाद तटानी अभेद्य केला होता. शिवाय चारी बाजूला काटेरी बांबूचे, जाळीदार वेतांचे जंगल. तोफांचे गोळे तर सोडाच पण एकटा दुकटा शत्रुसैनिक, खबऱ्या, टेहळ्या त्या जंगलातून वाट काढत येऊ शकत नसे. फक्त उत्तर दिशेच्या बाजूचा तट तोफांच्या मारगिरीने थोडासा ढासळला होता, खान – ए – दौरांच्या आक्रमणाच्या वेळी.

भोइ मुकुंददेवांच्या वेळची गोष्ट आहे ही.

त्या दिवसापासून आजतागायत त्याची दुरुस्ती झालीच नाही. भोइ मुकुंददेवाच्या कारकीर्दीत वारंवार आक्रमण व्हायचे. त्यामुळे खोर्धा राजधानी कधी जागेवर असायची कधी नसायची. अक्षरशः आज इथं तर उद्या तिथं अशी स्थिती होती तिची. खोर्धा राजधानीला काखेखाली लपवून. दुर्गम गुंफापासून ते दूरदूरच्या खेड्यापाड्यांपर्यंत वणवण भटकल्यासारखे गजपती इकडून तिकडे हिंडत होते. आजही खोर्ध्याचं नशीब बदललेलं नाही.

उत्कलचे स्वातंत्र्य त्याच्या प्राणात होते; आणि तो प्राण म्हणजे अन्नवस्त्रहीन, असंख्य अत्याचाराने पीडित असा उत्कलवासी. एक वेळ किल्ल्याचे तट कोसळतील पण मनाचा तट खंबीर होता. तरीही दुर्गाच्या काही खास तटांवर तीरंदाज गोलंदाज

पाषाणमूर्तीसारखे उभे होते. संध्याकाळच्या उन्हात तटावरच्या पितळी तोफा चमकत होत्या.

मेघनाद तटाच्या दक्षिणेला असणाऱ्या रानावनांनी भरलेल्या बरुणेई पर्वतांना छेदून सापासारखा रस्ता जात होता पुरीला. रथीपूर व पिपीलीवरून जाणाऱ्या रस्त्याने जाण्याऐवजी जर या रस्त्याने गेले तर थोडक्या वेळात पुरीला पोचता येते. युझारसिंह व बरुणेई गडाकडून पुरीकडे जाणारे यात्रेकरू या रस्त्यानेच जातात. शिवाय मोंगलांचाही या रस्त्याला उपद्रव नसे. घाटीच्या वर बरुणेई शिखर दर्शविणारा स्तंभ गडाच्या एकटचा एक पहारेकऱ्यासारखा आकाशाला भेदत असल्यासारखा अपराजेय, अटळ उभा होता. त्या स्तंभावर चढून, डोळयांना दुर्बिण लावून दिशा न्याहाळून नजर ठेवणारा शिपाई ढळत्या तिन्हीसांजेच्या प्रकाशात एखाद्या सावलीसारखा दिसत होता. त्या स्तंभावरून केवळ पुरीच्या मंदिरावरचे नीलचक्रच नव्हे तर दक्षिणेकडचा चिलिकाचा हेलावता नीलसागरही सहज दिसत असे.

रामचंद्रदेवाने एक मोठा श्वास घेतला आणि ते बुद्धिबळाच्या पटाकडे आले. पटावरची मोहोरी इकडे तिकडे करून पुन्हा त्यांनी राजाला दोन्ही हत्तींच्या मध्ये ठेवून पुन्हा पट मांडायला सुरुवात केली.

पण एकदम समोर फोटोग्राफ धरावा त्याप्रमाणे त्यांच्या मनःचक्षूंसमोर टिकाली रघुनाथपूरची लढाई व चिलिकाच्या किनाऱ्यावरच्या मालकुदा गावची आठवण आली.

लढाई झाली असती तर गोष्ट वेगळी होती. पण त्यादिवशी लढाईविनाच मालूद सेनापतीने शह दिला आणि मात केली. आणि पहाता पहाता रामचंद्रदेव लोखंडी पिंजऱ्यात कैद करून हत्तींच्या पाठीवर जखडले गेले होते.

बुद्धिबळीच्या डावातले ते दोन्ही हत्ती त्यांना भालेरीतल्या मर्दकोट घाटीतल्या अंतिम क्षणांची आठवण करून देऊ लागले.

ही अशी मर्दकोट छत्रद्वार घाटी आणि हे आहे भालेरी पर्वताचे दोन तट......तटाखालीच मर्दकोट गढाचे छत्रद्वार जागृत दैवताप्रमाणे खडे आहे. तटात आपोआप बनलेल्या खिंडारांत काटेरी वेळूच्या आसऱ्याने तीरंदाज दक्ष उभे आहेत. पर्वतशिखरांवर खास बांधून काढलेल्या मोर्चावर बंदूकधारी बंदुक घेऊन उभे आहेत. पर्वतावरून दूरवर दिसणारा चिलिकेचा नीलसागर सूर्यकिरणांत झगमगतो आहे. मालुदच्या बाजूने मोगल सेनापती बशीरखाँ आला तर त्याला अडवण्यासाठी आठगड व हुमारगडचे 'पाइक' सेना घेऊन तयार आहेत. घाटीच्या तोंडाशी हत्तींनी ओढावयाच्या रथांवर तोफा सज्ज आहेत. पायदळाचे सैनिक बर्ची तलवारीनिशी घोडचांवरून घाटीच्या चारी बाजूला तळपता पहारा करताहेत. त्यांच्या खांद्यावर बंदुका झुलताहेत. याच मर्दकोट छत्रद्वार

घाटीत पूर्वी खाल्लिकोट, हुमा, गंजागड आणि पुरुणागड महुरीच्या 'पाइकां'नीं मोगल नाजिम वकीरखाँला धूळ चारली होती. शिवाय मोंगल सेनेला डोंगराळ भागात लढण्याचा सराव नव्हता हेही एक सबळ कारण होतं. हे लक्षात घेऊन चिकाकोलच्या सेनापतीकडून होणाऱ्या खोर्धाच्या दक्षिण सीमेवरच्या संभाव्य हल्ल्याला तोंड देण्याच्या दृष्टीने राजा रामचंद्रदेवाने या घाटीला सुसज्ज केलं होतं.

शके १७२८ मधली ही घटना आहे. रामचंद्रदेवाच्या कारकीर्दीतले चौथे वर्ष.

## 2

तोडरमल आणि मानसिंहाच्या वेळेपासून खोर्धा राजाला पदच्युत करण्यासाठी मोगल फौजदार व सेनापतींकडून हल्ल्यावर हल्ले होत आले होते. मराठ्यांशिवाय प्रबळ मोंगलसत्तेशी झुंज देणारी जर कुठली शक्ती असेल तर उत्कलचे हे 'पाइक'. आपल्याकडच्या इनामदार जहागिरदारांसारखे.

त्यांच्यातदेखील विश्वासघातकी नव्हते असं नाही. कधी उत्कल राजांनाच त्यांनी कैदेत टाकलंय तर कधी अब्रू वाचवण्यासाठी नजराणे दिलेत. पण तरीही अद्याप खोर्द्याचा कुठलाही राजा मोंगलांचा अंकित झाला नव्हता.

मानसिंहानेही काही केवळ जगन्नाथावरच्या भक्तीमुळं खोर्द्याचं स्वातंत्र्य कबूल केलं नव्हतं तर त्याच्यासारखा अफगाणावर विजय मिळवणारा सेनापतीदेखील कटकहून दक्षिणेला सरकत होता तेव्हा त्याची फौज काटजोडी पार करून सारंगगढापर्यंतही पोचू शकली नव्हती. तेवढ्यावरून त्यांना उत्कलमधल्या लढाऊ पाइकांच्या पराक्रमाची कल्पना आली होती. या अपराजेय शक्तीशी भांडत बसून आत्मनाश करून घेण्यापेक्षा मैत्री ठेवणं जास्त फायद्याचं होईल हे त्यांनी ओळखलं होतं. शिवाय त्यामुळे ओडिसामध्ये वारंवार बंड करून उठणाऱ्या अफगाणांना शह देणारी शक्ती खोर्धाच्या रूपाने सज्ज राहील असे अनुमान दूरदृष्टीच्या मानसिंहाने केले होते.

ओडिसामध्ये हिंदू राजशक्तीच्या इष्टदेवाच्या आणि दैवी राजा वा सम्राटाच्या रूपात जगन्नाथालाच मानत असत. उत्कलचा राजा जगन्नाथच होता. म्हणून तर अनंग भीमदेवापासून उत्कलच्या राजसिंहासनावर कुणाही राजाला राज्याभिषेक करण्याची प्रथा प्रचलित नव्हती. म्हणून जगन्नाथाबरोबर खोर्धा राज्याला मोंगलांच्या वक्रदृष्टीपासून वाचवायसाठी मानसिंहाने खोर्धाचे स्वातंत्र्य मान्य करून ते बंधुराष्ट्र असल्याची घोषणा

केली होती. खोर्धाचं हे राजनैतिक स्वातंत्र्य म्हणजे काही मानसिंहाची दया नव्हती. त्यामागे उत्कलच्या वीर पाइकांचं रक्त पाण्यासारखं वाहिलं होतं. मोंगल सम्राट अकबर जोवर हयात होता तोवर खोर्धा बरोबरच जगन्नाथ देखील एक प्रकारे निश्चित होता.

पण अकबराचा मृत्यू झाल्यावर जहांगीरापासून ते औरंगजेबापर्यंतच्या कोणत्याही बादशहाला मानसिंहाचे हे उदार धोरण रुचले नाही. व खोर्धाच्या राजाला सिंहासनावरून खाली ओढण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू झाले. हाशिमखाँ, कल्याणसिंह, मुनिमखाँ आणि दुर्धर्ष खान–ए–दौरां इत्यादी अनेक मोगल सेनापतींनी खोर्ध्यावर वारंवार आक्रमण करून त्याला जिंकण्याचे असफल प्रयत्न केले. लढाईत खोर्धा कैक वेळा पराभव पावलं. कुशभद्रा, भार्गवी, दया इत्यादी नद्या पाइकांच्या रक्ताने लालभडक झाल्या. खडकाळ जमीन स्मशान बनली. पण इतिहासात यातल्या विजयी वीरांचं नाव कुठंच राहिलं नाही. तोडून टाकलेल्या वृक्षातून नव्या पालवीने डोके बाहेर काढावे तद्वत् खोर्धाच्या राजशक्तीने पुन्हा डोके वर काढले होते.

अशाच तऱ्हेने खोर्धाशी शक्तिबळात लपंडाव खेळत जगन्नाथाबरोबर खोर्धा राज्यही अजिंक्य राहिलंय.

पण हीच आजवर कुणालाही साध्य न झालेली गोष्ट करून दाखवायची असा चंग बांधूनच तकीखाँ कटकचा नायबनाजिम बनून आला होता. त्याला हे बरोबर ठाऊक होतं की जगन्नाथ उत्कलचे केवळ आराध्यदैवत नव्हते. तर त्यांच्या स्वाभिमानाचे आणि राजकीय दृष्टया खंबीरपणाचेही द्योतक होते. खोर्ध्याचे गजपती राजे जगन्नाथाचे परंपरागत सेवक अन् म्हणून ते गुणादुर्गुणात कसेही असले तरी अवघ्या उत्कलवासियांस पूज्य होते मग त्यात मोंगलांचे अंकित असलेले किल्लेदार, जहागीरदार कुणीही असोत. उत्कलच्या राजनीतीची सूत्रेदेखील जगन्नाथच धारण करत होता. म्हणून तर इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा करण्याचे तकीखाँच्या मनात होते. खोर्धाबरोबर जगन्नाथाचाही काटा दूर करायचा. पूर्वीचा अनुभव लक्षात असल्यामुळे तकीखाँला हे माहीत होतं की मोंगल सेना कितीही पराक्रमी असली तरी डोंगरी युद्धाचा सराव असलेल्या धुरंधर पाइक सेनेला जिकणं अशक्य आहे. म्हणून आता त्याने उत्तर व दक्षिण दिशेकडून हल्ला करून खोर्ध्याची मानगूट पकडण्याचंच ठरवलं होतं. उत्तरेहून तकीखाँ स्वत: आणि दक्षिणेच्या बाजूने चिकाकोलचा सेनापती जुल्फिकारखाँ नसरतजंग चढाई करणार होते. चिकाकोलच्या उत्तर सीमेवरचे रघुनाथपुर टिकाली ताब्यात घेऊन तो कालुपडापर्यंत येणार होता; आणि याच वेळी तकीखाँ प्रथम खोर्धा सर करणार होता आणि लगेच पुरुषोत्तम श्रीक्षेत्र पुरी. खान–ए-दौरांलाही जे करता आलं नाही ते तकीखाँ करून दाखवणार होता.

तकीखाँच्या या सगळ्या कारवायांची, हालचालींची बातमी राजा रामचंद्रदेवाना वेळोवेळी मिळत होती; आणि संकटाला कशा रीतीनं तोंड द्यायचं याबद्दल त्यांचीही तयारी चालू होती. थोड्याशा घोडेस्वारांनिशी व पायदळ शिपाई बरोबर घेऊन माघार घेत घेत ते टिकालीहून मर्दकोट छत्रद्वार घाटीपर्यंत येणार होते. चिकाकोलच्या सेनापतीने – जुल्फिकारखाँने साहजिकच अटकळ बांधली असती की आता काय ! विजय आपलाच आहे. सैन्यात थोडी शिथिलता नाही म्हटलं तरी येतेच. अशा वेळी जेव्हा तो कालुपडाच्या दिशेने आगेकूच करील तेव्हा पिछाडीहून विजयराजू आपली तैलंग सेना घेऊन त्याच्यावर हल्ला करील, शिवाय काशिमपेटचाचे बाहुबलेंद्रही त्यांच्या बरोबर असतील. इतकं करूनही समजा, चिकाकोलची सेना जयंतगड ओलांडून, बाहुदा नदी पार करून आलीच तर जरडा, सुरंगी आणि खेमंडीचे किल्लेदार तिला महेन्द्रगिरीपाशी रोखतील. तिथे त्यांच्या मदतीला रामगिरी दुर्गाचे शिगाराजू आपले व्याघ्रचर्म पांघरणारे भीमकाय कंध सैनिक घेऊन तयार असले असतील. यातून जुल्फिकारखाँची सेना वाचून निभवणे कठीण; पण निभवले तर शेवटी छत्रद्वार घाटी होतीच. छत्रद्वारातच हिंदुशक्तीचा व मोंगल सत्तेचा अंतिम लढा व्हावा अशी नियतीची इच्छा होती. जणू ते जाणूनच रामचंद्रदेवने आपलं सगळं रणकौशल्य खर्चून व्यूह रचला होता. मर्दकोट गढ आणि छत्रद्वारघाटीची जबाबदारी प्रत्यक्ष रेणु भ्रमरवरवर होती. गंजागडचे कृपासिंधु मानसिंह वेणु भ्रमरवरचे प्रत्यक्ष भगिनीपती आहेत. समोरून ते छत्रद्वारचे रक्षण करतील. उत्तर दिशेला कालुपडाच्या जवळ तकीखाँच्या सेनेला जरिपडागढचे हरिहर रायसिंह आणि नरणगढचे शत्रुघ्न वैरीशल्य रोखून धरतील. त्यांच्या मदतीला बाणपूरचे राजा गोविंद हरिचंदन असतील. शिशुपालगडापासून पावला पावलावर तकीखाँला प्रतिकार व्हावा अशी योजना होती.

रामचंद्रदेवाचे रक्त सळसळू लागले. इतिहासाशी जुगार खेळताना तीच तर एक शेवटची बाजी त्याने लावली होती.

शत्रूच्या विरुद्ध व्यूह रचता येतो पण विश्वासघातापुढे कुणीही झालं तरी काय करणार ? इतिहासातदेखील विश्वासघातापुढे हात टेकल्याचेच पुरावे मिळतात. त्या दिवशी छत्रद्वारघाटीतही तेच झाले.

प्रत्यक्ष वेळ समोर येऊन उभे ठाकेतो राजा रामचंद्रदेवदेखील या सत्याला ओळखू शकले नव्हते.

टिकालीच्या जवळ रामचंद्रदेवाने पाहिलं की तेथे फक्त काशिमपेटचाचे बाहुबलेंद्र व त्यांची सेना आहेत. राजमहेंद्रीचे राजूदेखील शेवटपर्यंत कुठे दिसले नाहीत. थोडासा मुकाबला करून रामचंद्रदेवाने माघार घेतली. चिकाकोलच्या सैन्याच्या दृष्टीने बाहुदा

नदी पार करणे तितकेसे सोपे नव्हते पण जयंतगडचे किल्लेदार हरिहर विश्वास रायने, देखील अखेरच्या क्षणी विश्वासघात केला आणि किल्यातून बाहेर आलेच नाहीत. आपल्या व्यक्तिगत स्वार्थांची जपणूक करताना समष्टीच्या स्वातंत्र्याचा, स्वार्थाचा कुणी विचारच करत नव्हतं. चिकाकोलची फौज पायदळ, घोडेस्वार, गोलंदाज, तिरंदाज वगैरे सर्व मिळून वीस हजार होती. बाहुबलेंद्रची छोटीशी फौज तिच्याशी लढून किती लढणार? शिवाय. त्यांची सगळी शक्ती तिथेच खर्च व्हावी अशी रामचंद्रदेवाचीही इच्छा नव्हती. हां राजूचे तेलंग सैनिक मदतीला आले असते तर मग चिकाकोलवर हल्ला करता आला असता.

पण ते शक्य झालं नाही. बाहुबलेंद्र कसेबसे आपले प्राण वाचवून काशिमपेटचाला परत गेला. महेंद्रगडाच्या जवळ पूर्वी ठरल्याप्रमाणे जरडा व खेमंडीच्या पाइकांनी जुल्फिकारखाँच्या सेनेला तोंड दिले होते. पण महेंद्रगिरीगड पार करणे त्याला खरं तर अशक्य केलं ते रामगिरिगढच्या शिंगाराजूच्या व्याघ्रचर्म नेसलेल्या कंध सैनिकांनी. त्यांनी तीरकमानींनीच कमाल करून दाखवली. त्यांच्यापैकी शे-सव्वाशेंहून जास्तच मारले गेले. पण जुल्फिकारखाँच्या सैन्याचीही नासधूस केल्याशिवाय सोडली नाही. तेव्हा मिळालेल्या वेळेचा उपयोग करून रामचंद्रदेव छत्रद्वार घाटीकडे धावले. मागून आक्रमण करून चिकाकोलवर कबजा करण्यात काही अर्थ नव्हता. छत्रद्वारापासचा जर जुल्फिकारखाँचा हल्ला परतवून लावला नाही तर खोर्ध्याचाच शेवट ठरलेला.

म्हणून दिवसरात्र न बघता रामचंद्रदेव छत्रद्वार घाटीकडे धावले. बरोबर फक्त दोनशे सैनिक होते. पायदळातले बरेचसे भुकेने म्हणा किंवा श्रमाने मेले होते. वाच-लेल्यांची दृष्टी छत्रद्वारावर खिळली होती. 'जय जगन्नाथ' चा घोष करत ते चालले होते.

पहाट व्हायला थोडा अवघी होता. अजून अंधार रेंगाळत होता. – फूलटाच्या जवळ जुल्फिकारखाँची फौज पोचल्याची खबर एक दिवस आधीच रामचंद्रदेवाला लागली होती. म्हणजे ऋषिकुल्या नदीपाशी पोचायला त्यांना फार तर एक दिवस लागायला हवा; कारण महेंद्रगिरी सोडला तर त्यांना प्रतिबंध असा कुठे नव्हताच. म्हणून कसंही करून संध्याकाळच्या आत छत्रद्वार घाटीला पोचणं रामचंद्रदेवाला आवश्यक होतं. त्या हिशेबानेच दोनशे सैनिकांनिशी रामचंद्रदेव निघाले होते.

थोड्याच वेळात उषेच्या स्निग्ध कोमल आरुण प्रकाशात न्हाणारी, ऋषींनाही मोह पाडणारी ऋषिकुल्या नदीची नीलवेणी त्यांना दिसणार होती. त्यानंतर गंज... त्यानंतर छत्रद्वार... त्यानंतर... त्यानंतर... .

ऋषिकुल्याच्या दक्षिण सीमेवर सगळा उजाड प्रदेश होता. अचानक रामचंद्रदेव तिथे

खांबागत उभे राहिले. पहाटेच्या अंधुक उजेडात शंभरेक पताका मंद मंद वाऱ्यामुळे फडफताना दिसत होत्या. लक्षपूर्वक पाहिल्यास दिसत होतं की सैन्याची छावणी पडली आहे. ऋषिकुल्याच्या उत्तरसीमेवर जणू कुणी सैन्याचा अर्धचंद्राकार व्यूह रचलाय.

कोण असेल बरं ? तकीखाँच्या सैन्याने काय छत्रद्वार जिकलं आणि आता तो दक्षिणेच्या बाजूला सरकतोय ? बक्सी वेणु भ्रमरवरचा पराभव झाला म्हणायचा ? मग गंजागढचे मानसिह काय करत होते ? इतका रचलेला व्यूह वाळूच्या किल्ल्या-सारखा जमीनदोस्त झाला ?

एवढ्यात एक सैनिक हर्षाने म्हणाला,

"हे सैन्य बक्सी सामंतांचे आहे. मोगल फौज असती तर पताका हिरव्या असत्या या तर भगव्या दिसताहेत."

खरंच ! उजळून उठणाऱ्या आसमंतात त्या भगव्या पताका पाहून रामचंद्रदेवाच्या सैन्याचा अभिमान, पराक्रम दुप्पट झाला होता. पण रामचंद्रदेवाच्या मुखातून अस्पष्ट विव्हल नाद आला. पहाटेच्या मंद वाऱ्यात फडफडणाऱ्या बक्सीच्या पताका रामचंद्र-देवाचा पराजय सुचवत होत्या.

छत्रद्वार सोडून बक्सी इथं का आले ? या संधीचा फायदा घेऊन मालुदच्या सेना पतीने नक्कीच एव्हाना छत्रद्वारावर कबजा केला असणार. एवढी सुवर्णवेळा कोण सोडतो ? राजपूर टापूत चिकाकोलच्या फौजेला रोखून धरणं अशक्यच होतं पण कितीही तयारीनिशी, कितीही संख्येनिशी ती छत्रद्वाराकडे आली असती की तिचा पराभव करणं सहजशक्य होतं. पण इथे राजपूरच्या वाळूभरल्या प्रदेशात रामचंद्र-देवाची सेना सावरीच्या कापसागत कुठल्याकुठे उडून गेली असती.

आता आत्मरक्षणासाठी केवळ गंजागढचा आसरा घेणं भाग आहे. तिथून तर कसंही करून बाणपूरच्या गोविंद हरिचंदनशी संधान बांधता आलं असतं तर कदाचित् चिका-कोलच्या फौजेला रोखणं अजूनही जमलं असतं. "जय जगन्नाथ" "मा भैः" असा घोष करून राजपुरकडे रामचंद्रदेवाने घोडा दौडवला.

रामचंद्रदेवाचे स्वागत करून त्यांना घेऊन जाण्यासाठी समोरून घोड्यावरून बक्सी वेणु भ्रमरवर येत होते. रामचंद्रदेवानी मध्येच बक्सीच्या घोड्याचा लगाम खेचून त्यांना थांबवले. अचानक घोडा थांबल्यामुळे बक्सी किंचित् पुढे झुकले.

रामचंद्रदेवानी विचारले, "हे काय केलंत बक्सी तुम्ही ? काही प्रतिकार न करताच छत्रद्वार घाटी मालुद सेनापतीच्या हवाली केलीत; आता मागून चिकाकोलचा सेनापती वीस हजार फौज घेऊन येतो आहे. एवढ्या प्रबळ मोगल शक्तीला तुम्ही कसं तोंड देणार ?'

बक्सी लगेच काही बोलले नाहीत. रामचंद्रदेवाच्या नजरेला नजर देण्याचे नैतिक बळ त्यांच्यात नव्हते.

घोर विश्वासघातक्याचाही, मग तो कितीही क्रूर असता तरी, अशा असहाय्य व सरळहृदयी स्वामीशी बोलताना कंठ भरून आला असता. बक्सीदेखील याला अपवाद नव्हते. उत्तर देण्याआधी ते डगमगलेच होते. दृष्टी आपोआप दुसरीकडे वळली.

पुन्हा एकदा असहायपणे रामचंद्रदेवांनी विचारले, "हे तुम्ही काय केलंत बक्सी ?"

बक्सीच्या शुष्क चेहऱ्यावरच्या रेषा कठोर झाल्या. कवटीसारखं दिसणारं तासलेलं डोकं, कपाळाखालचे खोल डोळे परशुधारेसारखे झगमगले. पण लगेच त्यांनी स्वतःला सावरले. मग साध्या सरळ आवाजात ते म्हणाले, "समोर चिकाकोलची फौज आहे... मागेही आहे. मालुदच्या छत्रद्वार घाटीत आम्ही दोन्ही बाजूंनी येणाऱ्या हल्ल्यातून कसे काय बचावणार होतो ?"

पण म्हणजे याआधी निश्चित केलेला सगळा व्यूह, चर्चा बक्सी विसरून गेले होते म्हणायचे काय ? घाटाच्या उत्तरेला तोफा तयार होत्या – त्यांनी मालुद फौजेचा चिलिका तटावरून पुढे येताच निःपात केला असता. घाटीच्या मागे चिलिका तटावर तिरंदाज तय्यार बसले होते. त्यामुळे छत्रद्वार घाटीला पाय लावणंच मालुद सेनापतींना अशक्य होतं.

बक्सीशी वृथा युक्तिवाद करण्यात अर्थ नव्हता हे रामचंद्रदेव समजून चुकले. पण बक्सीच्या स्वरात निर्भयता होती. ते म्हणत होते, "महाराज, आपण कसलीही चिंता करू नका.राजपुरहून देखील चिकाकोलच्या फौजेला आपण मागे हटवू शकतो. आपल्या पाठीशी गंजागडचे कृपासिंधु मानसिंहही आहेत." बुडत्याला काडीचा आधार वाटावा तशी अवस्था रामचंद्रदेवांची गंजागडचे नाव ऐकून झाली. पूर्वी गंजागडनेच अशा अनेक संकटांना तोंड दिलं होतं. कृपासिंधु मानसिंह जर मनात आणतील तर चिकाकोलच्या फौजेला ऋषिकुल्याच्या पैलतीरी सहज रोखू शकतील.

रामचंद्रदेवाने हुकूम दिला,

"बक्सी, तुम्ही ऋषिकुल्याच्या उत्तरेला सैन्य तयार ठेवा. मी गंजागडला जातो." आणि ते गंजागडकडे निघाले. बाकी सैन्य बक्सीच्या मदतीला ऋषिकुल्याच्या उत्तरेला राहिलं. टापांनी उडणाऱ्या धुळीच्या ढगात हळू हळू अदृश्य होत जाणाऱ्या रामचंद्रदेवाकडे पहाताना बक्सीच्या मुखावर एक कुटिल हास्य झळकलं आणि भुवयांत विलीन झालं.

डोक्यावर ज्येष्ठाचे ऊन आपली आग वर्षत होते. वाळूच्या प्रदेशांत दूर दूरपर्यंत मृगजळाचा निळावा झगमगत होता.

## 3

बुद्धिबळाच्या पटावरून सगळी मोहरी रामचंद्रदेवाने इकडे तिकडे फिसकारून दिली जणू फार जुन्या, गहिऱ्या जखमेवर पुन्हा कुणी घाव घातला...

रामचंद्रदेवाने पुकारले, "कोणी आहे ? पहारेकरी..."

रिकाम्या महालात राचंद्रदेवाच्या हाकेचा प्रतिध्वनी फिरून त्याच्यापाशी आला... आज लोधूमिया खलीफानेही उशीर केला. तो आला असता तर त्याच्याशी एकदोन डाव खेळता आले असते आणि या जाळणाऱ्या आठवणींतून, पश्चात्तापातून जरा तरी सुटका झाली असती. रामचंद्रदेव पुन्हा पट मांडायला लागले.

आता एक पायदळाच्या स्वारासमोर राजा उभा आहे. कसा स्वत:ला वाचवेल राजा ? पुन्हा आपला घोडाही अचल आहे. रामचंद्रदेवाच्या डोळ्यासमोर त्या दिव-शीच्या स्वत:च्या विटंबनेचं दृश्य उभं राहिलं.

त्या दिवशी गंजागढ असाच अचल झाला होता. रामचंद्रदेव मारे शत्रूशी लढायला बाहेर निघाला होता पण घरातल्या शत्रूशी लढण्याइतकी ताकत त्याच्यापाशी कुठं होती ? तरीही दुसरीकडे मिठागरंही ओस पडली होती. एके काळी इथे शंभरावर कामगार व नावाडी काम करत असायचे. इथेच तर उत्कलचे बहुतेक मीठ तयार होत असे. 'मलांगी' नावांमध्ये भरभरून इथूनच तर पिपिली, बालेश्वर, आणि दूर दक्षि॰णेला मीठ जायचे. 'गंजा'मधले मिठाचा व्यापार करणारे लोक इथल्या मिठागरातून सोनं कमवायचे. पण हल्ली फिरंग्यांनी गंजा आपलंसं केलं तेव्हापासून आणि औरंगजेबाच्या काळात एकरामखाँने मालुद, वज्रकोट वगैरे ठिकाणी आपली मिठागरे सुरू केली; तेव्हापासून मोगलांच्या लुटमारीच्या भीतीने गंजाची मिठागरं बंदच पडली होती. आता खारे पाणी जमा करण्यासाठी खोदलेले खड्डे जखमांच्या वणांसारखे राहिले होते. मीठ बनवण्यासाठी केलेल्या चुली व फुटकी भांडी जिकडेतिकडे पसरली होती आणि सर्वत्र स्मशानाची अवकळा आली होती.

जर्जर जीवनाला शेवटी मृत्यूचे बोलावणे यावे तशा त्या ओसाड, तप्त प्रदेशामध्ये रेताडा पलीकडील दाट वेळूच्या जंगलातून चकाकणारे चिलिकेचे पाणी रामचंद्रदेवाला जणू जवळ येण्याचा वारंवार इशारा करत होतं. पण जसजसे रामचंद्रदेव जवळ जात होते तसतसे मृगजळ दूर जात होते.

रामचंद्रदेव त्या आगीसारख्या जळत्या उन्हात कुठे चालले होते कुणास ठाऊक ! त्यांनी असा विचार केला की चिलिकेच्या किनारी वसलेल्या कोठल्याही पाइक गावी

पोचल्याशी कारण, म्हणजे पाठलाग करणाऱ्या मोंगल सैन्यापासून स्वतःची सुटका करता येईल.

त्या दिशाहीन उजाड मिठागरांच्या, व अनोळखी रेताड प्रदेशांच्या पार्श्वभूमीवर त्यांना एक छोटासा गाव हळूहळू दिसायला लागला. एका देवळाच्या घुमटीवरचं नीलचक्र दुपारच्या उन्हात चमकत होतं. पण ध्वज मात्र कुठं दिसत नव्हता.

तो मालकुदा गाव होता. त्याच्या एका बाजूला जटिआ पर्वत हत्तीच्या सोंडेसारखा चिलिकेत आतवर घुसला होता. रामचंद्रदेवाना आठवण झाली की इथंच कुठंतरी जगन्नाथाचे लपण्याचे ठिकाण आहे. नव दिव्यसिंहदेवाच्या कारकीर्दीत ७ व्या वर्षी मोंगलांनी पुरुषोत्तम क्षेत्रावर आक्रमण केलं होतं. पूर्वीही जेव्हा कधी जगन्नाथ दक्षिणेच्या बाजूला आले होते तेव्हाही इथेच राहिले होते. म्हणून तर कधीपासून तरी इथे एक मंदिरही बांधलेलं आहे व सेवकांचीही व्यवस्था असावी म्हणून छोटीशी पाइक वस्तीही वसलेली आहे. दिव्यसिंहदेवानंतर जगन्नाथाला तसा काही उपद्रव पोचला नव्हता म्हणून हे मंदिर कदाचित् उपेक्षित अवस्थेत पडून आहे. सेवकही उठून इतर कुठेतरी गेले होते. त्यांची घरेदारेही तुफानामुळे असेल किंवा इतर कशाहीमुळे असेल, चिलिकेच्या वाळूत गडप झाली असावीत; पण तिथले उरलेले चौथरे तिथे कधीतरी असलेल्या मनुष्यवस्तीची साक्ष देत होते. पाइकांची घरंही हळूहळू ओस पडायला लागलीत. मुसळधार पाऊस, तुफान आणि दुरुस्तीचा अभाव यामुळे ती सगळी घरे हत्तीच्या मढ्यासारखी दिसत होती. मंदिराजवळ असलेली घरं मात्र नव्या स्थितीत होती. अधिकतर पाइक गावांची हीच अवस्था होती. मोंगलांचे आक्रमण आणि त्यापासून करावे लागणारे आत्मरक्षण यामुळे घरामागून घरं अन् गावामागून गावं उजाड पडली होती.

गावची सडक सुनी होती. चिलिकावरून येणाऱ्या वेड्या वाऱ्याच्या खोल निश्वासाखेरीज दुसरा शब्द ऐकू येत नव्हता.

त्यांनी कृपासिंधु मानसिंहाची आळवणी केली, "भाई मानसिंह, माझाच नव्हे पुऱ्या उत्कलचा मान तुझ्या हातात आहे. तूच एक आसरा आहेस. सिंहासन राहू दे. आजची लढाई जगन्नाथाला वाचविण्यासाठी आहे. खोर्ध्याचा सगळा राजवंश समूळ नाहीसा झाला तरी मला त्याचं काही वाईट वाटणार नाही पण ज्याच्या कृपाछत्राखाली उत्कलचे प्रत्येक माणूस आबालवृद्ध स्त्रीपुरुष निर्भयतेने नांदतो, जो हिंदू जगताचा शिरोमुकुट आहे त्या जगन्नाथाला तू वाचवणार नाहीस ?"

पण मानसिंहावर या काकुळतीचा काहीही परिणाम झाला नाही. त्याने रामचंद्रदेवाच्या तोंडावरच गंजागड किल्ल्याचा दरवाजा लावून घेतला. जखमेवर मीठ चोळावं

तसा पांढरा ध्वज थोड्याच वेळात गंजागडवर फडकू लागला. मानसिंह व मोंगलांच्या मैत्रीचे प्रतीक म्हणून. असहाय्य निरर्थक रागाने रामचंद्रदेवाचे सर्वांग कापू लागले. मानवाच्या जीवनात कित्येकदा अशीही वेळ येते की त्याची शक्ती, सत्ता, असामान्यपणा दुष्ट शक्तींच्या पुढे हतबल ठरतो, कटकारस्थानाखाली पाण्यावरच्या बुडबुड्यासारखा लीन होऊन जातो. अशावेळी माणसाला वाटतं कुठल्यातरी अदृश्य शक्तीचा शाप आपल्याला भोवतो आहे. अशावेळी वारूळही हिमालयाशी बरोबरी करू पहातं आणि मुंगी हत्तीशी ! गंजागडच्या बंद सिंहद्वारासमोर रामचंद्रदेवाच्या आयुष्यात तसाच एक क्षण आला होता.

असहाय्य दृष्टीने रामचंद्रदेवाने एक कटाक्ष डोक्यावरल्या जळणाऱ्या आकाशाकडे टाकला. विश्वासघात आणि स्वजनद्रोह हजार डोळ्यांनी जणू त्याला निरखीत होते. त्याच्या सुकलेल्या कंठातून आले, " जगदीश, निराश्रित माझे रक्षण कर रे बाबा ! "

आणखी थांबण्यासाठी वेळ नव्हता. चिलिकेहून कसंतरी बाणपूरला पोचता आलं तर......

ऋषिकुल्या नदीला डावी घालून रामचंद्रदेव एका नागदंती जंगलाला वळसा घालून चिलिकेकडे निघाले.

गेल्या वर्षी दुष्काळ पडला होता. याही वर्षी अन्नाचे दुर्भिक्ष्यच दिसते आहे. अर्धा ज्येष्ठ सरला तरी शेतातली ढेकळे भिजली नाहीत. सगळी शेतं आ वासून पडलीयत. जमीन एवढी कठीण झाली आहे की नांगर घालता येत नाही. जिकडे तिकडे झळाळणारं ऊन्ह आणि मृगजळ. हाडांचे सापळे राहिलेली काही गुरं झुंडीने सुकी माती हुंगत इकडे तिकडे भटकत होती. गवत किंवा पाला पाचोळा समजून ज्याला ती तोंड लावीत ती मातीच निघे. रामचंद्रदेव तहानेने व्याकुळ झाले होते. पाण्यासाठी ते एका घरापाशी आले. बाहेरचं दार उघडंच होतं. भिंतीवरची रांगोळीची चित्रं पावसानं धुवून गेली होती आणि शरीरावर झालेल्या जखमांसारखी भासत होती.

रामचंद्रदेवांनी घोड्यावरून उडी मारली आणि जोरजोराने हाक मारू लागले, " पाणी द्या हो पाणी. तहान लागलीय. कोण आहे का घरात ? "

पण आतून काही उत्तर आलं नाही तसे ते पडवीत आले.

आतून एका म्हातारीनं तेवढ्याच जीर्ण स्वरात कुणालातरी वाहिलेली शिव्यांची लाखोली त्यांच्या कानी पडली,

" अग ए सुने...काळतोंडे, हडळी, मेले धट्टयाकट्टया माझ्या जवान बाप्या पोरांना खाऊन टाकलंस. टवळे कुणीच कसं ग तुझ्या तोंडातून वाचलं नाही...दिरांना खाल्लंस

...जावांना खाल्लंस, म्हाताऱ्या सासऱ्याला खाल्लंस. मलाच कसं सोडलंस ? मला म्हणा यमानेच सोडलंय त्याला तू काय करशील सत्यानिशिनी ? अग ए सरो...मरा मरा मेल्यांनो. तरी सांगत होते की नका जाऊ लढाईवर. तो राजा बक्षीला मारतोय न् बक्षी राजाला तोडतो आहे. भाऊ भावाच्या उरावर बसतोय तर बाप पोराचा प्राण घेतोय; आणि सगळ्यांना मोगल गिळतोय. ही मेली कसली लढाई ? जाणूनबुजून कोण जाईल यमाच्या जबड्यात ? पण त्या काळतोंड्या म्हाताऱ्यानं चिथावलन् ना की साल्यांनो तुम्ही पाइकाच्या पोटचे की भंग्याच्या ? लढाईचं शिंग वाजलं......अशा वेळी कुठला पाइकाच्या बीजाचा लुगड्याच्या घोळात लपून बसेल ? आणि लागला फरशी उचलून अंगात आल्यागत नाचायला. आता मरा. झाला सत्यानाश ? अग ए रांडे, सरे सरो......"

रामचंद्रदेवांनी असहाय दृष्टीने इकडे तिकडे पाहिले तर चेहरा पदराने झाकलेली, डाव्या काखेत कळशी घेऊन कुणी एक पडवीच्या पायरीशी संकोचून उभी होती. पण रामचंद्रदेव लाज संकोच करण्याच्या पलीकडे गेले होते. गुडघा टेकून तोंडासमोर ओंजळ धरून ते फक्त म्हणाले, "पाणी... पाणी !" त्यांचा तो स्वर चीत्कारल्यासारखा वाटला.

त्या कुलवधूने रामचंद्रदेवाच्या ओंजळीत पाणी ओतायला प्रारंभ केला. आकंठ पाणी पिऊन रामचंद्रदेवांनी तिच्याकडे कृतज्ञतेने पाहिलं तेव्हा ती तशीच संकोचून घागर घेऊन उभी होती.

आतून भर दुपारच्या त्या तप्त वेळी देखील शिव्यांचा वर्षाव चालूच होता.

वाऱ्याने तिच्या माथ्यावरचा पदर दूर केला होता. मलिन विषण्ण कपाळाखाली कोमेजलेल्या कमळाच्या पाकळ्यांसारखे आयत नेत्र होते. सहानुभूती व संवेदनशीलतेच्या स्पर्शाने ते अतिशय कोमल दिसत होते.

काय नव्हतं त्या डोळ्यांत ? छायेने झाकोळलेल्या सरोवराची गंभीरता होती, अष्टमीच्या धूसर चांदणी रात्रीची वेदना–व्याकुळता होती. तशीच व्याधाला भ्यालेल्या वन्य हरिणीची अशरणताही होती. त्या निर्जन रेताड प्रदेशात रिक्तता जणू स्त्रीरूप धारण करून उभी होती.

पाणी देणारीचं वय रामचंद्रदेवाइतकंच असावं. पण तिच्या सौष्ठवपूर्ण यौवनाच्या उज्ज्वल कांतीवर न जाणो केव्हापासून काळोखी पसरलेली होती. दंडांत, हातात काही नव्हतं. भांगात सिंदूर नव्हता. कपाळावर दोन्ही भुवयांच्या मध्ये एक तीळ होता.

हा काय सत्यानाशिनीचा चेहरा म्हणायचा ?

रामचंद्रदेवांची बायकांच्या बाबतीत ख्याती होती. त्यांची वासना नेहमी अतृप्त

असे. पण या नारीच्या दु:खाने भिजलेल्या लावण्याने त्यांची इंद्रियपिपासा वा कामासक्ती जागृत नाही झाली. ही आसक्ती इंद्रियासक्तीहून भिन्न अतींद्रिय होती. यात कामवासना नव्हती तर श्रद्धेचा स्निग्धपणा होता. रामचंद्रदेव जणू त्या कुलवधूला वाट द्यायचं विसरूनच गेले. कापऱ्या आवाजात ती म्हणाली, "मला वाट द्यावी."

मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणे रामचंद्रदेव तिथून हलले न् असहाय्य नेत्रांनी चिलिकेचा वाळूभरला किनारा न्याहाळू लागले. तिथून परत कसं जायचं? बक्सीने छत्रद्वाराहून कोणत्या उद्देशाने फौज हलवली होती ते कसं कळावं? पण इथून परतून त्याच्याकडे जाणं म्हणजे भला मोठा धोका पतकरायचा. गंजागडच्या मानसिंहाने रामचंद्रदेवाच्या तोंडावरच सिंहद्वार बंद केलं होतं. आतापर्यंत मालुद सेनापतीला त्याने बातमी दिलीच असेल. या विश्वासघातक्यांचं निर्दाळण कसं करावं? आतापर्यंत मालुदचे सैनिकही शिकारी कुत्र्यांसारखे मागावर लागलेच असतील. म्हणजे चिलिकेहून पलायन करणे हाच एकमेव आत्मरक्षणाचा मार्ग उरतो.

रामचंद्रदेव असा विचार करीत उभेच होते. एवढ्यात त्या स्त्रीने दाराच्या फटीआडून विचारले, "तुम्ही कोण आहात? पाइक की लुटारू? लुटारू असलात तर इथं थांबून काही उपयोग नाही. कारण आमच्याकडं काही नाही."

रामचंद्रदेवांनी एक दीर्घ श्वास घेतला न् ते म्हणाले, "मी खोर्धा राजाचा पाइक आहे."

स्त्री आश्चर्याने, थोडचा अविश्वासाने म्हणाली, "काय सांगताहात? राजा दक्षिणेला टिकालीच्या बाजूला कुठेशी लढतो आहे म्हणे! अन् त्याला तिथे सोडून तुम्ही इथं काय करताहात? की राजाचा पराभव झाला? अन् म्हणून त्याला सोडून तुम्ही पळून इथं आलात?

यावर काय बोलावं ते रामचंद्रदेवांना सुचेना. म्हणाले, "नाही, राजाचा पराभव नाही झाला. बाणपूरला त्यांनी तळ ठोकलाय. रस्त्यात त्यांची वाट पहात मालुदचा सेनापती बशीरखाँ बसलाय. चिलिकेच्या रस्त्याने जाऊन राजापर्यंत एक महत्त्वाची बातमी पोचवायची आहे. म्हणून नावेची सोय होते का बघायला मी आलोय."

आता त्या स्त्रीला धीर आला. ती म्हणाली, "खरंच, तुम्ही पाइक आहात. पण दिवसा नाव न्याल कशी? चिलिकेच्या किनारपट्टीवर रंभापासून ते सर्वभर मालुद सेनापतीच्या गुप्त टेहळणी करणाऱ्या होडचा पसरल्या आहेत. शिवाय नावा चाल॰ वायच्या नाहीत असा हुकूमही गंजागडच्या राजाने सोडलाय."

म्हणजे हा मार्गही बंद झाला आहे? स्वत:शीच त्याने प्रश्न केला "मग? मग आता?"

दाराआडून ती स्त्रीही विचार करत होती. 'कुणा बिचारीच्या डोळ्यातले आसू खळत नसतील ह्याच्यापायी ? लढाईत उतरलाय, घरी जगूनवाचून जाईल की नाही कुणी सांगावं ? माझ्याही नवऱ्यानं असंच कुठंतरी पाणी मागितलं असेल.'

ती सगळी लाज संकोच विसरली आणि पडवी उतरून खाली आली. म्हणाली,

"तुम्ही पाइक आहात ना, हेही पाइकाचंच घर आहे. कोण जाणे कधीपासून खाल्लं नसेल तुम्ही. या, आत या. उन्हात कशाला उभे रहाता ?"

आतून अजूनही म्हातारीची बडबड ऐकू येत होती, "अग ए काळतोंडे, राक्षसिणी ...अवदसे...तुझा सत्यानाश होवो. भाऊ भावाच्या पाठीत सुरा मारतो आहे. मग मोंगल नाही खाणार या देशाला ?"

रामचंद्रदेवाने विचारले, "कोण आहे आत ?"

उदास आवाजात ती म्हणाली, "माझी सासू आहे. विचारीचे तिन्ही मुलगे लढाईत पडले तेव्हापासून दुःखाने वेडी झालीय. सकाळपासून रात्रीपर्यंत हे असंच चालतं. बहिरी होती आता दिसतही नाही. तुम्ही आला आहात तेदेखील कळलं नसेल तिला."

रामचंद्रदेव पडवीत चढत होते एवढ्यात निर्जन रस्त्यावर त्यांना घोड्यांच्या टापा ऐकू आल्या. मालुदचे सैनिक तर नसतील ? ते एकदम घरात शिरले; आणि पाठोपाठ सात घोडेस्वार तिथे पोचले.

जवळच काजूच्या झाडाला रामचंद्रदेवाचा घोडा बांधला होता त्याच्याकडे बोट दाखवून त्यापैकी एकाने विचारले, "या घोड्याचा मालक कुठे आहे ?"

धीट स्वरात ती स्त्री उत्तरली,

"कुठला घोडा ? मला काय ठाऊक हा घोडा कुणाचा आहे ? इथून कैक मोंगल सैनिक जातात. असेल त्यांच्यापैकीच कुणाचाच."

विचारणारा घोड्यावरून उडी टाकत म्हणाला, "पुरे झाला तुझा शहाणपणा. हा घोडा खोर्धाच्या राजाचा आहे हे आम्हाला पक्कं ठाऊक आहे. सांग कुठे लपवून ठेवला आहेस त्याला ?"

कापऱ्या स्वरात तिने विचारले, "राजा, कुठला राजा ?"

एक अश्लील शिवी हासडून त्यातला एक जण म्हणाला, "कुठे ठेवलयस त्याला ? सांग, नाहीतर अब्रू जागेवर नाही राहणार सटवे."

दुसरा कर्णकर्कश आवाजात ओरडला, "चला रे, राजा नाहीतर नाही, या राणीलाच घेऊन जाऊ. 'उचला तिला, घाला घोड्यावर.'

आणि त्यांच्या हिडीस हसण्याने सगळा रस्ता भरून गेला.

त्याच वेळी परशू उगारून रामचंद्रदेव आतून उडी टाकून ओरडले,

"खबरदार, ही पाइक घरची कुलवधू आहे. यज्ञज्वालेसमान तेजस्वी. म्लेंच्छांचे हात स्पर्श नाही करणार हिला."

पण तोवर एकाने घोडयावरून अचूक नेम धरून बर्ची फेकली. पण ती स्त्री मध्ये आली आणि बघता बघता रक्ताच्या थारोळयात खाली कोसळली.

रामचंद्रदेवांनी परशू उगारला पण अनेक तरवारींच्या एकदम झालेल्या आघातामुळे तो त्यांच्या हातून सुटून खाली पडला.

रामचंद्रदेव असहाय्यपणे म्हणाले, "कैद झालोच की आम्ही."

## 4

रामचंद्रदेवाने एक प्यादं बुद्धिबळाच्या पटावर चालवलं आणि शह दिला. पण मनातल्या मनात म्हणू लागले, "तरी मात नाहीच झाली. पण त्या दिवशी बक्सीने छत्रद्वाराहून सैन्य का हलवलं असावं ?...का ?...का ?

राजपुरच्या प्रदेशात जर चिकाकोलच्या सैन्याला रोखायचा मनसुबा होता म्हणावा तर ते लढले का नाहीत ?

पण रामचंद्रदेव पकडले गेल्याची वार्ता ऐकून चिकाकोलच्या सेनापतीने लगेच आपली सेना मागं घेतली आणि तो निघूनही गेला. मग हे लढणार तरी कोणाशी ?"

पण या सगळया युक्तिवादात त्याचं मन रमत नव्हतं. सारखा एकच प्रश्न त्यांच्या मनात घंटेसारखा घणघणत होता, "बक्सीने छत्रद्वाराहून फौज हलवली ती का ?"

कितीही प्रयत्न केला तरी बक्सीचे मुंडन केलेले मस्तक, त्यावरून तटाटून आलेल्या शिरा आणि परशूसारखे तळपणारे डोळे त्याच्या नजरेसमोर यायचे थांबत नव्हते.

तर मग वेणु भ्रमरवरने विश्वासघात केला का ? बुद्धिबळाचा पट पाहणाऱ्या रामचंद्रदेवाला बक्सीचे क्रूर, कुटिल भयंकर डोळे गोंधळून टाकणाऱ्या प्रश्नचिह्नासारखे दिसू लागले.

# तीन

## 1

महाकार्तिक येऊन ठेपला.

आतापासून होळीपर्यंत दूरदूरहून येणाऱ्या यात्रेकरूंनी श्रीक्षेत्र गजबजलेलं राहील. पण सध्या म्हणजे एक तर जिझिया कराची जाचणूक शिवाय मोंगलांच्या हल्ल्याचे भय म्हणून जगन्नाथ मंदिरासमोरच्या रस्त्यावर शुकशुकाट होता.

चारी बाजूंना आता देवळांचा विध्वंस ही नित्याची बाब होऊन बसली होती. देवळं मोडून पिपिली, कटक इथल्या मशिदी बनवण्याचं काम जोरात चालू होतं. लोक म्हणतायत की पिपिलीच्या मशिदीसारखी मशीद ऐन मोंगल अमलातही झाली नाही.

औरंगजेबाच्या वेळेपासून मंदिरं फोडण्याचं कृत्य केवळ धार्मिकच नव्हे तर राष्ट्रीय वृत्तीचं द्योतकही गणलं जाई. जेव्हा एकरामखाँ नायब नाजिम होता तेव्हा अनंगभीम-देवाच्या कारकीर्दीत बांधलेले जगन्नाथाचे मंदिर पाडून त्याने दगडांचा ढीग करून ठेवला होता. त्यांचाच उपयोग करून कटकची जुम्मामशीद बनली होती. १६३५ मध्ये सुजाखाँने मंदिराचे तट फोडून त्या दगडांपासून 'कदमरसूल' बनवला.

पण सुजाखाँ कडवा हिंदुद्वेष्टा नव्हता. आतून त्याचे हिंदूंशी लागेबांधेही होते. म्हणून मुर्शिदाबादेहून येताना तो स्वतःबरोबर राय आलमचंद, फतेचंद, जगतशेठ वगैरे हिंदूंनाही घेऊन आला होता. ते सुजाखाँचे दोस्त होते तसेच सल्लागारही होते. त्यामुळे सुजाखाँच्या कारकीर्दीत ओडिसाची मंदिरे काळापहाडच्यासारख्या हल्ल्यातून बचावून राहिली होती. पण सुजाखाँचा अनौरस मुलगा तकीखाँ जेव्हापासून कटकचा नायब-नाजिम झाला तेव्हापासून देवळांचा विध्वंस जोरात सुरू झाला होता. म्हणून तर श्रीपुरुषोत्तमक्षेत्र एका अनामिक भयाने व्याकुळ झाले होते.

या शिवाय दुष्काळाचंही भय डोक्यावर होतंच. शेतं सगळी उजाड पडली होती. कसली शेती करणार कपाळाची? शिवाय मालगुजारांचं देणंही डोक्यावर होतं. शेतकरी अगदी त्रासून गेले होते.

खोर्ध्याहून खान–ए–दौरांसाठी सालीना सहा लाख पंधरा हजार सहाशे सोळा रुपयांची खंडणी निश्चित झाली होती. पण हा नजराणा देणेच खोर्धा राजाला मंजूर

नाही. त्याला ते लाजिरवाणे वाटते. म्हणून लोकांना मारपीट करून नजराण्याचे पैसे वसूल करण्यासाठी सय्यद बेग शिपायांसकट खोर्ध्यात ठाण मांडून बसला आहे. यापूर्वी दक्षिणेच्या लढाईसाठी दिल्लीहूनच ताकीद केली जात असे की मारपीट करून नाहीतर लूटमार करून कसंही करून हा नजराणा वसूल केलाच जावा. हल्ली हीच ताकीद मुर्शिदाबादेहून केली जात आहे.

इकडे रामचंद्रदेव बारवाटी किल्ल्यात कैद असताना यवनीशी निका लावून, कलमा लावून हाफिज कादर यारजंग बनल्यापासून खोर्ध्यात येऊन अंगावरून वारं गेल्यासारखे निष्क्रिय होऊन बसलेत. पाइकांच्या मध्येही पूर्वीसारखा अभिमान नाही राहिला. जोवर खोर्धा राजा हिंदू होता तोवर तो जगन्नाथाचा सेवक होता, राष्ट्रीय एकतेचे व उत्कलच्या प्राणशक्तीचे मूर्त स्वरूप होता. पण त्याने धर्मांतरच केलं तेव्हा त्यांच्या-बद्दलचा पूर्वीएवढा आदर पाइकांच्या मनात राहिला नव्हता. आता सगळा भरवसा बक्सी वेणु भ्रमरवरवर होता. पण रामचंद्रदेवाच्या विरुद्ध जायची हिंमत बक्सीत नव्हती. त्याला दहशत होती रामचंद्रदेवाच्या नव्या मेहुण्याची – तकीखाँची.

## 2

पुरीत जुना बालीसाही राजवाडा आहे. म्हणजे आता त्याचे भग्नावशेष तेवढे राहिले होते. त्यातच हनुमान आखाडा आहे.

वेणु भ्रमरवर पुरीला आले की तिथेच रहात असत.

महाराज हरेकृष्णदेवचे दिवाण होते भगी भ्रमरवर. पण त्यांचा पुत्र म्हणून वेणु राऊतला भ्रमरवर वंशात कुणी स्थान दिलं नव्हतं. पण त्यांच्या एकंदर प्रचारावरून असा भास होत होता की खोर्ध्याच्या सिंहासनाचा तोच एकटा वारस आहे आणि मानव तथा नियतीच्या कारस्थानापासून त्याचं आजवर रक्षण झालंय.

उच्चपदाची अभिलाषा बाळगून कट करणं व तरीही अतृप्त रहाणं यासारखी दुसरी शिक्षा नाही माणसाला. टिकालीच्या युद्धात रामचंद्रदेवाना शत्रूसमोर एकाकी हकलल्या-नंतर बक्सीला साहजिकच वाटलं होतं की आता रामचंद्रदेव तकीखाँच्या पंजातून कसला सुटतोय ? मग खोर्धाच्या सिंहासनावर आपोआपच आपला हक्क लागू होईल. पण दैवाची गतीच विलक्षण. रामचंद्रदेव तकीखाँचे भगिनीपती होऊनच खोर्ध्याला परतले.

केवळ रामचंद्रदेवामुळे झालं हे सारं. त्याच्यामुळे एकही आकांक्षा सिद्धीला जात

नाही. अशा तऱ्हेचे मन जाळणारे विचार करत हनुमान आखाडयाच्या आतल्या कोठडीत माळ जपत बसले होते बक्सी वेणु भ्रमरवर. पण मनातला उद्वेग कमी होत नव्हता.

हा बालीसाही राजवाडा गंगवंशी राजांच्या कारकीर्दीत बांधला होता; आणि आता लतावेलींच्या जाळयात विसरलेल्या भूतकाळासारखा दगडाविटांनी आच्छादून पडला होता. पूर्वेच्या बाजूचे काही महाल अजून शाबूत होते. बाकी सगळं बांधकाम मेलेल्या हत्तीगत अस्ताव्यस्त पडले होते. प्रासादाच्या मधोमध असलेलं पांढऱ्या पाषाणात बनलेलं तळं पूर्वीची कोणतीशी सुखद स्मृती हृदयाशी धरून बसल्यागत वाटत होतं – कारण त्याच्यावर उन्हाची कांती झिळमिळत होती. पण हे तळंही गाळाने भरलंय. मध्येच कुठं कुठं कमळं फुलली होती. तळयाच्या उत्तरेस श्यामा कालीचं मंदिर होतं. हनुमान आखाडयाचं पीठ आता तेच होतं. उत्तर हिंदुस्थानातले कुणी श्री सीतारामजी नावाचे साधू होते, त्यांनी हे मंदिर स्थापले होते. मठाची अशी काही संपत्ती नाही. इतर मठांकडून मदत मिळत असे त्यावरच चालायचं.

सीतारामजी वारले. आता लछमनजी आखाडयाचे प्रमुख आहेत.

या आखाडयात अध्यात्मापेक्षा शरीरोपासनेवरच जास्त भर दिला जातो. काळापहाडनंतर पुरुषोत्तमक्षेत्रावर अफगाणांचे व मोंगलांचे वारंवार हल्ले व्हायला लागले. त्याचा परिणाम म्हणजे असल्या आखाडयांची झालेली स्थापना. यांच्यात कुस्ती, तलवार चालवणे, भालाफेक वगैरे शिकवले जाते. पूर्वी श्रीमंदिरावर झालेल्या छोटयामोठया हल्ल्यांचा प्रतिकार यांनीच केला होता. यातल्या मुख्य मुख्य आखाडयात बक्सी वेणु भ्रमरवरने आपला अड्डा स्थापला होता. त्या माध्यमातूनच तर त्यांचा श्रीक्षेत्रात प्रचार चालला होता व बराच परिणामही झाला होता. बक्सीनी तर राजखजिन्यातूनही आखाडयाला मदत मिळवून दिली होती.

याच प्रासादात एका बाजूला बसून जेव्हा बक्सी नामजप करीत होते तेव्हा आखाडयात बलसाधना चालू होती. श्यामा कालीच्या काजळीने माखलेल्या ओटयावर कांबळं टाकून त्यावर लछमनजी बसले होते व दोन मल्लांची कुस्ती मोठया बारकाईने पहात होते. चिकित्सक नजरेने ते प्रत्येक डावपेच पहात होते.

जगू पढिआरी आणि चेमा लेंका कुस्ती कसरतीत एकमेकांना तोडीस तोड प्रतिस्पर्धी होते. लंगोट फक्त अंगावर असलेली काळी अजस्त्र शरीरं दोन रुंद काळया फत्तरांसारखी एकमेकांना भिडली होती. जेव्हा चेमा तोंड खाली करून पडत असे तेव्हा जगू पढिआरी त्याच्यावर स्वार व्हायचा; आणि दातओठ खाऊन कोपरं मातीत रोवून चेमाच्या काखेत हात घालून त्याला उलटवण्याचा निष्फळ प्रयत्न करायचा. पण अजगरा-

सारखा पडला वाटणारा चेमा अशा चपळाईने उसळायचा की जगू बघता बघता मातीत फेकला जायचा. अशा वेळी चारी बाजूंना कुस्ती बघणाऱ्यांचं कोंडाळं असायचं. ते टाळ्या वाजवायचं, चेष्टा करायचं. प्रोत्साहन द्यायचं. जगू पढिआरी स्वतःला सांभाळायचा, पवित्रा बदलायचा; आपला खास असा डावपेच दाखवायचा. पुन्हा एकदा त्या दोघांचे हनुमानासारखे हुंकार आखाड्यात भरून रहायचे.

मंदिराच्या ओट्यावर समोरच उंच शिलेवर, लंगोट कसून नरींसिहारी दंडबैठक काढल्याप्रमाणे भांग वाटत होता. यानंतर 'नरेंद्र' मध्ये डुंबायला काय मजा येईल. टाचेपासून छातीपर्यंतचे स्नायू हलवत, उपेंद्रभंजचे गीत गुणगुणत नरींसिहारी भांग वाटण्यात तल्लीन होऊन गेला होता. तिथेच वर मैनेचा एक पिंजरा टांगला होता. मधूनच ती काहीतरी किच्‌मिच्‌ बोलायची. नरींसिहारीचं गाणं ऐकून एका भंगेड्याने दाद दिली, "वा, वा शाबास !"

आता जगू पढिआरीने चेमाला कुस्तीचीत केलं होतं. म्हणून तेथे टाळ्यांचा गजर चालला होता,

पण हे सगळेजण काळाच्या हातातली कळसूत्री बाहुली होती. वेणु भ्रमरवरने श्रीक्षेत्रावर हल्ला करण्यासाठी यवनांना आमंत्रण देऊन बोलावलंय हे त्यांना माहीत नव्हतं. उत्कलच्या कोनाकोपऱ्यातली देवळं जमीनदोस्त होत आहेत याचाही त्यांना पत्ता नव्हता. अर्थात्‌ दुबळेपणाची आत्मग्लानीही नव्हती. आखाड्यात भांग चढवण्यात आणि कुस्त्या खेळण्यात ते निमग्न होते.

इतिहासात जेव्हा असा विनाशकाळ येतो तेव्हा समाजातील मठासारखी जागृत अनुष्ठानेही झोपी जातात. म्हणून तर हनुमानमठाच्या अधिकाऱ्यांना किंवा त्यांच्या चेल्यांना डोक्यावर टांगत्या तलवारीसारख्या लटकणाऱ्या सर्वनाशाची कल्पना आली नाही आणि त्याबद्दल एकंदरच ते सर्वथा उदासीन राहिले.

त्या जीर्ण शीर्ण प्रासादातल्या तीन काळोख्या गुंफा ओलांडून गेलं की एक चबुतरा होता. त्याच्या चारी बाजूंच्या भिंतींचा चुना ढासळला होता आणि मधूनमधून खपरेली विटांची बारीकशी रांग दिसत होती. खोपडीतल्या दाताच्या रांगेसारखी. चबुतऱ्याच्या पश्चिमेला एक विहीर आहे. आत उतरण्यासाठी तिला पायऱ्या आहेत. कोणे एके काळी अंतःपुरातल्या स्त्रिया तिच्यात आंघोळ करत असत. अजूनही या विहिरीत शोधलं तर कवट्या हाती लागतील. पूर्वी इथे कैक आत्महत्या झाल्या तर कैक वेळा शत्रूला जल-समाधीही दिलेली आहे. पण पाणी तरीही सदा स्वच्छ आणि निर्मळ राहिलं आहे.

या विहिरीच्या पश्चिमेला एक व्हरांडा आहे. त्याला लागून काही खोल्या आहेत. त्यातल्या एकीत जुन्यापुराण्या पलंगावर मखमलीचा बिछाना अंथरला आहे; आणि

तक्क्याला टेकून त्यावर घातलेल्या कांबळ्यावर बसून वेणु भ्रमरवर माळ फिरवत आहेत. माळ केवळ पारलौकिक कल्याणातच मदत करते असं नाही, ती फिरवताना इहलोकींच्या चिंतांपासून कशी मुक्ती मिळवायची त्याचाही विचार करायला अवधी मिळतो.

बक्षीचे विचार तर खोर्ध्याच्या राजगादीवरच केंद्रित झाले होते.

त्यांचा ओढलेला चेहरा, मुंडन केलेले मस्तक आणि सुकलेलं शरीर त्या काळोख्या खोलीत पिशाच्चाकृतीसारखं भासत होतं.

त्यांनी डोळे मिटायचा अवकाश की त्या दिवशी रथीपूरगडात शेवटच्या प्रहरी पाहिलेल्या स्वप्नांची मालिका त्यांच्या मन:चक्षूंसमोर तरंगायला लागायची. आजवर त्यांनी कैक वेळा विचार केला असेल पण त्या स्वप्नांचा अर्थ त्यांना लागला नव्हता. मणिवक्रेश्वरचे सिद्धबाबा हरिदास यांनाही बक्सींनी या स्वप्नाचा अर्थ एकदा विचारला होता. पण ते काही न बोलता नुसते हसले होते. "या स्वप्नाचा काही अर्थ आहे काय स्वामी ?" वेणु भ्रमरवरानी विचारले पण हजार वेळा विचारून देखील सिद्ध हरिदास बाबांनी काही उत्तर दिले नव्हते. नुसतेच हसले होते. शेवटी म्हणाले होते, " राज्यलाभ किंवा प्राणहानी दर्शवतं हे स्वप्न."

यात काय नवल सांगितलं ? तलवार आणि राजमुगुट, स्मशान आणि सिंहासन यामध्ये येरझाऱ्या घालण्यातच राजपुरुषांचे जीवन संपत असते.

जणू कुणी अचानक शरसंधान करावे तसं दचकून बक्सींनी डोळे उघडले.

पुन्हा तेच स्वप्न त्यांच्या नजरेसमोर तरंगायला लागले होते.

भाले, करबाल एकमेकांना भिडून पुन्हापुन्हा आपटत होते. तलवारीची पाती संघर्षाच्या ठिणग्या फुलवत होती. हळूहळू त्या ठिणग्यांचे रूपांतर रक्ताच्या थेंबांत होत होतं. आणि त्या रक्ताने बरबटलेल्या जमिनीवर एक हाडांचे सिंहासन दिसू लागले. त्याच्या चारी पायांवर ज्या कवट्या होत्या त्यातले डोळे मात्र जिवंत होते; आणि अत्यंत अनासक्त भावाने तलवारीचे युद्ध ते निरखीत होते. सिंहासनावर प्रशस्त मखमली गादी होती आणि त्यावर अष्टरत्नांनी खचित मुगुट होता. मागच्या बाजूला दोन मस्त हत्ती प्रहरी बनून उभे होते व त्यांच्या उंचावलेल्या सोंडातून उष्ण रक्ताचा अभिषेक जलधारेसारखा अविरत मुकुटावर होत होता. अचानक एक मस्तकविहीन कबंध हातात परशु घेऊन येतं. तलवारीचं रान भेदून ते सिंहासनापर्यंत पोचते. त्याचे पाऊल लागताच ते सिंहासन व मुकुट अंतर्धान पावतं. त्यानंतर ते कबंध परशु उगारून सगळीकडे नाचू लागतं – स्मशानात नाचल्यागत.

रथीपूरच्या किल्ल्यात हे स्वप्न पडलं तशी वेणु भ्रमरवर ओरडत पलंगावरून उडी मारून उठले. त्यांचं सगळं अंग आणि कपाळ घामाने थबथबले होते. शय्यागृहातल्या

दिव्याची ज्योत मंदावली होती. बाहेर हवा स्तब्ध होती. "दुर्गा...दुर्गा" म्हणत वेणु भ्रमरवर बाहेर आले. गडाच्या तटावर पहारेदार हिंडत होते...जोडयांचा आवाज येत होता. बाहेर हवा पडली होती. "दुर्गा, दुर्गा" असे पुटपुटत वेणु भ्रमरवर बाहेर आले. जवळच वहाणाऱ्या गंगवतीच्या किनाऱ्यावरचं मणिवक्रेश्वरचे मंदिर व त्याचा कळस पहाटेच्या नक्षत्राच्या अंधुक उजेडात आकृती कापून ठेवल्यागत दिसत होता. मणिवक्रेश्वरच्या दिशेने हात जोडत वेणु भ्रमरवरने पाहिलं तर आकाशात परशूच्या आकाराचा धूमकेतु. दर पहाटेला दिसणाऱ्या या विचित्र आकृतीच्या धूमकेतूचे वर्णन मंत्र्याकडून त्यांच्या कानावर आले होते. पण स्वत: भ्रमरवरनं कधी तो पाहिला नव्हता. मघाच्या त्या भयानक स्वप्नानंतर पहाटकाळच्या गंभीर आकाशात ही अजस्र धूमकेतूची आकृती बघून अनामिक भयाने बक्सी वेणु भ्रमरवर गोठून गेले.

हळूहळू प्रभातकाळच्या पक्ष्यांच्या मधुर शब्दांनी वातावरण जागे झाले. रथीपूर किल्ल्याच्या चारी बाजूला खंदकाप्रमाणे गंगावती वहात होती. प्रभातीच्या सूर्याची आरक्त किरणं पडून तिचं पाणी लालसर भासत होतं. धूमकेतू हळूहळू मावळून गेला. पण वेणु भ्रमरवरना अजून त्या परशुधारी कबंधाची आकृती नाचताना दिसत होती; इतकंच नव्हे तर हलके हलके ती त्यांच्याच बाजूला येत होती.

हनुमान आखाडयाच्या त्या आतल्या खोलीत बसलेला असतानाही बक्सींना भास झाला की इथेही ते कबंध त्यांना शोधत आलंय आणि त्यांची स्मरणीवरची बोटं शक्तीहीन झाली. भयभीत नजरेनं त्यांनी चारी दिशेला पाहिलं.

जवळ जवळ एक हजार एक वेळा बक्सींनी स्वतःलाच समजावलं की काही नाही, हे सगळे मनाचे खेळ आहेत.

बाहेर आखाडयात गाणे चालू होते. त्याचे लयबद्ध सूर कानावर पडत होते व आसपासच्या जगाची चाहूल मिळत होती. त्यामुळे बक्सींचे मन लवकरच थाऱ्यावर आले.

पण कितीही प्रयत्न केले तरी त्यावर नियंत्रण ठेवणे बक्सींना शक्य होत नव्हते. अनेक तऱ्हेच्या चिंता त्यांच्या मनात थैमान घालत होत्या.

सगळयाचं मूळ कारण खोर्धा राजसिंहासनच होतं.

त्या दिवशी मोंगल सम्राट अकबराच्या वारंवार होणाऱ्या हल्ल्यांमुळे समस्त उत्कलचे शेवटचे स्वतंत्र गजपती मुकुंददेव आणि त्याचे वंशज खोर्धा, आली व सारंगगडहून निर्वासित झाले. कुठूनतरी आभाळातून टपकावा तसा दनेइ विद्याधराचा मुलगा रमेइ राउतरा रामचंद्रदेव बनून आले आणि खोर्ध्याच्या राजसिंहासनावर त्यांनी हक्क

प्रस्थापित देखील केला. असं म्हणतात, हे रामचंद्रदेवच खोर्ध्याचे अस्सल वारस आहेत असा दृष्टान्त खुद्द श्रीजगन्नाथानी मानसिंहाच्या स्वप्नात जाऊन दिला होता. ह्या अर्थात् दंतकथाच पण मानसिंहाने रामचंद्रदेवाना खोर्धाच्या राजसिंहासनावर बसवून एका दगडात तीन पक्षी मारले. उत्कलमध्ये बंडखोर अफगाण व मोंगल राजसत्ता यांच्यामध्ये खोर्ध्याच्या मिषाने श्रीपुरुषोत्तम क्षेत्र स्थापन करून एक पाचर मारून टाकली त्याने. त्यामुळे उत्कलमधले हिंदू बहुमत त्याच्या बाजूचे झाले; त्याचबरोबर परंपरागत गजपती घराण्याबद्दल जी आदरयुक्त भक्ती त्यांच्यात होती ती निखळ राहिली नाही, किल्लेदार व सामंतदेखील खोर्ध्याशी पूर्वीइतके एकनिष्ठ राहतील असा संभव उरला नाही.

सगळ्यात ज्येष्ठ आली आहे. त्यामुळे ज्येष्ठांशाचा अधिकारही त्यांचाच आहे. पण ते जमीनदार झालेत. सगळ्यात कनिष्ठ सारंगगड. छकडी भ्रमरवरचे वंशज सारंग-गडच्याच आश्रयाखाली आहेत. हळू हळू अंग्रारुआ, दारुठेंगा, हरिडामडा, बारंग, परिआ, कालाराहांग व दाढा वगैरे ठिकाणी विखरून ते लुप्त होऊन जायच्या बेतात आहेत. सारंगगड आहे कटक व खोर्ध्याच्या मधोमध. त्यामुळे सारंगगडचे किल्लेदार हे कोणत्याही कारस्थानात प्रमुख गणावेच लागतात त्याशिवाय चालत नाही. ते कधी कटकच्या नायबनाजिमला मिळतात तर कधी त्याच्याविरुद्ध खोर्ध्याशी हातमिळवणी करतात. काही का असेना, त्यांच्या मनात खोर्ध्याच्या सिंहासनाची लालसा सतत तेवत राहिली होती खरी. सारंगगडाबरोबर खोर्धा जोडून पुन्हा एकवार गंगेपासून गोदावरी-पर्यंत उत्कल साम्राज्याची पुन:प्रतिष्ठापना करायची स्वप्नं त्यांना पडायला लागली. पण मोंगलांची प्रबळ सत्ता ही स्वप्नं खरी होऊ देतील असं लक्षण दिसत नव्हतं.

मागे जेव्हा खान–ए–दौरांने आक्रमण केलं होतं तेव्हा, तेव्हांच्या सारंगगडच्या नील भ्रमरवराच्या ज्येष्ठ मुलाने – कपाली भ्रमरवराने फितूर होऊन खोर्ध्याच्या मुकुंददेवाशी बेईमानी केली. त्याचे बक्षीस म्हणून खान–ए–दौरांने त्याला खोर्धाच्या सिंहासनावर बसवले. कपाली भ्रमरवराचे घोडे गंगेत न्हालेसे त्याला वाटतात न वाटतात तोच खान–ए–दौरांची पाठ फिरली आणि महाराज मुकुंददेव परत आले. विश्वासघातकी भ्रमरवर स्वरक्षणार्थ ढेकानालला पळून गेले. त्यांच्या छोट्या बंधूंनी–श्रीनाथ हरिचंदननी मुकुंददेवाला कपालीविरुद्ध मदत केली होती. तेव्हा त्याची नेमणूक शिशुपाल, रथीपूर व धऊलीचा किल्लेदार म्हणून झाली. श्रीनाथ हरिचंदनचा मोठा मुलगा भगी भ्रमरवर महाराज हरेकृष्णदेवाच्या कारकीर्दीत दिवाण होता. त्याचा मुलगा वेणु राऊत जगन्नाथ मंदिरात महाप्रसादाचे कण वेचत असे. त्याच्याच डोक्यावर महाराज गोपीनाथांनी बक्सीची पगडी चढवली. त्याला कारणही होतं. एका माजलेल्या

हत्तीला वठणीवर आणायची अवघड कामगिरी त्याने करून दाखवली होती. म्हणून महाराजांनी वेणु भ्रमर राऊतला हे इनाम दिले.

त्यानंतर खोर्ध्याचं राजसिंहासन जणू हातात आल्यासारखंच होतं. फक्त जरासा हात लांबवून सुरा भोसकण्याचाच अवकाश होता...खोर्ध्याच्या सिंहासनावरच्या अधिकाराला मुकल्यामुळे तळमळणारे भूतकाळात गेलेले समस्त भ्रमरवर आता वेणु भ्रमरवरकडे आशेने डोळे लावून बसले होते.

अचानक बक्सींची एकाग्रता ढळली. त्या मघाच्या कबंधाची सावली उडी मारून त्यांच्यावर हल्ला करण्याच्या पवित्र्यात आली. ते लटलटा कापू लागले.

पण ही गोपीनाथ देवाची आकृती नव्हती का? परमहितैषी गोपीनाथदेव. फक्त डोकं नाही धडावर; एरव्ही सगळी तीच आकृती...तेच गौर, सुंदर अवयव, आजानुबाहू, गळ्यातली माणिक वैडूर्याची माळा, कापूरचंदनाचा वास, ते शुभ्र वस्त्र...

१९३९ मध्ये महाराज हरेकृष्णदेवानंतर गोपीनाथदेव खोर्ध्याच्या सिंहासनावर बसले. पण राज्यकारभारात मन घालण्यापेक्षा पुष्पधन्व्याची आराधना करण्याकडे त्यांचा कल झुकला होता. दरदिवशी कवी, पंडितांच्या बरोबर काव्यशास्त्र कामशास्त्रावर चर्चा करणे, शिकार खेळणे, रात्री मोहिनीतंत्रोपासनेनुसार देवीसाधना करणे व अनेक तऱ्हांच्या स्वैराचारात रमणे असा त्यांचा क्रम होता. त्यांची अशी खात्री होती की एकदा सिद्धी मिळाली की मोंगलांना वश करायला पळभराचा अवधी बस्स होता. पण एक सहस्र आठ अक्षतयोनि कुमारिकांशी संभोग केल्यानंतरच ही सिद्धी मिळणार होती. जे मोहिनीरूप धारण करून देवीने महिषासुराचा बध केला होता त्याच रूपात ती साधकाला दर्शन देऊन वर देणार होती. मोंगलांचा समूळ नाश करायला गोपीनाथदेवांनी शेवटी या तंत्राचा आश्रय केला होता.

त्यावेळेला या अज्ञात कुलशीलाच्या वेणु राऊतला कुठं कोण ओळखत होतं? पूर्वीच्या महाराजांच्या कारकीर्दीत दिवाण भगी भ्रमरवरने आपल्या मुलाला मंदिर-रक्षक म्हणून नेमले होते. पण मुलाची महत्त्वाकांक्षा आकाश गिळंकृत करण्याची होती. त्याला समाधान कुठले? त्याचवेळी बाणपुरच्या महाराजांनी एक जंगली हत्ती नजराणा म्हणून खोर्ध्याच्या महाराज गोपीनाथदेवांना धाडला होता. त्याला माणसाळवण्याच्या प्रयत्नात दोन दोन माहूत ठार झाले होते. तो मुळी माहूत किंवा कुणीही माणूस दिसला की सरळ अंगावर चालूनच जायचा. त्यामुळे जुने अनुभवी माहूत व मल्लदेखील त्याच्यासमोर जायला भ्यायचे. त्यांच्या भीतीने बडदांडच्या रस्त्यावर फिरणं माणसांनी सोडूनच दिलं होतं.

त्यावेळी वेणु राऊत पुढे सरसावला. उद्देश असा की प्राण गेले तर कधीतरी ते जायचेच; काम झाले तर महाराजांच्या नजरेत तरी भरू.

वेणु राऊत या कामगिरीवर निघाला तेव्हा त्याच्या कानावर चेष्टाकुचेष्टा आली तसे आशीर्वादही आले. कोणी म्हणत होतं, 'साल्याला जगायचा कंटाळा आलेला दिसतोय,' कुणी म्हणालं, 'एवढे मोठे मोठे माहूत नाही टिकले तिथं हा कालचा पोर काय करणार ?' कुणी विचारलं, 'काय रे, मरायचंय का ?'

पण यातलं काहीही वेणु राऊतनं ऐकलं नव्हतं, आणि कमरेला कट्यार खोचून व हातात अंकुश घेऊन तो निघाला—जय जगन्नाथ म्हणत. महाराज महालाच्या गच्चीवर बसून ते क्रूर दृश्य पहात होते.

वेणूला पहाताच पातेलवणीसरशी हत्ती फिरला तशी वेणूही फिरला. एकदा गोल फिरून हत्ती पुन्हा त्याला सन्मुख होतो तोच वेणु त्याच्यामागे गेला न् त्याच्या शेपटा-कडे जाऊ लागला. मग ही लपाछपीच सुरू झाली – हत्ती आणि वेणूत. हत्ती वळला की वेणु वळायचा. सन्मुख झाला की त्याच्यामागे जायचा. मग काही वेळ हत्ती गुपचुप उभा राहिला. बहुधा नव्या हल्ल्याचा विचार करत असावा. पण तेवढ्या वेळात वेणूनं त्याचं शेपूट पकडलं आणि त्याच्या पाठीवर तो चढला देखील. ते बघून प्रेक्षक तर आश्चर्याने थक्क झाले. कधी स्वप्नातही खरं नव्हतं वाटलं की मंदिरातल्या महाप्रसादाचे कण वेचणारा हा हाडकुळा मुलगा एवढं शौर्याचं कृत्य करील म्हणून.

आता वेणूत नि हत्तीत लढाई चालू होती. कोण कुणावर स्वामित्व मिळवितो याबद्दल. हत्ती सारखा सोंडेचे फटकारे मारून वेणूला पाठीवरून खाली पाडण्याचा प्रयत्न करीत होता व वेणु त्याच्यावर कट्यारीचे वार करून त्याला रक्तबंबाळ करीत होता. आता मात्र हत्ती बेफाम झाला व वेडावाकडा पळू लागला तेव्हा कानाखाली अंकुश टोचून टोचून वेणूने त्याला सरळ आणले व खाली बसवले.

तेव्हापासून अज्ञात कुलशीलाचा वेणु राऊत गोपीनाथमहाराजांच्या अंतरंगातल्या-पैकी एक झाला. काही वेळानंतर महाराजांनी त्याला बक्सी बनवलं. वेणु राऊत आता बक्सी वेणु भ्रमरवर राय बनले. महाराजांचे अत्यंत विश्वस्त झाले. गोपीनाथ-महाराजांचं त्यांच्याशिवाय पान हलेना. काव्यचर्चेपासून ते तहत् पंचमकार साधनेतील भैरवी चक्रात बसेपर्यंत सगळ्या बाबतीत वेणु भ्रमरवर त्यांना हवे असायचे.

इकडे राज्यभर हाहा:कार उडाला होता. य:कश्चित् मोंगल शिपाईदेखील तलवार दाखवून मालगुजारी वसूल करण्यासाठी लूट करत होते. यासाठी सवलत न देऊन चाललं नसतं गोपीनाथमहाराजांचं. नजराणा कुठून गोळा होणार नाहीतर ? पुन्हा खुद्द महाराजांचं मोहिनीतंत्र साधन होतं. त्यामुळे घरच्या लेकीसुनांच्या अब्रूचीही

शाश्वती उरली नव्हती. मोहिनी तंत्र साधनेसाठी गोपीनाथ देवाच्या भैरवी चक्रापाशी त्यांना पकडून आणलं जात होतं. दोन्ही बाजूंनी लोक नागवले जात होते. सर्वत्र त्राही त्राही झाली होती.

त्यादिवशी—

गोपीनाथदेवांच्या ैठकीच्या महालात कवितापाठाचा कार्यक्रम होता. घुमुसरचे राज्यच्युत राजपुत्र उपेंद्रभंज हे कवी होते व महाराजांचे खास अतिथी म्हणून आले होते. पण या रसकाव्यचर्चेत बक्सींना रस नव्हता. नवनीताहून मृदु असलेल्या या निर्बोध गोपीनाथदेवांचा नि:पात कसा करावा या एकाच विचारात ते गढून गेले होते. शिवाय त्यांच्या मते सूर्यवंशी राजांच्या कारकीर्दीत जसे रसरशीत, काव्यगुणांनी संपन्न असे उत्कल काव्य निर्माण झाले होते त्याच्या जवळपासही हे आजकालचे काव्य येत नाही. आजचं काव्य म्हणजे निर्वीर्य जातीच्या आहत पौरुषाने कामयुद्धात कंदर्पच्या तीरांनी पराभूत झाल्यावर आपल्याच साथीदारिणीला क्षतविक्षत करण्यात आनंद मानावा. अशा तऱ्हेच्या काव्यांनी पैसेवाल्यांच्या हीन मनोवृत्तीचं मनोरंजन होतं फार तर. इथं वास्तवात दुर्भिक्ष्यामुळे पीडित माणूस माणसाला खातोय. मुलगी वयात येण्याआधीच तिचं यौवनफळ कीड धरतं अशा वेळी युवतीच्या उन्नत स्तनांचं वर्णन काव्यात का होईना अप्रस्तुत वाटतं.

असले विक्षिप्त विचार करीत वेणु भ्रमरबर त्या बैठकीत असून नसल्यासारखे बसले असताना दिवाण कृष्ण नरेंद्र आत आले व महाराजांच्या कानात काही बोलले. बहुधा गोष्ट प्रिय नसावी. नव्हतीच. कारण खबर होती सुजाखांचा वकील सैयदबेग लाठी घेऊन दारावर धरणं धरून बसल्याची. म्हणतोय तीन वर्षांपासून त्याला खोर्धा किल्ल्यातून फुटकी कवडी देखील मिळालेली नाही.

गोपीनाथमहाराजांनी ऐकून न ऐकल्यासारखं केलं. ते कवी व पंडितांनी वस्त्रप्रावरणं, मकरकुंडले वगैरे मानपान देण्यात गढून गेले होते. दिवाण कृष्ण नरेंद्र खोळंबून उभा होता. शेवटी निरुपायाने म्हणाला, "मग ? काय सांगू त्या सैयद बेगला ?"

कोरड्या स्वरात महाराज म्हणाले,

"म्हणावं. खोर्ध्याचे महाराज नाही कुणाला नजराणे न् खंड देत. आम्ही काही मांडलिक नव्हे किंवा सिंहासनासाठी आली, सारंगगडासारखी आमच्यावर सालिना नजराणा भरण्याची पाळीही आलेली नाही."

भर सभेत सारंगगडचा झालेला हा उपहास वेणु भ्रमरवरला झोंबला आणि दबून राहिलेली सूडाची इच्छा पुन्हा त्याच्या मनात फणा काढून उठली. अज्ञात कुलशीलाचा

वेणु राऊत खोर्ध्याचे बक्सी वेणु भ्रमरवर बनले ही गोपीनाथमहाराजांचीच दया व कृपा हे लक्षात येताच गोपीनाथांविषयी कृतज्ञता वाटायच्या ऐवजी त्यांचा क्रोध अधिकच भडकला.

गोपीनाथदेव मागचा पुढचा विचार न करता मूर्खासारखं वक्तव्य करत होते. "त्याचं असं आहे, सुजाखाँला स्वतःचं रक्षण करणं झालंय कठिण. तिकडं मुर्शिदाबादेत नबाब जाफरखाँ नासिर पडलाय मृत्युशय्येवर. त्याचे लोक शहाजाहांबाद दिल्लीत बसून बंगाल, बिहार, ओडिसाची सुभेदारी त्याच्या नातवाला – सरफराजखाँला मिळावी म्हणून खटपट करताहेत. मुर्शिदाबादेच्या सुभ्यावरही सुजाखाँचा डोळा आहेच. म्हणजे सासरा जावई, बाप बेटा असा संघर्ष अटळच आहे. म्हणून म्हणतो दिवाणजी, लक्ष देऊ नका त्याच्या वकिलाकडं. म्हणावं, खोर्ध्याचे महाराज नजराणा बिजराणा देत नाहीत कुणाला."

दिवाण कृष्ण नरेंद्र गंभीर झाले. असल्या बेजबाबदार वक्तव्याचा काय परिणाम होईल हे ते चांगलं जाणून होते. सैय्यद बेगकडून हे सुजाखाँच्या कानावर जायचीच खोटी की तो खोर्ध्यावर आक्रमणच करील. मग काय प्रश्नच मिटेल सगळ्यांचाच आणि सगळाच.

विचार करीत करीत ते बैठकीतून चालले होते. त्यांच्या कपाळी आठ्यांचे जाळे झाले होते.

बक्सी वेणु भ्रमरवर चबुतऱ्याजवळ तटाचा आधार घेऊन शून्य दृष्टीने बरुणेई पर्वतावरील, दिशासूचक स्तंभाकडे टक लावून पहात उभे होते. स्वतःच्या विचारात एवढे गर्क होते की कृष्ण नरेंद्र जवळ येऊन कधी उभे राहिले तेही त्यांना कळले नाही. त्यांच्या सुस्काऱ्यानं बक्सीची समाधि भंगली. साभिप्राय दृष्टीने त्यांच्याकडे बघत बक्सींनी विचारलं, "काय झालं?"

बरुणेईकडे विद्ध नजरेनं बघत आहत स्वरात ते उद्गारले, "चिन्ह काही बऱ्याचं दिसत नाही!"

वेणु भ्रमरवरच्या दाट भिवयाखालच्या दोन्ही डोळ्यांत त्यांच्या डोक्यातलं कपट-कारस्थान हळूहळू मुख दाखवायला लागलं. सावधपणे म्हणाले, "मग? कसं करायचं?"

निस्पृह स्वराने कृष्ण नरेंद्र म्हणाले, "जगन्नाथालाच ठाऊक!"

वेणु भ्रमरवर म्हणाले, "त्याची तरी काय वेगळी गत व्हायची आहे?"

"ते झालंच. पण...तुम्ही काय उपाय सुचवता?" कृष्ण नरेंद्रांनी विचारलं,

" नेहमीचाच. शिवाय सिद्धही झालंय तो खात्रीचा असल्याचा." बोलता बोलता वेणु भ्रमरवरचे डोळे तलवारीच्या पात्यासारखे लकाकले.

कृष्ण नरींद्रांच्या डोळ्यांपुढून उत्कलच्या अभिशप्त इतिहासातली असंख्य रक्तरंजित पाने फडफडून गेली. विश्वासघात आणि पाठीवर घातलेल्या घावाच्या अनेक कथा त्यांना आठवल्या...दीर्घ सुस्कारा टाकला त्यांनी.

वेणु भ्रमरवर सळसळत होते, म्हणाले, " गप्पसे झाला ? पटली नाही गोष्ट ?"

कृष्ण नरींद्रांनी उत्तर केलं, " सूर्यवंशाच्या पराभवानंतर उत्कलच्या इतिहासात वारंवार हेच तर चाललंय. पण यामुळं रोगाचा नाश होणार आहे का हा खरा प्रश्न आहे."

" मागची गोष्ट राहू दे. आताचं पहा काय ते. शिवाय यात तुम्हाला तोटा नाही, उलट लाभच होईल. कारण असं बघा, सुजाखाँ जेव्हा राजाची फरफट काढील तेव्हा दिवाण सुटेल का ? सांगा."

कृष्ण नरींद्र चिंताजड स्वरात म्हणाले, " ते झालं. पण तो नायबनाजिम सुजाखाँचा वकील सैय्यद बेग फौज घेऊन बसलाय. नंतर महाराजांच्या पक्षाला जाऊन मिळाला तर ?"

वेणु भ्रमरवरने इकडे तिकडे पाहिलं आणि दिवाणाच्या कानात म्हणाले,

" मला नक्की ठाऊक आहे त्याला राजाचं सोयर ना सुतक. शिवाय महाराज हळूहळू फारच स्वतंत्र व्हायला लागलेत हेही तो जाणतो."

दिवाण हताश होऊन म्हणाले,

" मग माझं हो कशाला काय म्हणणं असायचंय ? चला, शुभस्य शीघ्रम्."

त्याच दिवशी अर्धी रात्र उलटून गेल्यावर–

खोर्धा युंझारपूर आणि बरुणेईगडमध्ये एकेक दिवस एकेका युगासमान होता.

सगळे निद्रामग्न होते. राणीहंसपुरात एकाही दिव्याची लुकलुक दिसत नव्हती.

राजप्रासादाच्या बाहेरच्या बाजूला गोपीनाथदेवाचे साधनागृह होते. तिथे मात्र दिवा होता. त्याची प्रकाशरेषा दाराच्या फटीतून बाहेर येत होती, जशी तलवारीच्या पात्यावरून ठिबकणारी रक्तधाराच. साधनागृहातून धूप अर्गजाचा वास दरवळून बाहेर येत होता आणि रात्रीचं मूर्छित वातावरण सुगंधी होत होतं.

साधनागृहाच्या आत चौरंगावर चंदनाने मोहिनीयंत्र रेखून गोपीनाथदेव ध्यानमग्न होऊन बसले होते. यंत्रावर चंदन, पत्र, पुष्प, तांबूल वगैरे वाहिलेले दिसत होते.

गोपीनाथदेवाच्या सन्मुख एक नग्न नवयुवती आपली दृष्टी स्वतःच्याच उन्नत उरोजांवर खिळवून बसली होती. तुपाच्या दिव्याचा मंद प्रकाश तिच्या शरीरावरून ओघळत आजूबाजूला पसरत होता. गोपीनाथदेवांनी लाल रंगाचे उत्तरीय पांघरले होते. प्रशस्त वक्षावर रुद्राक्षमाळा, डाव्या दंडावर अष्टधातूंचे कवच आणि भाळावर रक्तचंदनाचा टिळा शोभत होता. त्यांचे मुखमंडल गंभीर आणि रहस्यपूर्ण दिसत होते. कोण जाणे, कुठल्या गृहस्थाघरच्या कुलवतीचं आज या गुप्त साधनेसाठी अपहरण झालं होतं! बिचारी!! असल्या या साधनेच्या वेळी बक्सी वेणु भ्रमरवरही हजर असतात. पण आज ते दिसत नव्हते खरे. काही सुरापात्रे गोपीनाथदेवांपाशी रिकामी पडली होती. ही मोहिनी साधनेची पंचमकार साधना होती. सगळ्या तऱ्हेच्या भोगांत राहून प्रवृत्तींवर विजय मिळवायचा अशी या साधनेची रीती आहे. मगच साधक वीरभद्र होतो. आणि त्याला सिद्धी प्राप्त होतात.

गोपीनाथदेव आता युवतीच्या नग्न शरीरावर फुलं वहात मंत्रपाठ करीत होते.

"पद्माननां श्यामवर्णां पीनोत्तुंगपयोधराम्
कोमलांगी स्मेरमुखीं रक्तोत्पलदलेक्षणाम्
ॐ ह्रीं आगच्छ पद्मिनी स्वाहा......"

उघड्या देहाला पुष्पदळांचा स्पर्श झाला की युवतीचे पाषाणसदृश निश्चल शरीर वाऱ्यामुळे कंपित होणाऱ्या किसलयासारखं शहारत होतं. पण गोपीनाथदेवांचे मन अगदी निर्विकार होते. ते स्वतःच दगडाची मूर्ती बनले होते जणू.

कशामुळे कुणास ठाऊक दरवजा अचानक उघडला. मद्यपानामुळे धुंद झालेल्या डोळ्यांना बक्सी वेणु भ्रमरवर दिसले. त्यांच्या हातात एक करवाल होता. वेणु भ्रमरवराचा तो उग्र आविर्भाव बघून ती नग्न सुंदरी हलके एका काळोख्या कोपऱ्यात सरकली. गोपीनाथदेवांना बक्सींचे हे वागणे समजतच नव्हते. ते किंकर्तव्यविमूढ होऊन बघतच राहिले.

थोड्या वेळाने शांत स्वरात ते म्हणाले,

"बक्सी, भैरवी चक्राच्या या साधनेत खड्गाची काहीच आवश्यकता नाही. मनःसंयमाच्या तरवारीनेच मायेचा दोर व प्रवृत्तींची बंधने तोडायची असतात."

त्यावेळी बक्सींचे दोन्ही डोळे क्रूर झाले होते. त्याचा अर्थ जाणून गोपीनाथदेव प्रतिकार करणार त्यापूर्वीच बक्सीने त्यांच्या अंगावर उडी घेतली व एका फटकाऱ्यानिशी त्यांचा शिरच्छेद केला. धडावेगळे मस्तक मोहिनीयंत्रावर पडले. जणू शेवटचा बळी चढला.

पण गोपीनाथदेवांच्या हत्येनंतर देखील बक्सींचे पाय खोर्ध्याच्या राजसिंहासनाला लागले का? वधाच्या दुसऱ्याच दिवशी सकाळी थोड्या फौजेनिशी बक्सी जेव्हा चौरीनवर बांकियाला चालले होते तेव्हा रस्त्यातच सशस्त्र सैय्यद बेगने त्यांना अडवले. बक्सी सैय्यद बेगला बघून थबकले. वास्तविक त्याच्याच पाठिंब्याने तर आदल्या रात्रीचे गोपीनाथदेवांच्या हत्येचे कृत्य पार पडले होते. तोच हा सय्यद बेग रात्र उलटताच निराळा दिसू लागेल याची बक्सीनी स्वप्नातही कधी कल्पना केली नव्हती. त्याला तसा पाहून बक्सी जागच्या जागी थांबले.

सय्यद बेगला एवढी साधी अक्कल खास होती कीं एकदाचा विश्वासघातकी सदाचा विश्वासघातकी असतो. ज्याने स्वतःच्या राजाशी दगलबाजी केली तो मोंगल सत्तेविरुद्धही कशावरून नाही दगलबाजी करणार? गोपीनाथदेवाला खोर्ध्याच्या सिंहासनावरून खाली खेचायचंच होतं. त्यासाठी सैय्यद बेगने बक्सींचा फक्त उपयोग करून घेतला होता. पण म्हणजे त्यांच्यावर संपूर्ण विश्वास नव्हता टाकला त्याने. बक्सी शिरजोर व्हायच्या आधीच बाकी नजराण्याचा वसूलही करायचा होता; त्यासाठी गोपीनाथदेवांचा धाकटा भाऊ रामचंद्रदेव याला सैय्यद बेगने खोर्ध्याच्या सिंहासनावर प्रस्थापितही करून टाकले होते. याखेरीज, आणखीही एक महत्त्वाचे कारण होते – दिवाण भगी भ्रमरवराच्या मुलाला वेणू भ्रमरवराला खोर्ध्याचा अधिपती म्हणून स्वीकारायला बाकीचे सामंत, किल्लेदार तयार नव्हते.

सिंहासनावरून रामचंद्रदेव किंकर्तव्यमूढ बक्सींकडे पहात म्हणाले, "यावं बक्सी. तुम्हाला अभय दिलं आहे."

बक्सींने कमरेची तलवार काढली व एखाद्या सेवकाप्रमाणे ती रामचंद्रदेवांच्या पायाशी ठेवली व स्वतः खाली मान घालून उभे राहिले. सिंहासनामागून अपराध्या-प्रमाणे त्याच्याकडे बघत दिवाण कृष्ण नरेंद्र उभे उभे होते. बहुधा डोळ्यांच्या भाषेत ते त्याला म्हणत होते, "जाऊं दे. हा बेत फसला. पुढं बघू." पण त्यावेळी त्यांच्याकडे बघायचे धैर्य बक्सीना झाले नाही.

दुसऱ्या संधीची खूप वाट बघावी लागली. रामचंद्रदेव जेव्हा टिकालीच्या युद्धावर निघाले तेव्हा छत्रद्वारघाटीचं रक्षण करण्याची जबाबदारी वेणु बक्सीवर सोपवून गेले. ती त्यांनी व्यवस्थित पार पाडली असती तर चिकाकोलच्या फौजेची लांडगेतोड झाली असती. मालुद सेनापतीने पिछाडीहून आक्रमण करण्याचा प्रयत्न केला असता तर तो राहिलाच नसता जागेवर. पण त्या दिवशी जाणूनबुजून बक्सींनी छत्रद्वारहून सैन्य हलवले. निःसहाय राजाला मृत्युमुखात ढकलल्यावर त्यांना वाटले आता तरी खोर्धा सिंहासन

माझंच. पण त्यांच्या स्वप्नातही असा विचार आला नव्हता की राजा रामचंद्रदेव सुळावर न दिले जाता कटकचा नायबनाजिम तकीखाँच्या बहिणीशी लग्न करतील आणि अर्थातच पुरीला परततील.

दैवाने बक्सींच्या सगळ्या आकांक्षांवर पाणी फिरवले.

आता हेही खरंच होतं की तसं अगदीच पाणी पडलं नव्हतं. राजानं मुसलमानी धर्माचा स्वीकार केला होता. यवनीच नव्हे तर यवन नावही स्वीकारून रामचंद्रदेवचे हाफिज कादर बेग झाले होते. साहजिकच, उत्कलचे दुर्गाधिपती, सामंत, पाइक त्यांना या परिर्वतित रूपात गजपती म्हणून स्वीकारायाला तयार नव्हते. नुसता एखादा इशारा करायचा अवकाश की...पण अस्सल अडथळा होता तकीखाँचा; आणि हाफिज कादर बेग किंवा रामचंद्रदेव म्हणा, पण ते होते तकीखाँचे भगिनीपती. तेव्हा पहिल्या प्रथम मेव्हण्यामेव्हण्यात संशयाचे वातावरण केले पाहिजे. जोवर ते एकमेकांचे शत्रू होत नाही तोवर खोर्धाच्या सिहासनावरून रामचंद्रदेवना बाजूला करणं शक्य नाही. बक्सी वेणु भ्रमरवर आता अशा एखाद्या संधीची वाट पहात होते.

बलिसाही राजमहालात बसून बाह्यत: जपमाळा फिरवीत ध्यानमग्न बसलेले बक्सी याच कारस्थानाचा विचार करत होते. आता जगन्नाथालाही या भानगडीत ओढल्या शिवाय गत्यंतर नाही. एका बाजूला खोर्धा सिंहासनाच्या प्राप्तीची शक्यता आणि दुसऱ्या बाजूला बाकी सगळं – अगदी जगन्नाथसुद्धा !

अचानक बक्सी दचकले.

आतला अंधार जरासा डहुळला आणि एक सावली दिसली. बक्सींचे कपाळ घामाने थबथबले.

महालाच्या बाहेर जइ पट्टनायक बक्सींच्या बोलावण्याची वाट पहात थांबले होते. अंगावरच्या उपरण्याने ते घाम पुसत होते. तकीखाँच्या दरबारात जइ पट्टनायक खोर्धाचे वकील होते. वय तसं कमी नव्हतं. पण चेहरा सामर्थ्य दाखवत होता. डोक्याचा गोटा, गळ्यात तुळशीची माळा आणि प्रशस्त ललाटावर हरिचंदनाचा टिळा शोभत होता. पण या सगळ्यांत सर्वांत आधी काय नजरेत भरत असेल तर जाड जाड भुवयांखालचे गंभीर डोळे. वरवर उदासीन भाव दर्शवणारे ते डोळे कपट, क्रूरता व कारस्थान यांना लपवून ठेवत होते.

जइ पट्टनायक थोड्याच वेळापूर्वी कटकहून आले होते. घामाने त्यांचा अंगरखा जागोजाग अंगाला चिकटला होता.

त्यांना पाहून बक्सी भानावर आले. पट्टनायकना आत बोलावलं...

ते आत आले. बक्सींच्या जवळचे आसन ओढून घेऊन त्यावर बसले. बक्सींनी विचारलं,

"हं, कटकची काही विशेष बातमी ?"

खालच्या स्वरात पट्टनायक उत्तरले,

"एक अतिशय महत्त्वाची बातमी घेऊन आलो आहे. चिकाकोलहून दोन वर्षांच्या नजराण्याची थकबाकी घेऊन नरसा राजू कटकला यायला निघालाय. थोडी थोडकी नव्हे तीन लाखाची रक्कम आहे."

"ही कसली खबर ? असे कैक लाख रुपये आजवर चिकाकोलहून कटक मार्गे जगत्सेठ दिल्लीला घेऊन जाताहेत आणि निजाम उल्मुल्कला पोचवताहेत. मग यासाठी एवढी धावपळ कशाला केली ? शिवाय त्या नजराण्याचा न् वेणु भ्रमरवरचा संबंध काय ? खबर म्हणजे कटक — लालबागदुर्गमधली हालचाल, राजनैतिक वातावरण, सरफराजखाँ आणि सुजाखाँ यांच्यातील भांडणे — विशेषत: मुर्शिदाबादच्या मनसबदारी-वरून होणारी भांडणे कुठवर आली आहेत. उत्कलच्या सरहद्दीपासून मराठा फौजा कुठेशा आहेत; आणि सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे महाराज रामचंद्रदेव न् तकीखाँचं आपसात कसं आहे — इत्यादी बातम्या जाणून घ्यायला बक्सी विलक्षण उतावळे झाले होते. नरींद्र कृष्ण आणि बक्सी भ्रमरवरनेच तर कटकच्या दरबारात जइ पट्टनायकाची नेमणूक केली होती. व त्याचं प्रमुख कारण म्हणजे तकीखाँत व रामचंद्रदेवात गैरसमज निर्माण करून बेदिली होईल असं करायचं. खोर्धावर आक्रमण करण्यासाठी तकीखाँला चिथावणी द्यायची. खोर्ध्यात खुट् झालं की आवाज कटकेत जातो. इतके दिवस न खोर्धावर आक्रमण ना जगन्नाथमंदिराची लूट; त्यामुळे तकीखाँचं लष्कर कंटाळून गेलं होतं, पण सुजाखाँच्या वेळेपासून राय आलमचंद, फतेहचंद वगैरे हिंदू जे दरबारात वजन बाळगून होते त्यांच्या भीतीमुळे तकीखाँही जगन्नाथावर हात उगारायला मागे घेतो.

बक्सीने रुष्ट स्वरात विचारले.

"चिकाकोलच्या नजराण्याचा न् आमचा काय संबंध ?"

जइ पट्टनायकच्या चेहऱ्यावरून धूर्त हास्याची एक रेषा तरळून गेली. उत्तरादाखल म्हणाले, "नाही लक्षात येत आपला संबंध ? खोर्ध्याची सीमा पार करेतो कोणत्याही तऱ्हेनं नरसा राजूला किंवा अगदी खरं बोलायचं तर खजिन्याला धक्का पोचू नये यासाठी ताकीदीचं पत्र खोर्ध्याच्या महाराजांना देण्यासाठी खुद्द तकीखाँनं माझ्याकडं दिलंय."

बक्सी अधीर झाले होते. घाईने म्हणाले,

" असेल. तो राजा न् ते पत्र बघून घेतील एकमेकांना.

पट्टनायक शांत स्वरात म्हणाले,

" अजून लक्षात आलेलं दिसत नाही. अहो, खोर्ध्याच्या हद्दीत जर चिकाकोलच्या दिवाणाला, त्या नरसा राजूला समजा काही झालं, किंवा खजिनाच लुटला गेला..."

एका क्षणात बक्सीच्या डोक्यात उजेड पडला. भुकेलेल्या सापाच्या डोळ्यागत बक्सींचे डोळे चमकले. त्याला आणखी भडकवण्यासाठी जइ पट्टनायक म्हणाले, " तीन लाख काही थोडीथोडकी रक्कम नाही. दिल्लीहून वारंवार ताकीद येत होती कटकेला रुपयांबाबत. अशा परिस्थितीत तीन लाख हातसांड झाले तर तकीखाँची काय स्थिती होईल."

बक्सींनी विचारलं, " कधी निघतोय नरसा राजू ? बरोबर फौजफाटा किती ?"

पट्टनायक उत्तरले, " सगळी बातमी काढूनच आलोय. माघात राजू चिकाकोल सोडेल, बरोबर पन्नासेक घोडेस्वार असतील. सोमपेठपर्यंत चिकाकोलची सरहद्द आहे. तिथून पुढे खोर्ध्याची हद्द सुरू होते. शिवाय खुद्द नरसा राजू निश्चित आहे "

बक्सी पलंगावरून उतरले व प्रेमादराने त्यांनी पट्टनायकला आलिंगन दिले, म्हणाले,

" आपण निश्चित मनाने कटकला जा. महाराजांना मुद्दाम भेटून हे सांगण्याची जरूरी नाही. मात्र तकीखाँला हे सांगायला विसरू नका की योग्य वेळी खबर पोचली. आपले हे उपकार आमच्या निरंतर स्मरणात राहतील."

जइ पट्टनायक गेले. मग बक्सींनी बाणपूरगडच्या महाराणी ललिता महादेईला एक पत्र लिहिले.

" महाराज रामचंद्रदेव उर्फ म्लेंच्छ हाफिज कादर बेगचे आठवे संवत्सर, तुला दिनांक पाच, पुरुषोत्तमक्षेत्र स्थित बालिसाही राजप्रासादाहून बक्सी वेणु भ्रमर-वर देव रायचा खोर्धा महाराणी ललिता महादेईला साष्टांग नमस्कार. पत्र लिहीणेस कारण म्हणजे येत्या माघात चिकाकोलचा दिवाण नरसा राजू गेल्या दोन वर्षांची नजराण्याची थकबाकी रुपये तीन लाख घेऊन कटकला जाणार आहे. त्याच्याबरोबर फक्त पन्नास सैनिक असतील. खोर्ध्याच्या हद्दीत खजिन्याची लूट झाली पाहिजे. म्हणजे तकीखाँचा समज होईल की महाराजांनीच खजिना मारला. यात आपला फायदा असा की जेव्हा चिडून तकीखाँ खोर्ध्यावर चालून येईल तेव्हा एकही पाइक सैनिक प्रतिकार करणार नाही. त्यावेळी तकीखाँशी तह करून भागीरथी कुमारला सिंहासनावर बस-

वण्याचे करू. ही मसलत यशस्वी झाली नाही तर सध्याचे खोर्धा सिंहासनावरचे म्लेंच्छ वर्चस्व – आपल्याला स्पष्ट सांगायला नकोच – नाहीसे करणे भविष्यात अशक्य होईल. महादेवींनी जेव्हापासून बरूणेई गडातून प्रयाण केलं तेव्हापासून खोर्ध्याची राज्यलक्ष्मीच सोडून गेली. पथरगडावर राजप्रासादावर आजकाल रझियाबीबीची सत्ता चालते. तिनं दिवसाच्या प्रकाशाला रात्रीचा अंधार म्हटलं तर महाराज लगेच मान तुकवतात. हे पत्र पोचताच बाणपूर व सालेरी घाटयातले सैन्य आपण तयारीत ठेवावे. मी इथून अतिशय विश्वासू असे दोनशे सैनिक पाठवतो. ते बाणपूर सालेरीतच दिवाण नरसा राजूला मारून खजिना लुटतील. मकर पंधरापर्यंत नरसा राजू बाणपूरला पोहोचेल.

हे पत्र घेऊन येणाऱ्याकडे पगडी व कटयार खूण म्हणून दिली आहे."

पत्रावर मोहोर करून वेणु भ्रमरवरने आपल्या एका खास विश्वासू सैनिकाबरोबर ते बाणपूरला रवाना केले.

मग गद्गद् स्वराने हात जोडून जगन्नाथाची प्रार्थना करत म्हणाले, "हीच अखेरची संधी आहे महाप्रभू ! ही हुकली तर मग आशा नाही. जशी तुझी इच्छा प्रभु ! !"

## 3

सांजवेळेची शीतल छाया हळूहळू बरूणेई शिखरावरून खालच्या प्रदेशात उतरत होती. स्तब्ध थंड नैराश्य सगळीकडे पसरत होतं. वटवाघळांचा थवा जसा चुपचाप उतरावा तसं. गडाच्या तटाभोवती बांबूचे जंगल होते. एकटा एक पक्षी कधीपासून चिट्र चिट्र करत होता तो एकदम गुपचुप झाला. बरूणेईगडातल्या मठांतून सायंघंटांचा आवाज तेवढा ऐकू येत होता.

झोपेची झापड रामचंद्रदेवांच्या डोळ्यांवर होती आणि त्या अर्धनिद्रेत त्यांना स्वप्नात दिसत होती रझियाबेगम. त्या एकटया पक्ष्यासारखी रझियाबेगमची स्मृती रामचंद्रदेवांना एकटे असताना अनेक वेळा बेचैन करते. आठवणीत एखादी तान, एखादा स्वर राहून जावा अन् प्रत्यक्ष मात्र काहीच नसावं तशी रझियाबेगम.

वेणु भ्रमरवरने विश्वासघात केला म्हणायचा तर ! हा अनुत्तरित प्रश्न रझियाच्या आठवणीत मिसळून त्यांना वारंवार बेचैन करत होता. ज्या वेणु भ्रमरवरने आपल्या अन्नदात्याचा – गोपीनाथ महाराजांचा खून केला तो विश्वासघात करणार नाही तर

आणखी काय करणार ? पण खोर्धा राजसिंहासनाची मनातल्या मनात कामना बाळगणाऱ्या रामचंद्रदेवाला एक बालसदृश विश्वास असाही वाटत होता की बहुधा भ्रमरवरला खोर्ध्याच्या कल्याणाची काळजी वाटत असेल. आणि म्हणून गोपीनाथदेवांसारख्या दुर्बळ मनाच्या, इंद्रियासक्त राजाला सिंहासनावरून दूर करण्यासाठीच केवळ नाईलाजाने त्याने राजहत्या केली आहे. दिवाण कृष्ण नरींद्राने देखील त्यांच्या या समजाला खतपाणीच घातले होते. म्हणून तर टिकालीच्या लढाईच्या वेळी बक्सी छत्रद्वार घाटी सोडून आले होते त्याला विश्वासघात म्हणावं की युद्धाच्या डावपेचाचा एक भाग म्हणावं हे रामचंद्रदेवांना कळेना. अजूनही ते दुग्ध्यात होते व त्यांचं मन बेचैन होतं.

पथरगड राजमहालात नितांत शांतता होती. ज्यावेळी रामचंद्रदेवांनी धर्मांतर केलं त्या वेळेपासून अनेक सामंत, विश्वस्त राजपदाधिकारी, इतकेच नव्हे त्यांचे नातेवाईक देखील त्यांच्याकडे तिरस्काराच्या नजरेने पाहू लागले होते. त्यांचे बरेचसे मांडलिक, दुर्गाधिकारीही तसेच वागत होते. प्रजेच्या मते राजाने धर्मांतर करून जगन्नाथाशी द्रोहच केला तेव्हा तिचीही निष्ठा फारशी त्यांच्या बाजूला नव्हती; शिवाय उत्कलचा मुकुटमणि, जगन्नाथाचे पिढीजात सेवक गजपती कधी मुसलमान बनतील असली अभद्र कल्पना जगन्नाथभक्त प्रजेच्या स्वप्नातही शिवली नव्हती. पण आज ती प्रत्यक्षात उतरलेली ते पहात होते.

पण रामचंद्रदेवांनीही त्याच जगन्नाथाचे रक्षण करण्यासाठी म्लेंच्छ धर्म पत्करला होता; पण ही वस्तुस्थिती ते कुणाला अन् कशी समजावून सांगणार होते ? टिकालीच्या युद्धानंतर रामचंद्रदेवांची खात्री होऊन चुकली होती की दोन शतकांच्या सतत परकीय आक्रमणांमुळे उत्कलवासीय जर्जर झालेत. सारखं आत्मरक्षण. त्याकरता रक्ताचे पाट वहावायचे, विश्वासघात व्हायचे, मग विटंबना... काय काय सोसलं होतं त्यांनी ! शिवाय यवन रक्तबाहूपासून अफगाणापर्यंत जे जे कुणी आक्रमक आले त्यांचं मुख्य लक्ष्य जगन्नाथ हे होतंच. त्याशिवाय त्यांच्या आक्रमणांची सांगताच होत नसे. आता जर तकीखाँनेही आक्रमण केलं तर जगन्नाथाला वाचवायचा कुठलाही उपाय नव्हता.

जगन्नाथ हा त्या अदम्य उत्कलचा आत्मा आहे. म्हणूनच आजवर तो अपराजेय राहिला. त्याला तकीखाँच्या हाती सोपवण्याची कल्पनाही रामचंद्रदेवाला सहन करणे शक्य नव्हते.

आता धर्मांतर केल्यानंतर सगळेजण रामचंद्रदेवाला सोडून गेले होते. अर्थात् रामचंद्रदेवना त्याचं दुःखही नव्हतं. कारण जोवर तकीखाँचा हाफिज कादर बेगवर विश्वास होता तोवर जगन्नाथाला कसलंच भय नव्हतं. त्यांनी तकीखाँला खोटं आश्वासनही दिलं होतं की जगन्नाथाचा ब्रह्मपिंड, ज्याला काळापहाडसुद्धा कधी स्पर्श करू शकला नव्हता

तो दुर्लभ मणिमय पिंड ते तकीखाँला आणून देतील. आश्वासन मिथ्या असे. पण तकीखाँला ते कळायचा काहीच मार्ग नव्हता. म्हणून तो खोर्धा व जगन्नाथाविषयी निश्चित होता; आणि फावला वेळ इतर मंदिरं व देवळं फोडण्यात आणि इतर जमीनदार व किल्लेदारांना सतावण्यात मग्न होता.

जगन्नाथ तसे सर्व तऱ्हेने सुरक्षित होते. ज्या दिवशी दक्षिण सीमेवरचे टिकाली–रघुनाथपूर खोर्ध्यापासून तोडून चिकाकोलला जोडलं तेव्हापासून खोर्ध्यावर मोंगल आक्रमण होईल अशी शंकाही उरली नव्हती.

पूर्वीचं गंगेपासून गोदावरीपर्यंत पसरलेलं विशाल उत्कल साम्राज्य आता खोर्धा. राज्यापर्यंतच उरलं होतं. एक काळ असा होता की उत्कलच्या गजपतींचं नाव ऐकलं की गौड देशापासून ते गोवळकोंड्यापर्यंतचे प्रबळ पराक्रमी राजेही थरथर कापत; पण आता ते साम्राज्यही गेलं, ते गजपतीही राहिले नाहीत अन् ती प्रचंड पराक्रमी पाइक सेनाही उरली नाही.

पण या सर्वांची उणीव खोर्धानं भरून काढली; कारण टीचभर खोर्ध्याला जिंकण्यासाठी दाऊदखाँपासून ते खान–ए–दौरांपर्यंत प्रत्येकाने जिवाचा आटापिटा केला होता. तरीही खोर्धा होतं तिथचं, होतं तसंच राहिलं. अजिक्य, दुर्दम्य पण त्यासाठी उत्कलला भारी किंमत मोजावी लागली होती. दीडशे–एक वर्ष सततच्या लढायांमुळे सगळी भूमीच स्मशान बनली होती. जिथे हिरवीगार पिकं डोलत असायची तिथे वैराण वाळवंट झालं होतं... गावच्या गाव ओस पडले होते... घराघरांतून लेकीसुनांची फटफटीत कपाळं बघायचं नशिबी आलं होतं; त्यांचे हुंदके कानात तापल्या तेलासारखे वाटायला लागले होते. किती काळ उत्कल टिकाव धरील ?

रामचंद्रदेव पतित होऊ देत, मुसलमान होऊ देत; पण उत्कलमध्ये शांती नांदू देत, जगन्नाथाला धक्का न पोचू देत. भविष्यात हे स्वप्न कधी खरे होईल तेव्हा होईल की प्रदीर्घ कृष्ण अंधकारमय रात्रीनंतर खोर्धा नवीन जीवनाने, नवोदित सूर्याच्या किरणांनी प्रफुल्लित झालंय. या आशावादानंच तर रामचंद्रदेवांना सहस्र संकटं सहन करायचं बळ दिलं होतं.

दक्षिणेत आणखी एक हिंदूंची शक्ती प्रबळ झाली आहे. मराठा सत्ता. त्यांनी तर चौथाई सरदेशमुखीसाठी खुद्द दिल्लीचे दरवाजे ठोठवायला प्रारंभ केला आहे. मोंगलांचे दिवस भरलेच म्हणायला हरकत नाही. ते तरी अंतर्गत भांडणं न् विश्वासघात या दुहेरी माऱ्यापुढं किती टिकाव धरणार ?

पण ओडिसाला खरी भीती दिल्लीकडून नाहीच आहे. दिल्ली तशी दूर आहे.

पण जवळच असलेले मुर्शिदाबाद, बंगाल–बिहारच्या व ओडिसाच्या राजधान्या हे पापग्रह खोर्ध्याच्या राशीला आहेत. यातलं मुर्शिदाबादही गृहकलहानं पोखरलेले आहे. सुजाखाँने आपला अनौरस पुत्र तकीखाँ याला कटकचे नायब–नाजिमपद देऊन मुर्शिदाबादेवर स्वत:ची सत्ता प्रस्थापित करून ठेवली. त्यानंतर जर त्याने बिहार–आझिमाबादचे नायबपद स्वत:च्या सख्ख्या मुलाला सरफराजखाँला दिलं असतं तर कसलाच प्रश्न उपस्थित झाला नसता. पण बिहार–आझिमाबाद त्याने आपल्या मर्जीतल्या अलिवर्दीखाँला दिलं. त्यामुळे बापलेकांत हळूहळू आग भडकायला लागली होती. मुर्शिदाबादची परिस्थिती खालावत चालली होती; आणि त्याचाच फायदा खोर्ध्याचे पूर्ववैभव मिळवण्यासाठी करायचा असा संकल्प रामचंद्रदेवाने केला होता. त्यासाठी उत्कलमध्ये काही काळ तरी संपूर्ण शांती नांदणे आवश्यक होतं.

रामचंद्रदेव देखील रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत लढायला तयार आहेत. पण उत्कलचा खरा शत्रू मोंगल नव्हेच; घरातलेच भेदी न द्रोही आहेत. म्हणून तर आज या घटकेला बक्सी वेणु भ्रमरवर, दिवाण कृष्ण नरींद्र, मुख्य मुख्य दुर्गाधिकारी कुणाचाच भरवसा देता येत नाही. स्वत:च्या छायेचा देखील. जराशी गाफिली की कुणीही पाठीत वार करील.

पण असं असलं तरी उत्कलच्या इतिहासात कधीही सूर्याजी पिसाळांचा जय झालेला नाही. फक्त एक विश्वासघात अनेक विषयुक्त घटनांना जन्म देतो. अन् मग हे चक्र कधी थांबतच नाही. त्यातच त्या सूर्याजी पिसाळांचाही अंत होऊन जातो.

अशा या परिस्थितीत नायब–नाजिम तकीखाँची मैत्री रामचंद्रदेवाला सुरक्षा कवचासारखी वाटली तर नवल नाही. पण रामचंद्रदेव दुधखुळा नव्हता. तकीखाँ फक्त योग्य संधीची वाट बघतोय हे त्याला ठाऊक होतं. तकीखाँचा कयास असा होता की यवनीशी विवाह करून रामचंद्रदेव राय आलमचंद, वा फतेचंदप्रमाणे एखादा सरदार बनून राहील. म्हणजे खोर्धा सिंहासन आपोआप रिकामं राहील. तसं झालं की खोर्धा कटकला जोडायला कितीसा वेळ लागतो ? ते करून चिकाकोलपासून सुवर्णरेखापर्यंत हातपाय पसरण्याची तकीखाँची इच्छा होती; म्हणून तर रामचंद्रदेवांना कलमा पढवून आपल्या बहिणीशीच, रझियाशी त्याने रामचंद्रदेवांचे लग्न लावून दिले होते. त्यात नुसतं एक धार्मिक कर्तव्य पार पाडल्याचं समाधानच नव्हतं तर त्यामागे एका सुनिश्चित कटकारस्थानाचा आरंभही झाला होता. यात रजियाबेगमसारख्या कोवळ्या कळीचाही यज्ञीय पशूप्रमाणे बळी द्यायला तकीखाँने मागेपुढे पाहिलं नव्हतं.

पण रामचंद्रदेव राय आलमचंद वा जगत सेठसारखं लोभापायी हातपाय बांधून लालबाग दुर्गातल्या सोनेरी पिंजऱ्यात आनंद मानत बसणारे व्यक्ती नव्हते. ते खोर्ध्याला परतले. त्यामागचा त्यांचा हेतूही तकीखाँने नेमका हेरला होता आणि तेव्हापासून त्याची शनिदृष्टी रामचंद्रदेवांच्या मागोमाग बारकाईने फिरत होती, त्याच्यावर वार करण्यासाठी योग्य प्रसंगाची वाट पहात होती. इकडे घरभेद्यांनीही खोर्धा सिंहासन म्हणजे कंटकशय्या करून ठेवली होती.

अखेर महाराणी ललिता महादेई देखील त्याच घरभेद्यांना जाऊन मिळाली. यवनी रझिया खोर्ध्याची महाराणी होणार व शेवटी तिचा मुलगा खोर्ध्याचा युवराज होणार या कल्पनेनंच ती नागिणीसारखी खवळून उठली होती. रामचंद्रदेव खोर्ध्याला परत येण्यापूर्वीच आपल्या बांगड्या वाढवून स्वतःला वैधव्य आल्याची घोषणा करून ती माहेरी चालती झाली होती. जोवर कुमार भागीरथीरायला खोर्धा सिंहासनावर बसवण्याचं कारस्थान यशस्वी होणार नाही तोवर खोर्धा राज्याच्या मातीवर पाय ठेवणार नाही अशी प्रतिज्ञा तिनं केली होती.

आकाशात एकट्याच लुकलुकणाऱ्या नक्षत्रासारखे आज रामचंद्रदेव संपूर्णपणे एकटे होते. खोर्ध्याला शांती, सुरक्षितता लाभावी, जगन्नाथाची अप्रतिष्ठा होऊ नये म्हणून त्यांनी धर्मत्याग देखील केला. समाज, संस्कार, इहलोक, परलोक सगळ्यांना तिलांजली दिली. त्याच त्यांच्या मातृभूमीहून ते निर्वासित झाले आहेत न् जगन्नाथाच्या पायरीशी केवळ उभे राह्यलाही अपात्र ठरले आहेत.

असं वाटतं की भवितव्यतेच्या क्रूर कारस्थानाच्या पोटात सगळंच गडप झालंय. पण तरीही...तरीही नवी वाट चोखाळून वेगळ्या दिशेनं प्रयत्न करायला तर ते मोकळे होते. यात तर त्यांना खुद्द जगन्नाथही रोखू शकला नसता; कारण माणसाच्या मुक्तीचा हाच एक मार्ग आहे. आणि मुक्ती प्राप्त करणे माणसाचा जन्मसिद्ध अधिकार आहे. रामचंद्रदेवाच्या मनात म्हणूनच धैर्य होतं. रामचंद्रदेव मनातल्या मनात कल्पना करताहेत...अंधारा मार्ग...त्यावरून ते एकटे चालले आहेत...दिवा घेऊन. अचानक झंझावात सुरू झाला आणि तो दिवाच विझला. मागे आश्रय नाही, पुढे आधार नाही; फक्त अंधारा मार्ग आहे. मग आता चालणं थांबवायचं ? इथूनच मागे जायचं ? गंतव्य मार्गावर आणखी पुढे नाही जाता येणार ?

श्रांत झालेल्या त्यांच्या पापण्या मिटत चालल्या अन् टिकाली युद्धात बंदिवान बनल्यापासून झालेल्या विटंबनेची चित्रे त्यांना स्वप्नमालिकेसारखी दिसू लागली. दुःसह स्वप्ने.

बारवाटी दुर्गातल्या नवप्रस्त प्रासादात एकंदर नऊ खंड होते. त्यातल्या आठव्या खंडात रामचंद्रदेवासाठी कारागृह बनवलं होतं. टिकालीच्या युद्धात गंजागडपाशी चिलिका तटावर त्यांना कैद केलं होतं आणि लोखंडाच्या पिंजऱ्यात डांबून इथवर आणलं होतं.

कटकचे नायब–नाजिम जेव्हा बारवाटी दुर्गात रहात होते तेव्हा हाच आठवा खंड त्यांचे अंत:पुर होते. नवव्या खंडाच्या दरवाजाकडच्या रस्त्यावरच आणि गडाच्या बरोबर मध्यभागी एक भला मोठा स्तंभ होता आणि त्याच्यावर चढून दुर्बिणीनं सर्वत्र नजर ठेवता येत असे. शत्रूच्या बारीकसारीक हालचालीही समजत असत. महानदीच्या उत्तरेला जरी शत्रू पोचला तरी तो इथून दृष्टीस पडे. इतर खंडांत अतिथीगृह, दरबार भरण्याची जागा, खजिनामहाल, दुर्ग वगैरे रक्षकांची आणि सैन्याची रहाण्याची ठिकाणे, शस्त्रागार, हत्तीशाळा, घोड्यांच्या पागा वगैरे होती. पण नायब–नाजिम आगाखाँ जामन मुळी या काफरांनी बांधलेल्या वास्तूत रहायला तयार नव्हते. म्हणून लालबागेत त्यांनी नवा दुर्ग बनवला होता. तेव्हापासून लालबाग दुर्ग नायब–नाजिमांचं रहाण्याचं स्थान बनलं न् बारवाटी दुर्ग मुख्यत: सैनिक छावणी म्हणून व कारागार म्हणून वापरला जाऊ लागला. शिवाय जनानखान्यातून नबाबाच्या अवकृपेचा विषय झालेल्या हतभागिनीही इथे नवव्या खंडात गत जीवनाची आठवण करीत रहात असत. सुजाखाँच्या वेळीही पुष्कळ बेगमा आपल्या खास दासींसह इथे रहात होत्या.

रामचंद्रदेवांना जिथे ठेवलं होतं ते कारागार होतं. तिथे शेकडोंनी जमीनदार, किल्लेदार, मालगुजार सध्या बंदीत होते. नजराणा दिला नाही म्हणून. त्यांच्या किंकाळ्यांनी आसपासचे थंड वातावरण कापायचे. असं म्हणतात, खान– ए– दौरांच्या कारकीर्दीत याच तुरुंगात सातशे उडिया जमीनदारांच्या हत्या केल्या गेल्या होत्या. आताही इथे जे बंदी आहेत ते कधी बाहेरच्या मोकळ्या हवेत जातील अशी कालत्रयी आशा ठेवत नव्हते. रामचंद्रदेवही त्याला अपवाद नव्हते. शेवटची घटिका जवळ आल्यासारखी रामचंद्रदेवांची मन:स्थिती झाली होती. निर्विकार.

आता रामचंद्रदेव कारागृहाच्या एका चिंचोळ्या खिडकीपाशी उभे राहून बाहेरच्या निळ्या आकाशाकडे बघत स्तब्ध होते. मधून मधून गुलामांची, खोजांची अश्लील बडबड वातावरणातून वहात येत होती त्यांच्यापर्यंत. शिवाय मद्यपानामुळे गडबड करणाऱ्या सैनिकांचे आवाज.

आत संथ थंड अंधार होता. उत्तरेच्या बाजूला एक झरोका होता. त्यातून सायंकिरण आत घुसण्याचा असफल प्रयत्न करत होते; त्यायोगे आतला अंधार थोडासा उजळला होता. त्या उजेडात दगडी भिंतीवरची व खांबावरची कलाकुसर,

उत्कल शिल्पे दिसत होती. नृत्यमग्न ललनांच्या मूर्ती मात्र या निष्प्राण वातावरणात विशोभित वाटत होत्या. एका मंचकावर रेशमी जरीकामाची चादर रामचंद्रदेवांसाठी म्हणून अंथरली असावी. जवळच एक दगडी चौरंग होता. त्यावर पाण्याची सुरई होती व एक ताट पडलं होतं. दुपारी खाऊन टाकलेल्या भाकरीचे तुकडे होते त्यात.

झरोक्यातून समोरच्या जनानामहालाची गुलाबबाग दिसत होती. मागे केव्हा जनाना रहात होता तेव्हा तिची निगा राखली जात असे पण आता तिच्यात वेगवेगळी काटेरी झाडं झुडुपं माजली होती. कारंजी सुकली होती. तरीही त्या शुष्क वातावणात कितीतरी गुलाबांना कळचा आल्या होत्या. किती अस्फुट फुलल्या होत्या. कारागाराच्या बाहेर पहारा देणाऱ्या अफगाणी पहारेकऱ्यांच्या पायातले करंकरं वाजणारे जोडे ऐकू येत होते.

बाहेर हळूहळू आकाश झाकोळायला लागले होते. बागेतल्या गुलाबांवर संध्याछाया पसरली होती. अजून रामचंद्रदेव पाषाणमूर्तीप्रमाणे उभे होते. भूतकाळातल्या अनेक ऐतिहासिक आठवणी शरद्‌ऋतूतल्या ढगाप्रमाणे त्यांच्या शून्य मन:चक्षूसमोरून जात होत्या.

त्या स्मरणातीत भूतकाळात.. त्या काळी महानदीच्या दक्षिण तीरावर वसलेल्या बारवाटी गावाचं नाव कोदिंडा दंडपाट होतं. तिथे एका जखमी ससाण्यावर बगळयाने मात केली होती. अनंगभीमदेवाने हे विलक्षण दृश्य पाहून ती जागा शुभशकुनवंती मानून तिथे बारवाटी दुर्ग बांधला.

भविष्यकाळातल्या कोणत्या घटनांची सूचक ती घटना होती ?

त्या दिवसापासून तिथे सदा बगळयांकडून ससाण्यांची पारध होत राहिली. पण ही दंतकथाच असावी. कारण नाहीतर रामचंद्रदेव इथे बंदी बनून भाकरीचे वाळके तुकडे का मोडत बसले असते ?

पण जिची प्रतीक्षा करत एवढा वेळ रामचंद्रदेव उभे होते ती अद्याप आली नव्हती.

आज संध्याकाळी बागेत येण्याचं ती विसरली का ? त्या बिचारीला काय ठाऊक की या कारागृहातल्या एका छोटयाशा झरोक्यातून रामचंद्रदेव रोज तिला आपल्या वेधक दृष्टीने पहात असतात ? का ते जाणवल्यामुळेच संकोचून ती आज आली नव्हती ?

शून्यदृष्टीने बाहेर पहात असाच काही विचार रामचंद्रदेव करत होते. हा क्षणिक विरंगुळा त्यांचे स्थिर, नि:संग व अनिश्चित बंदिजीवन अंमळ सुसह्य करत होता.

अटळ भविष्याच्या झुरमुरीत रूपासारखं त्या स्त्रीने रामचंद्रदेवांना पुरेपूर भारून टाकलं होतं. त्या दिवशी तिचा काळा बुरखा किंचित् सरकला होता व तिचं ईषद्दर्शन

रामचंद्रदेवांचं कुतूहल चांगलंच चाळवून गेलं होतं. पण कारागृहाच्या या निष्प्राण, संतापजनक आसमंतात तिचं पूर्ण रूप आपल्या कधी दृष्टीस पडेल अशी कल्पनाही त्यांनी केली नव्हती.

ती स्त्री खरोखरीची हाडामांसाची तरी होती का? की आपल्याच मनाचे खेळ आहेत? हेही रामचंद्रदेवांना नक्की कळत नव्हते. इथे बंदी बनून आल्यानंतरच्या लगेचच्या काळातली ही घटना आहे.

गंजागडजवळ चिलिका सरोवराकाठच्या त्या उजाड खेड्यात युद्धाविनाच ते बंदी झाले; ती वेदना त्यांना सतत छळत असे. डिवचलेल्या क्षुब्ध वाघासारखे रामचंद्रदेव त्या टीचभर कारागृहात फेऱ्या घालत असत. वर्तमानच त्यांना अशा धगधगीत असह्य झाला होता की त्या होरपळीपुढे भविष्याचे भयाण रूप त्यांच्या दृष्टीआडच होऊन गेले होते.

अशा त्या ज्वाळामय मुहूर्तावर त्या अवगुंठित स्त्रीचे आगमन झाले होते. बागेत आपोआप उगवलेल्या एका गुलाबाच्या झुडुपाजवळ चेहऱ्यावरचे अवगुंठन ढळले न् आरक्त कपोल व गोरेपान भाळ त्यांच्या दृष्टीस पडले. कानातल्या हिरेजडित कुंडलावर सांध्यसमयीची किरणे पडली आणि ती झळाळून उठली. बुरख्याखालचा चेहरा ढगाआडच्या चंद्रासारखा भासत होता. एखाद्या फुलपाखरासारखी ती बागेभर भिरभिरत होती. कधी डहाळी वाकवून फूल हुंगत होती तर कधी गालावरून फिरवत होती.

हळूहळू हे नेहमीचे दृश्य झाले. रामचंद्रदेवांचा सगळा दिवस संध्याकाळच्या या काही घटकात सामावला जाऊ लागला व कुतूहलाने ते त्या प्रतीक्षेत असे उभे राहू लागले. ते कुतूहल हळूहळू प्रतीक्षा व उत्कंठेचे रूप घेऊ लागले.

दर दिवशी ते दृश्य बघताना अनेक प्रश्नांचे काहूर त्यांच्या मनात उसळत असे. ही लावण्यमयी कोण? कुणाची कोण? जनान्यापैकी कुणी आहे? का एखादा अतृप्त आत्मा आहे? ...रामचंद्रदेव मधुर घोटाळ्यात सापडले होते.

त्यांनी जर बारकाईने निरीक्षण केले असते तर त्यांना असं आढळून आलं असतं की कारंजामागून आणखी एक जण रामचंद्रदेवांच्या सगळ्या हालचाली टिपत असतो. पण त्याचा आभासही त्यांना नव्हता. हळूहळू संध्याकाळ रात्रीत परिणत होत असे, दीप लावणारे येत असत त्यांच्या पावलांचा आवाज येत असे. कारागृहाचा भला मोठा दरवाजा उघडल्याचा, बंद झाल्याचा आवाज येत असे. दुर्गाच्या दुसऱ्या खंडातल्या फतेखाँ मशिदीत संध्याकाळची बांग दिली जाई व त्याने सगळं वातावरण ढवळून जाई. मग ती स्वप्नमूर्ती अदृश्य होत असे.

अन् मग रामचंद्रदेव विचार करू लागत – कोण आहे ती ? कोण ? कोण ? का आली होती ?

त्या दिवशी ती नाही आली. का ? नेहमीप्रमाणे दिवे लावणारा आला आणि शामदान पेटवून गेला. अचानक झालेल्या उजेडामुळे बुजलेली वटवाघळं इकडे तिकडे उडू लागली. पण नेहमीप्रमाणे आज बाहेरचा दरवाजा बंद झाला नाही. बत्तीवाला यंत्रवत् येऊन गेला व त्याच्या पाठोपाठच सलाम् आलेकुम् म्हणत कुणी आत आलं.

तो जबरदस्तखाँ होता. तकीखाँच्या विश्वासपात्र सभासदांपैकी एक. सुजाखाँच्या वेळेपासून अंतर्महालाची देखरेख तोच सांभाळतो. जनानामहालच्या बेगमाही त्याच्यावर विश्वास ठेवून आहेत. जबरदस्तखाँ बाटगा होता पण त्याने मोगलांसारखे डोक्यावर बारीक केस ठेवले होते. गाल शेवाळासारखे दाढीने भरून गेलेले अन् मिशांत मधून-मधून पांढरे केस डोकावायला लागलेले. मेणबत्तीच्या मऊ प्रकाशात जबरदस्तखाँ प्रेमलखाँ वाटत होता. अंगात त्याच्या मखमलीचा लाल कुडता होता. उजव्या बाजूला चांदीची बटणे दोरीत गुंफलेली लटकत होती. कमरपटचात हस्तिदंती मुठीची सुरी होती व डोक्याला टोपी होती.

अशा अवेळी जबरदस्तखाँला इथे बघून रामचंद्रदेव विस्मित झाले. आपल्या दंतहीन चेहऱ्यावर आपुलकी दाखवत तो म्हणाला, "महाराजांचे कुशल आहे ना ?"

या दरबारी पद्धतीशी रामचंद्रदेव चांगलेच परिचित होते. रुष्ट स्वरात ते उत्तरले, "ठीक आहे. काय काम आहे ?"

थोडयाशा इकडे तिकडे फेऱ्या घालत जबरदस्तखाँ उत्तरला, "रोज विचार करत होतो की एकदा हुजुरांचं दर्शन घ्यावं. पण योगच येत नव्हता. आज खुद्द सरकार-स्वारीच म्हणाली की खोर्ध्याच्या महाराजांना भेटून तर ये. आमचेच आहेत ते. मी म्हटलं ठीक आहे. जशी खाविंदांची आज्ञा."

जबरदस्तखाँला एरव्हीही बडबड करायला हवं असे. मुद्याची गोष्ट वगळून तो आपण लालबागेला कसे आलो, केव्हा घरून निघालो, घोडयावरून येताना घोडा कसा व का अडखळला इथपासून ते हुजुरांच्या स्वयंपाकघरातून पुलावाचा काय सुरेख वास येत होत्या इथवर वर्णन करत असे; अन् ऐकणारा उत्कंठित व्हायचा की खरी नक्की गोष्ट काय ? पण रामचंद्रदेव आज कशाचबद्दल उत्सुक नव्हते. तो अशा विचित्र वेळेला आल्याबद्दलही त्यांनी कसलीच प्रतिक्रिया दाखवली नाही.

उपरोधपूर्ण स्वरात ते उत्तरले,

"हे बघ, मी आहे एक सामान्य कैदी. नायब–नाजिमांपैकी मी कसा असेन ? तू चुकीचं ऐकलं असशील."

अतिशय मऊ स्वरात जबरदस्तखाँ उत्तरला, "तोबा, तोबा – कुणाची हिंमत आहे हुजूर आपल्याला एक सामान्य कैदी म्हणायची ? खुदाच्या दुनियेत जसे वैभवाचे गौरवाचे दिवस आहेत तसे थोडेसे त्रासाचेही असतात. आज शाही तख्तावर बसणारा एखादेवेळी सुळावरही – काय समजलं ?"

मग थोडा आवाज खाली आणून म्हणाला,

"उत्कलच्या सुभ्याचे नायब–नाजिम तकीखाँ अन् मुर्शिदाबादचे शहेनशहा सुजाखाँ यांचे संबंधी बनणं म्हणजे काही अशी तशी गोष्ट नाही महाराज."

या कोड्याची उकल रामचंद्रदेवांच्यानं होईना. याहून अधिक फोड करणं जबरदस्तखाँला जमेना. थोडावेळ दोघेही चित्रासारखे उभे राहिले.

अचानक तो बाहेर गेला व एका बुरखाधारी तरुणीला हात धरून आत आणत मोठ्या मायेने म्हणाला, "ये बेटी ये."

बुरख्यातून तिचा फक्त हातच तेवढा दिसत होता. गोरीपान, अशोकमंजिरीसारखी तिची बोटं पाहून असा अंदाज वाटत होता की बुरख्यात अप्रतिम सौंदर्य दडलेलं असणार.

आपण जागे आहोत की स्वप्नात नेच रामचंद्रदेवांना कळेना.

जबरदस्तखाँने तिचा बुरखा दूर केला. ढगात लपलेल्या चंद्रासारखं तिचं मुख, सुरमे-वाले डोळे, त्यावरच्या दोन कमानदार भिवया – स्वप्न तर नव्हे ? गुलाबबागेत रोज संध्याकाळी येऊन रामचंद्रदेवांच्या नयनांत स्वप्नांचं इंद्रजाल पसरून जाणारी रहस्य-मयीच होती ती. पण इथं या कारागारात का आली ?

जबरदस्तखाँने तिचा बुरखा व्यवस्थित केला. गुलाबाच्या अत्तराने कैदखान्यातलं अवरुद्ध वातावरण रोमांचित झालं,

जबरदस्तखां म्हणाला, "हुजूर ही आपली मानसी. हिच्याशी निका लावायला हुजूर तयार असतील तर हां हां म्हणता खोर्धा व कटक संबंधी होतील. ही नायब नाजिम तकीखाँची बहीण अन् मुर्शिदाबादचे नवाब सुजाखाँची मुलगी आहे हुजूर."

हा विचित्र प्रस्ताव ऐकून रामचंद्रदेव अतिशय आश्चर्यचकित झाले.

निका पक्का झाला की मुलीच्या बाजूने विडे देतात. इथे मुलीच्या बाजूने फक्त जबरदस्तखाँच होता. खिशातून नागवेलीचं एक हिरवेगार पान काढून रामचंद्रदेवांच्या हातात देत तो म्हणाला,

"जरा विचार तर करा महाराज. नबाब सुजाखाँ आज बंगाल, बिहार व उत्कलचे सुभेदार आहेत. खोर्धा व कटक यातलं युद्ध म्हणजे आज एक क्षुल्लक बाब बनली आहे.

दोन्ही बाजूंना रक्तपात होत राहिला आहे. त्यात खरं म्हणजे खोर्ध्याचंच जास्त नुकसान झालं आहे. पण आज नायब – नाजिमांना मनापासून असं वाटत आहे की ही परिस्थिती आता समाप्त व्हावी. खोर्धा – कटक एक व्हावेत. उत्कलमध्ये शांती नांदावी, म्हणून तकीखाँ आपल्याला आपल्या बहिणीशी निका लावायची विनंती करताहेत."

रामचंद्रदेवांच्या हातून पान गळून पडलं. ही धमकी अगदी अपूर्व अशी होती. जबरदस्तखाँ जसा अकस्मात् आला तसा चालता झाला. जाता जाता इशारा द्यायला विसरला नाही, "महाराज, विचार करा हवं तर यावर. पण शहेनशहांनी पुढं केलेला हा दोस्तीचा हात जर धुडकावाल तर मात्र... "

तो गेल्यावर पाण्यावरच्या क्षीण तरंगाप्रमाणे किंचित् शहारून ती स्त्री तशीच उभी राहिली. मघाच्या मैत्रीपूर्ण प्रस्तावाला एक प्रच्छन्न धमकी अस्तरासारखी जोडली होती. तिच्यावर विचार करण्यात रामचंद्रदेव गुंगून गेले.

म्हणजे खोर्धा आता नायब–नाजिमाच्या दयेवर सर्वस्वी अवलंबून होता तर! इतर कुणाला न का कळेना पण रामचंद्रदेवांना ते छान कळलं होतं. तकीखाँशी सामना करणं पाइकांच्या सामर्थ्याबाहेरचं नाही हे तर खरंच; पण सध्या बाहेरचा शत्रू जितका बलवान होता त्यापेक्षा अंतःशत्रूच अधिक बलवान होते. खोर्ध्याचे स्वातंत्र्य आणि श्रीजगन्नाथ अभिन्न होते. अजूनही खोर्ध्याचा पराक्रम शिल्लक होता म्हणून तर नायब– नाजिमांनी जगन्नाथाला हात नव्हता लावला. पण खोर्धाच जाग्यावर राहिलं नाही तर श्रीमंदिर जमीनदोस्त करून पुरुषोत्तमक्षेत्राच्या जागी मशीद उभी करणं काय तकीखाँला अशक्य थोडंच होतं ? जगन्नाथ अक्षत रहावा म्हणून हजार पराजय, लांछन आणि कुयोग सहन करून भोइ वंशाचे राजे देशोधडीला लागले होते. आज तोच अशा तऱ्हेने तकीखाँच्याच जाळ्यात सापडला तर ?

त्या स्त्रीने हळूहळू आपला बुरखा दूर केला. कोमेजलेल्या कमळाच्या पाकळ्यांसारखे वेदनेने भरलेले तिचे डोळे जणू शब्दहीन भाषेत रामचंद्रदेवांना म्हणत होते. मी निष्पाप आहे. या कारस्थानात खरंच माझं अंग नाही. माझा विश्वास करा."

दवबिंदूसारख्या त्या निष्पाप व उज्ज्वल डोळ्यांनी कसे कुणास ठाऊक पहाता पहाता रामचंद्रदेव झपाटले गेले. त्यांना एकदम चिल्किातटाच्या त्या उजाड गावात त्यांना पाणी पाजणारी, आश्रय देणारी हतभगिनी सरदेई आठवली. तिचेही डोळे असेच वेदनेने भरलेले होते. रामचंद्रदेवांनी विचारलं, "कोण आहेस तू ?" अविचलित स्वरात ती म्हणाली, "माझं नाव जवा आहे. आई मला जवाच म्हणायची. पण...पण आता मात्र मला रजिया म्हणतात."

आश्चर्याने रामचंद्रदेव म्हणाले,

"पण तू नबाब सुजाखाँची मुलगी आणि नायब नाजिम तकीखाँची बहीण आहेस ना ?"

जवा हळूच म्हणाली, "माझी आई म्हणजे प्रख्यात खेमटावाली कंचनी मुर्शिदाबादी. ती नबाबांच्या जनानखान्यात कशी गेली ते मला ठाऊक नाही. त्या आईनं माझं नाव जवा ठेवलं होतं. ती मला म्हणायची मी हिंदूची मुलगी आहे....जवा आहे."

मनातली खरीखुरी गोष्ट सांगायला कैक वर्षांनी जिव्हाळ्याचं माणूस जवाला किंवा रजियाला म्हणा लाभलं होतं. तिला संकोच नव्हता ना कृत्रिम लज्जा. शिशिरातल्या दवबिंदूसारखे आपले निष्पाप डोळे रामचंद्रदेवाच्या चेहऱ्यावर खिळवून ती बोलत होती, "आई माझी इथंच मेली. तिची कबर इथे कटकेमध्येच आहे. तिच्या अंतकाळापर्यंत मीच तिच्याजवळ होते. तिची शेवटची इच्छा होती पुरुषोत्तम जगन्नाथाचं दर्शन करण्याची. जगन्नाथ जगन्नाथ करत तिनं प्राण सोडला.–"

एक उसासा सोडून तिने आपली नजर खाली वळवली. मग पुन्हा त्याच्याकडे पाहून तिने निष्कपटपणे विचारले,

"आपण जगन्नाथदेशाचे बादशहा आहात ना ? मी तर असंच ऐकलं आहे !"

बाहेर जबरदस्तखाँच्या पावलांची चाहूल आली. जवाने पुन्हा बुरखा घेतला. रामचंद्रदेव प्रत्यंचा चढवलेल्या धनुष्यासारखे ताणले गेले होते.

त्यानंतर एक दिवस जवा म्हणा की रजिया म्हणा– तिच्याबरोबर रामचंद्रदेवांचा निका लागला. काजीने कलमा पढवला न् त्यांना मियाबिबी बनवले. नंतर रामचंद्रदेव हाफिज कादर बेग बनले व रजिया खोर्धाची बेगम.

यामुळे उभ्या उत्कलमध्ये एकच खळबळ माजली. कारण महाराज रामचंद्रदेव मुसलमान होऊन एका यवनीशी विवाह करतील व जगन्नाथ–द्रोही बनतील अशी कुणी कल्पनाही केली नव्हती."

आता खोर्ध्याला परतायला तसा काहीच प्रत्यवाय नव्हता. पण हाफिज कादर बेग रजिया बेगमला घेऊन कसे काय खोर्ध्याला पाय लावणार याच विचारात रामचंद्रदेव पडले होते. तकीखाँचे भगिनीपती होऊन, आणखी एका बंधनात अडकून ते बारवाटी दुर्गात बंदी बनले होते. त्या दिवशी मुसलमानांचा 'शब– ए– रात' नावाचा उत्सव होता. रामचंद्रदेव आणि रजियाबीबीची तीच प्रथम मीलनरात्र देखील होती.

इस्लामी समाजाने तोवर हिंदु-संस्कृतीच्या घनिष्ट संपर्कात येऊन अनेक हिंदू रीतिरिवाज, सण आपलेसे केले होते. 'शब– ए– रात' त्यातलंच एक होतं. मुसल-

मानांच्या विश्वासाप्रमाणे शब– ए– रात लाच जन्नतमध्ये – स्वर्गात माणसाच्या भाग्य व भविष्याचा निर्णय होत असतो. श्रावणातल्या चतुर्दशीच्या रात्री हा सण साजरा करतात. हिंदूंच्या दीपावली अमावास्येसारखी ही इस्लामी महानिशा आहे. यांच्या निरंध्र अंधकारात जीव ब्रह्म लीन होऊन जातो. नियमानुसार सगळी रात्र जागरण करून कुराण– पाठ करायचा असतो. पण हळूहळू उत्सवाचे हे गंभीर रूप मागे पडले व दिवाळीसारखे दीपोत्सवाचे, अग्निक्रीडा व फटाक्यांच्या कोलाहलाने युक्त अशा उत्सवाचे स्वरूप त्याला आले.

बारवाटीदुर्ग विशेष कसोशीने सजवला गेला होता. कारण तकीखांची बहीण व सुजाखांची मुलगी रजियाबेगमच्या लग्नाचा उत्सवही त्या दिवशी होता. दुर्गाच्या मध्यभागी असलेली फत्तेखान मशीद तर दीपमालांनी लखलखत होती. दुरून त्याचा घुमट प्रकाशाच्या छत्रासारखा भासत होता दुर्गाच्या चारी बाजूला दिवे झळझळत होते व आकाशापर्यंत तेजाचे लोळ चालले होते. दुर्गाच्या तटावरचे दिवे स्वप्नलोकाचा भ्रम निर्माण करीत होते. दुर्गातली आतषबाजी पहायला बाहेर शहरच्या लोकांची गर्दी झाली होती खरी, पण सर्वत्र हाहा:कार उडाला होता –, सुजाखाँच्या अनौरस कन्येशी लग्न लावून जगन्नाथाचे सेवक–शिरोमणि खोर्ध्याचे महाराज शेवटी धर्मभ्रष्ट झाले...

रात्रीचा दुसरा प्रहर उलटला होता. दिवे हळूहळू डोळे मिटायला लागले होते. तरी पण जागोजागी काही दिवे, एका उत्सवाने भरलेल्या संध्येच्या अंतिम अवशेषांच्या रूपात जळत होते.

रजियाशी लग्न झाल्यावर रामचंद्रदेव म्हणा किंवा हाफिज कादर बेग म्हणा आठव्या खंडातून नवव्या खंडात रहायला गेले होते.

पहिल्या रात्रीसाठी त्यांचा महाल इराणी गालिचे, समरकंदचे रेशमी तक्ये, मुर्शिदाबादी पडदे, पुष्पपात्रे, धूपदाण्या, व चिरागदान यांनी सजवला होता. त्याच महालाच्या एका कोपऱ्यात अधोमुखी रजिया कुराण–शरीफचा पाठ करत बसली होती. रात्रीच्या सरत्या प्रहराचा शीतल वायू संगमरवरी खिडकीतून आत घुसत होता व त्यासंगे पडदे नाचत होते. रजियाने काळी काश्मिरी शाल लपेटली होती.

सेनाविभागाच्या खंडात शब– ए– रातचा उत्सव अजूनही चालला होता. रात्रीच्या त्या शांत वातावरणात तिथून धुंद स्वरातले गझलांचे स्वर ऐकू येत होते. खेमटा वाल्यांचे– म्हणजे कलावंतिणीचे घुंगुर अजूनही छुमछुमत होते. उत्तरेकडच्या बाजूच्या जाळीदार खिडकीतून रामचंद्रदेव महानदीकडे पहात चित्रासारखे स्तब्ध उभे होते. महानदीच्या वक्षावर कृष्णपक्षातला चंद्र अस्ताला चालला होता. तो ढगात लपत होता की नदीत आत्महत्या करत होता ? रामचंद्रदेवांना कोडं उलगडता उलगडेना.

मद्यही आपला अंमल बसवत होते. कंप पावणाऱ्या हातात शराबचा प्याला धरून त्याच दृश्याकडे एकटक पहात रामचंद्रदेव बहुधा हाच विचार करीत होते. एकाच घोटात त्यांनी तो प्याला रिकामा केला. त्यांच्या कापऱ्या हातातून सुटून तो प्याला खाली कोसळला आणि महालातल्या वातावरणाला तडा गेला.

आपल्या आसनावरून उठून रजिया हळूहळू त्यांच्याजवळ येऊन उभी राहिली. राजकारस्थानात बळी पडलेल्या त्या असहाय तरुणीकडे बघून रामचंद्रदेवांचे हृदय सहानुभूतीने भरून आले. त्यांनी तिचे मेंदीने रंगलेले हात आपल्या हातांत घेतले. महानदीच्या काळोख्या पात्रातला चंद्रमा जणू रजियाच्या डोळ्यांत नाचत होता.

त्यांच्या कानाशी तोंड नेऊन ती कुजबुजत्या स्वरात म्हणाली, " आज मुलीला काहीतरी भेट द्यायची पद्धत आहे. आपण काय देणार मला ?"

तिच्या डोळ्यांत बघत रामचंद्रदेव उत्तरले, " इहलोक परलोकात माझं म्हणून जे काही आहे ते सगळं आता तुझंच तर आहे जवा !"

खट्याळ दृष्टीने त्यांच्याकडे बघत तिनं म्हटलं, " माझी शप्पथ ?"

तिला मिठीत गोळा करत ते म्हणाले, " तुझी शपथ. त्रिवार खरं आहे मी म्हणालो ते. हं सांग आता, काय हवं तुला ?"

रजियानं थोडं स्वत:ला सोडवून घेतलं. कमरेपर्यंत नागफणीसारखं ताठ होत ती म्हणाली,

" मला जगन्नाथाचं दर्शन करवाल महाराज ? आई म्हणत होती एकदाच जगन्नाथाचं दर्शन केलं की माणसाचा आत्मा तृप्त होतो. रात्रीच्या अंधारात जसं सगळं विलीन होतं तसं तो आपलं समस्त प्राप्य-अप्राप्य, सगळं दु:ख, आनंद, हसू आणि आसू स्वत:त लीन करून टाकतो... ती बिचारी त्यांचं नाव घेत कबरीत गाडली गेली पण शेवटपर्यंत तिला दर्शन काही घडलं नाही."

रामचंद्रदेवांची मिठी सैल पडली.

चंद्रमा महानदीच्या अंधारभऱ्या पात्रात एव्हाना बुडाला होता. शब-ए-रातवर चारी बाजूंनी गर्द धुक्याचा पडदा पसरला होता.

पत्थरगडाच्या राजमहालात झोपी गेलेल्या रामचंद्रदेवांना त्या पहिल्या रात्रीचे स्वप्न पडत होते आणि एखाद्या कहाणीत तल्लीन व्हावे तसे ते रंगून गेले होते. खडावांच्या खट्खट् आवाजाने त्यांची झोपमोड झाली व ते पलंगावर उठून बसले.

खोर्धा राजवंशाचे कुल-पुरोहित गोदावरीवर्धन लक्ष्मी परमगुरू महापात्रांशिवाय

या घोर दुर्दिनांत अशा प्रकारे कठोर पदरवाने महालाचे नीरव गांभीर्य भंग करण्याचे असले धाडस दुसरा कुणी करू शकत नव्हता. फार काय तकीखाँचा वकीलही एका विशिष्ट अंतरावर येताच जोडे काढून ठेवत असे.

लक्ष्मी परमगुरूच्या खडावा ऐकताच रामचंद्रदेवांची मरगळ नाहीशी झाली. सखा, मित्र, स्वजनजनांनी सोडलेल्या रामचंद्रदेवांचा तेच एकमेव आधार होते. त्यांनाच रामचंद्रदेवाच्या धर्मांतरामागचे रहस्य समजले होते. जगन्नाथाच्या प्रतिष्ठारक्षणासाठी त्यांनी स्वतःला सर्वप्रकारे पतित करून घेतले आहे याची जाणीव परमगुरूंना होती. त्यांनीच तर रामचंद्रदेवांना तकीखाँच्या कैदेतून बारवाटी दुर्गातून सोडवून खोर्ध्याला आणलं होतं. नाहीतर अजूनपावेतो ते तिथंच खितपत पडले असते.

रामचंद्रदेव जेव्हा रजियाशी लग्नगाठ बांधून शाही पाहुणे बनून एक तऱ्हेच्या बंदिवासात दिवस कंठत होते तेव्हा खोर्ध्यात कुणीही त्यांचा विचार केला नाही. जेव्हा खोर्धा 'खास' होऊ घातलं होतं तेव्हाही सिंहासनप्राप्तीसाठी अनेक लटपटी, कारस्थानं चालली होती. त्यावेळी रामचंद्रदेवाला सोडवून आणणं तर दूरच राहिलं होतं; ते जिवंत आहेत की मेलेत याची माहिती करून घ्यायला देखील कुणी कटकला गेलं नव्हतं.

हाफिज कादर बेग बनून रामचंद्रदेव पिंजऱ्यातल्या पक्ष्याप्रमाणे बंदिवान बनले होते. खोर्ध्याचा रस्ता आता आपल्याला कायमचा वंचित झाल्याचं त्यांनी ओळखलं होतं.

दिवाण– ए– खासमध्ये त्या दिवशी तकीखाँचा दरबार भरला होता. सगळे अमीर, उमराव, काजी, वजीर, सेनापती, कोशाध्यक्ष इत्यादी राजकर्मचारी तकीखाँच्या सोन्याच्या जाजमाने झाकलेल्या संगमरवरी चबुतऱ्याखाली आपापल्या आसनांवर बसले होते. मोरचेले व वाळ्याचे पंखे सेवक ढाळत होते. मद्याच्या नशेत चूर असलेला तकीखाँ एका तक्क्याला टेकून बसला होता. एका कोपऱ्यात मामुली दरबाऱ्यासारखे रामचंद्रदेव बसले होते. तोंड लपवून.

प्रथम प्रथम अशा तऱ्हेने दरबारात बसणे त्यांना असह्य व्हायचे. नर–पशु तकीखाँची खुशामत करणे गजपती रामचंद्रदेवांना कसे सहन व्हावे ? पण काय करणार ? याच नराधमाच्या मेहेरबानीवर तर अजून खोर्धा टिकून होतं.

तकीखाँ तुर्क नव्हता. तो बाटगा होता. शिवाय सुजाखाँचा तो औरस संतान नव्हता हे सर्वांना ठाऊक होतं. त्याच्या अंगी अस्सल मोंगलांत आढळणारी रसिकता नव्हती. फक्त धर्मांधता होती.

तरीही आपली रसिकता दाखवण्यासाठी तकीखाँने कुणाची तरी टवाळी केली.

तकीखाँच्या तोंडून कुणी उपरोधिक बोलणं ऐकलं नव्हतं. ते ऐकून सगळयांनी मजल्या-वर मजले हसणं चढवलं; जणू जन्मात प्रथमच विनोद ऐकत होते.

हातात सत्ता असली की बुद्धिहीनता देखील ऐश्वर्य बनते. जे शरमेचं कारण तेच गर्वाचं स्थान बनतं. पाय चुरण्यालाही लोक पराक्रम मानायला लागतात...दरबाऱ्यांचा लाळघोटेपणा ज्यांनी प्रत्यक्ष पाहिलेला नाही त्यांना त्याची कल्पनाही करता येणं शक्य नाही.

इतरांच्या हसण्यात रामचंद्रदेव सामील झाले नाहीत. इतकेच नव्हे, आपल्या मनातील विरक्तीवर ताबा मिळवणं देखील त्यांना अशक्य वाटत होतं. दरबाऱ्यांच्या निर्बंध हास्यात स्वतःचा समावेश न करून रामचंद्रदेव पाषाणवत् बसून राहिले. ही तर बे-अदबी झाली. जवळ बसलेल्या जगतसेठ फतेचंदने हलक्या स्वरात म्हटले, "राजासाब हसा...हसा नं." दरबारी रीतिरिवाजावरचा एक फारशी शेरही त्यांनी रामचंद्रदेवाना ऐकवला :

"अगर शा रोज रा गोयेद शाब अस्तइन्
बेबायद् गुफ्त् इनक् मा वा परवीन् "

"राजाने दिवसाला रात्र म्हटलं तर काय उत्तर द्यायचं ठाऊक आहे ? म्हणायचं की तरीच चंद्र चांदण्या दिसताहेत."

अजून हसण्याचा कल्लोळ शमला नव्हता. तकीखाँच्या कानापर्यंत स्वतः ओरडलेलं 'करामात' ऐकवण्यासाठी दरबाऱ्यांमध्ये स्पर्धा लागली होती.

अशा परिस्थितीत लालबाग लक्ष्मी परमगुरूच्या खडावांनी गर्जून गेला, एक खोजा आला न् कुर्निसात करून म्हणाला की कुणी काफिर फकीर आलाय आणि शहेन्शहांची भेट मागतोय.

सर्वांनी विचारले, "कोण आहे भाई हा काफिर फकीर ?"

खोजा म्हणाला, "खोर्धा राजाचे मुल्ला आहेत म्हणतात."

तकीखाँने अनुमती दिली व लक्ष्मी परमगुरु खडावांचा आवाज करीत दिवाण-ए-खास मध्ये दाखल झाले.

पण लक्ष्मी परमगुरूनी तकीखाँला कुर्निसात नाही केला. त्यांचं बळकट शरीर झुकलं नाही की मान वाकली नाही. अशा उद्धट रीतीने भर दरबारात कुणी वागेल याची कल्पना दरबारीयांना नव्हती. गजपती खोर्धा महाराज पुरुषोत्तमदेव जेव्हा कांचीवर विजय मिळवून परतत होते तेव्हा कांची सेनेला रोखण्यासाठी ज्यांनी आपल्या तंत्र-बळाने अवेळी पाऊस पाडून गोदावरीला पूर आणला व गोदावरीवर्धन महापात्र अशी उपाधी मिळवली त्या लक्ष्मी परमगुरूचे मस्तक जगन्नाथाशिवाय इतर कुणासमोर झुकणं शक्यच नव्हतं.

आता या काफराला कोणती शिक्षा दिली जाते ती ऐकायला सगळे उत्सुक झाले होते. पण लक्ष्मी परमगुरूंचे ते टिळा लावलेले भव्य ललाट, दाढीमिशा असलेल्या मुखावर झळकणारे डोळे, प्रशस्त वक्षावर शोभित रुद्राक्षमाळ आणि उजव्या हातातला लांबलचक त्रिशूळ यांनी तकीखाँवर जणू मोहिनी घातली होती.

तकीखाँने नम्र स्वरात म्हटले, "बसावं."

लक्ष्मी परमगुरू म्हणाले, "म्लेंच्छांच्या सिंहासनाखाली साधकानं बसणं शास्त्रांत निषिद्ध आहे."

तकीखाँने मग त्यांच्या आगमनाचं कारण विचारलं आणि त्यांची इच्छा पूर्ण करण्याचं आश्वासन दिलं

तकीखाँच्या अर्धोन्मीलित दृष्टीला आपली अग्निदीप्त मोहमयी दृष्टी भिडवून कठोर स्वरात ते म्हणाले, "खोर्ध्याचं सिंहासन रिकामं पडलंय. मी रामचंद्रदेवाला न्यायला आलोय."

संमोहित झाल्यासारखा, तकीखाँ उत्तरला, "मंजूर आहे मला !"

त्यानंतर वाट चुकलेल्या अबोध मुलाला जसं हात धरून घरच्या रस्त्याला आणून सोडावं तसं लक्ष्मी परमगुरू त्यादिवशी रामचंद्रदेवाना मुक्त करून घेऊन आले होते. अवाक् होऊन तकीखाँ बघत राहिला होता. दरबारचे लोक आश्चर्यचकित होऊन एकमेकांकडे बघत राहिले.

आता लक्ष्मी परमगुरू हेच एकटे रामचंद्रदेवांचे हितचिंतक आणि सल्लागार उरले होते.

लक्ष्मी परमगुरू महालात आल्याबरोबर रामचंद्रदेव पलंगावरून उठले आणि परमगुरूंना त्यांनी वाकून प्रणाम केला. लक्ष्मी परमगुरूंनी अभयमुद्रा दर्शविणारा हात करून आशीर्वाद दिला.

व्याकुळ स्वरात रामचंद्रदेव म्हणाले, "तुम्हाला कळलंय का मुक्तिमंडपाने निर्णय दिलाय की रत्नवेदीच्या जवळून मी जगन्नाथाचे दर्शन करायला अपात्र आहे."

हसून परमगुरू म्हणाले, "हो. त्याचीही व्यवस्था केलीय मी. जगन्नाथ काही तुम्हाला टाकून देत नाही आहेत. हृदय जोवर जाळून पोळून स्मशान होत नाही तोवर महाभैरवाचा पदन्यास तिथं व्हायचा कसा? त्याचा हात जो कोणी धरतो तोच पार बुडतो."

दीन स्वरात रामचंद्रदेव बोलले, "म्हणजे मी देखील बुडणार काय?"

परमगुरूंच्या ओठावर रहस्यमय हसू झळकले. म्हणाले, "अजून बुडायचे शिल्लक आहात असं वाटतं का?"

# चार

## 1

सिंहल–ब्रह्मपूरचं दधिवामन मंदिर फोडलं जात होतं. त्याच्या मेघनाद तटाचा पश्चिमेकडील भाग पार जमीनदोस्त झाला होता.

इकडे तिकडे पुष्कळ पत्थर पडले होते. त्यावर कोरलेल्या आकृतींमुळे एक उध्वस्त सृष्टी आपोआप निर्माण झाली होती. बाहेरची भिंत पडली होती व आता गर्भगृहाच्या पाडापाडीचे महान् कार्य सुरू झाले होते.

गाजी सुलतानबेग एका तट्टावर स्वार होऊन या शुभकार्यावर देखरेख करत होता. शंभरावर मजूर त्यानं गोळा केले होते आणि ते सगळे देवळावर प्रहार करता करता थकून गेले होते. हे मंदिर एवढं मजबूत असेल अशी गाजीमियाँला कल्पना नव्हती नाहीतर पिपिलीच्या फौजदाराकडून त्याने तोफच आणली असती. पण त्याने विचार केला की एकसाथ शंभर हातांचे घाव बसले की कितीही मजबूत मंदिर असलं तरी कोसळायला असा किती वेळ लागतो ? पण अजून मंदिर शिल्लक होतं. फोडणाऱ्यांचे हात थकले की गाजीमियाँ वेड्यासारखा ओरडून म्हणायचा, " अल्लाह हो अकबर ".

त्यासरशी मंदिर फोडणाऱ्यांच्या हातात बळ येई. त्यांचे घण दुप्पट जोरात पडायला लागत. त्या भयंकर आवाजाने सिंहल–ब्रह्मपूरचे आसमंत, बांबूचे जंगल दणाणून गेलं होतं. एका सुरक्षित अंतरावरून असंख्य लोक हे विध्वंस–कार्य बघत होते. असहाय्य व भयभीत दृष्टीने बघत होते ! मंदिराचा एखादा परिचित भाग वा बाह्य तटावरील एखादी मूर्ती फोडली जात असताना एकमेकांना दाखवत होते. मंदिरावर होणारा घणाचा प्रत्येक घाव स्वतःच्या हृदयावर होत असल्याप्रमाणे त्यांना वाटत होते. ते दुःखाने कळवळायचे. डोळे पाण्याने भरायचे. पण विरोध करायचे साहस त्यांपैकी एकातही नव्हते. त्यांनी नुसतं बोट उचललं असतं तर गाजीमियाँला आपल्या कामकऱ्यांसहित तिथून पळ काढावा लागला असता. पण एक तऱ्हेच्या भयाने ते गावकरी पांगळून गेले होते.

दलतला डोंगराच्या पायथ्याशी वसलेले सिंहल – ब्रह्मपुरा त्याच्या गढनायकाच्या चबुतऱ्यामुळे व दधिवामन मंदिरामुळे सगळ्या खोर्धा राज्यात प्रसिद्ध होते. रामचंद्र-

देवाने भोई राजवंशातला पहिला राजा मुकुंददेवाच्या नावाने हा चबुतरा व मंदिर बांधले होते. याच्या पाठीमागे उत्कल इतिहासाच्या आठवणीतली एक कटु स्मृती होती जगन्नाथासाठी कुणा पराक्रमी महाराजा वा प्रतापी सेनापतीने नव्हे तर एका सामान्य माणसाने जे कष्ट सोसले होते त्याची आठवण होती ती. म्हणे कोणी एक बिशर महांति नावाचा साधासुधा शेतकरा होता. काळापहाडने जगन्नाथाची विटंबना आरंभली होती. त्यापासून जगन्नाथाचे रक्षण करण्यासाठी बिशर महांतीने जे कष्ट सहन केले ती सर्व कहाणी मंदिराच्या काजळी माखलेल्या भिंतींवर अदृश्य शिलालेखासारखी चित्रित झालेली होती. गौड देशातून जगन्नाथाला घेऊन बिशर महांति परत आले. त्यानंतर नवकलेवरांची वेळ आली. म्हणजे जगन्नाथ, बळिभद्र व सुभद्रेच्या नव्या मूर्ती घडवून त्यांची स्थापना जुन्याच्या जागी करायची. त्यासाठी विशिष्ट लक्षणांनी युक्त असे निंबाचे झाड हवे असते. खूप शोधाशोध केल्यावर तेथेच तसा लक्षणसंपन्न निंब मिळाला होता. त्या घटनेची स्मृती म्हणून हे दधिवामन मंदिर बांधले गेले होते. त्याचीच फोड-तोड आता गाजीमियाँ धर्मांध होऊन करत होता.

जवळच्याच एका गावात गाजीमियाँ मशीद बांधत होता. या मंदिराचे दगड वापरून तिचा पाया घातला जाणार होता. सुलतानबेग गाजीमियाँ मोठा पराक्रमी होता. त्याशिवाय हरवलेल्या वस्तूंचा चोरांचा मंत्राच्या योगाने शोध लावणे, असाध्य रोगांवर इलाज करणं असल्या अनेक सिद्धीही त्याला वश होत्या. या भागात मशीद बांधण्यासाठी त्याला नायब नाजिम तकीखाँचा हुकूम मिळाला होता आणि अल्ला-तालाचा आदेश झाला होता. आता तर काय, खोर्धाचे महाराजदेखील हाफिज कादरबेग झाले होते. आता गाजीमियाँला कोण अडवणार ? बघणारे सुस्काराही टाकू शकत नव्हते.

१४८८ तली ही घटना आहे. तैलंग मुकुंद हरिचंदनच्या राजवटीतलं दहावं वर्ष होतं ते.

काळपहाडचे आक्रमण आणि बिशर महांतीचे धैर्य यांची आता लोककथेत गणना होते. पण त्यावेळी उत्कलमध्ये याच कथेने प्रलय माजवला होता. त्याही वेळी उत्कलच्या शापित इतिहासात विश्वासघात आणि मागून वार करण्याच्या प्रवृत्तीचा विजय झाला होता. त्या दिवशीची संकटपरंपरा उत्कलवर कोसळण्याचे कारण राजुखाँ काळपहाडचे शौर्य नसून सारंगगडच्या किल्लेदाराने – रामचंद्रदेव भंजने केलेला नीच विश्वासघात हेच होते. शेवटचे गजपती मुकुंददेव लढता लढता धारातीर्थी पडले असते तर एवढं दु:ख झालं नसतं जेवढं रामचंद्रदेवाने मागून केलेल्या छुप्या वारामुळे त्यांना आलेल्या मृत्यूने झालं होतं.

कटकेवर अंमल बसवून आता काळापहाडने आपलं सगळं लक्ष श्रीक्षेत्र पुरीवर केंद्रित केलं होतं. आता श्रीमंदिरावरचा हल्ला आणि जगन्नाथाची विटंबना अटळ आहे हे जाणून मुख्य उपाध्याय दिव्यसिंहाने आधीच तिघांही देवमूर्तींना कांची नदीच्या मार्गाने चिलिका खाडीच्या तोंडावर असलेल्या छपाली हाथीपडा गावात अज्ञातवासात ठेवलं होतं. पण ती खबर दानपहांतासिंहाने काळापहाडला दिली. त्याने तिन्ही देव-मूर्तींना लपवलेल्या जागेतून काढून हत्तीवर लादून गौडेच्या रस्त्यावर आणले आणि हिंदूंच्या त्या पूज्य देवमूर्तींना एखाद्या साध्या लाकडी ओंडक्याप्रमाणे जाळण्याचा त्याचा बेत होता.

त्याकाळी उत्कलमध्ये स्वतंत्र राजसत्ता नव्हती व जनसत्ता योग्य नेतृत्वाभावी पांगळी बनली होती. काळपहाडला विरोध करून जगन्नाथाला वाचवण्यासाठी पुढे येईल असा एकही पराक्रमी पुरुष नव्हता. उत्कलच्या घराघरात एकच हाहा:कार उडाला होता. राजुखाँ काळापहाड चामड्याच्या वादीने जगन्नाथाला बांधून बडदांडच्या रस्त्यावर घेऊन गेला. पण काय उपाय ? विधवेचं रडणं अन् उभ्या उत्कलचं निर्वीर्य दु:ख – एकच झालं होतं.

त्यावेळी एक गरीब, हाडकुळ्या शरीराच्या सुरकुतलेल्या चेहऱ्याचा बिशर महांति गौड सडकेवर भिक्षूच्या वेशात मोगल सेनेच्या मागे मागे चालला होता. त्यांच्या अंगात एक लांबलचक भगवा अंगरखा होता. गळ्यात मृदंग लटकत होता. रामनामाची छापील शाल त्याने डोक्याला रूमालासारखी बांधली होती. मोठ्या प्रसन्न मनाने भजन गात अन् मृदंगावर ताल धरत तो चालला होता.

**" बघा शून्य देही झाले शून्य रे**
**शून्य मंदिर ते निद्रित पडले रे**
**शून्यत्वी लागली लीला रे...**
**मन......बघ रे ! "**

पठाण सैनिकांनी बिशर महांतीच्या या अवताराकडे लक्षच दिलं नाही. असेल कुणी वैष्णव म्हणून सोडून दिलं. पण जे त्याला ओळखत होते ते एक दुसऱ्याला विचारत होते की याला वेड लागलं की काय ?

जेव्हा तो गात नसे तेव्हा लोकांनी ऐकावं या उद्देशाने मोठ्याने बडबडत असे.

" अरे, ही देखील त्या शून्य पुरुषाची इच्छा आहे बरं. त्याच्या इच्छेशिवाय कुठं काय होतं सांगा बरं. त्याच्याच इच्छेने त्याने स्वत:ला चामड्याच्या वादीने बांधवून घेतलंय, फरफट काढलीय. आता असेल त्याच्या मनात तर तो परत येईलच. त्याचा महिमा अगाध आहे बाबा, अपरंपार आहे. आपल्याला त्याची लीला काय कळणार ?"

आणि पुन्हा मृदंगावर वेड्यासारखी थाप मारून गायला लागे,

"शून्यमथच्या घरी उडाली गडबड रे
अनाहत ध्वनि नाद रे
मन ऐक रे ! "

त्याची ही बडबड ऐकून आणि मृदंग वाजवणं ऐकून तशा दु:खातही लोकांना हसू आवरत नसे आणि ते आपापसात म्हणत, "खरंच, याला वेड लागलं बरं का."

पण त्यानंतर लगेच बघणाऱ्याची दृष्टी जगन्नाथावर खिळून रहायची. त्याला चामड्याच्या वादीने बांधून हत्तीवर लादलं होतं आणि गौड रस्त्यावरून त्याचं शेवटचं जाणं चाललं होतं. उत्कलच्या इष्टदेवाची ही विटंबना बघून लोकांना मोंगल सत्तेचा दरारा जाणवावा असा हेतू यामागे होता.

रस्त्याच्या दोन्ही बाजूला लोकांच्या झुंडी उभ्या होत्या. असहाय, मूढ. प्रतिकाराची भाषा तर सोडाच, एकदा दु:खोद्गारही ऐकू येत नव्हता. लोकांच्या तोंडातले शब्दच कुणीतरी हिरावून घेतले होते. त्यांच्या मनातल्या अतिशय कोमल तंतूवर कुणी घणाचे घाव घालत होता जसे. रस्त्यावरच्या वळणावर हत्ती वळला की लोकं माना उंचावून, नजरा ताणून जगन्नाथाला डोळ्यांत साठवून घेत होते. शेवटचं दर्शन हे......

पण बिशर महांति सगळ्यांना सांगत चालला होता, "लक्षात आहे ना, कृष्णालाही असंच अक्रूर मथुरेच्या रस्त्यावरून फरफटत घेऊन गेला होता. प्रभु रामचंद्रही वन-वासी झाले होते."

गौडला पोचल्यावर गंगातटी जगन्नाथाच्या अग्निप्रवेशाची जय्यत तयारी करण्यात आली होती. पण हे जगन्नाथ नावाचं लाकूडच विचित्र. या एवढ्या [illegible] ताड उंच ज्वाळा उठल्या पण जगन्नाथ काही जळेना. माणसाने – नव्हे नव्हे राजुखाँने तरी किती वाट पहायची ? चिडून शेवटी त्याने अर्ध्या जळक्या जगन्नाथाला गंगेत ढकलून दिले.

बिशर महांति याच क्षणाची वाट पहात टपून बसला होता. त्याने गंगेतून जगन्नाथाला बाहेर काढलं व त्यातून जगन्नाथाचे ब्रह्मतत्त्व काढून घेऊन मृदंगात लपवलं. आता त्या लाकडी बाहुल्यात जगन्नाथ राहिले नव्हते. निष्प्राण कलेवर होतं ते.

यानंतर मात्र गेल्या रस्त्यानेच परतायचं साहस बिशर महांतीने केलं नाही. महा-ब्रह्म–तत्त्व हस्तगत करून ते चालले आहेत ही खबर मोंगल सैनिकांना लागली असती तर त्यांनी नक्कीच पाठलाग केला असता. म्हणून आपली ती अनुपम संपत्ती मृदंगात लपवून महांति एका होडीवर चढले आणि कित्येक दिवसांनंतर कुजंगला येऊन पोचले.

व हळूहळू खोर्ध्याच्या दिशेने चालू लागले. उत्कलमधल्या बंडाळीला व कैक सालांच्या अशांततेला कंटाळून प्रजेने भोइ वंशातल्या रामचंद्रदेवाला उत्कलप्रमुख निवडले होते व त्याला खोर्ध्याच्या सिंहासनावर बसवले होते. मानसिंहानेही खोर्ध्याच्या स्वातंत्र्याला मान्यता दिली होती. उत्कलमध्ये शांतता प्रस्थापित झाली होती.

रामचंद्रदेव राजसेवक आहेतच पण ज्यांची सेवा करायची ते सिंहासनाधीश्वर महाप्रभू जगन्नाथ कुठे आहेत ? त्यांचं रत्नखचित सिंहासन रिकामं आहे. उत्कलच्या राजाचं नाही. सगळीकडे एकच विलाप ऐकू येत होता, " जगन्नाथ...जगन्नाथ " !

त्याचवेळी बिशर महांति लपत छपत खोर्ध्याला पोचला होता. प्रभू स्वत:च्या इच्छेने परत आले हे ऐकून घराघरात उत्सव सुरू झाला. पण एवढी मोठी कामगिरी करूनही बिशर महांतीला गर्व कसा तो नव्हता, ना त्याला कोणत्याही प्रकारच्या पारितोषिकाची इच्छा ! त्याचं म्हणणं की भगवान् आले ते केवळ त्यांची इच्छा होती म्हणून. म्हणून तर ते यात्रेकरूंबरोबर होडग्यात बसले. रस्त्यात अनेक घरांत मुक्काम करावे लागले. तेव्हा त्यांना मृदंगासहित खुंटीला टांगवून घ्यावे लागले. बिशर महांति केवळ निमित्तमात्र आहे. त्याला जर पारितोषिक द्यायचे तर मृदंगाची खोळ, खुंटया, होडी यांना का नको ? आता नवकलेवर करायचे, सर्वलक्षणसंपन्न निंब धुंडायला हवा. अवघा उत्कल उत्साहाने फुलून गेला. पण पुष्कळ धुंडूनदेखील शास्त्रोक्त लक्षणांनी संपन्न निंब मिळेना. शेवटी, जेथे आताचे दधिवामन मंदिर उभे आहे तेथे सगळयात अगोदर जगन्नाथाला योग्य अशा किंचित् कृष्णवर्णी निंबाचा आढळ झाला. अगदी आत, जेथे कसलीच वहिवाट नव्हती तेथे पाच फांद्यांचा भला मोठा निंब होता व त्यावर शंख चक्रही होते. दररोज सकाळी त्याच्या ढोलीतून एक भुजंग निघायचा व फणा काढून डोलायचा. इथेच तर जगन्नाथासाठी लाकूड मिळाले होते. रामचंद्रदेवाने तिथे मग ब्रह्मपुर गाव वसवला व तिथला प्रमुख म्हणून बिशर महांतीची नेमणूक करून टाकली. दधिवामन मंदिराची देखरेखही त्यांच्याचकडे सोपवली. त्याच्या योगक्षेमासाठी तीनशेसाठ बिघे जमीनही दिली.

तेव्हापासून आजवर बिशर महांतीपासून कुंज गडनायकापर्यंतच्या पाच पिढयांनी या मंदिराची देखभाल केली. पाच पिढ्या लोकांनी इथे नवस बोलून ते फेडले. पण तो काळ आता गेला. मोंगल नायब–नाजिमाच्या वेळेपासून छोटया छोटया गावांना भारी उपद्रव पोचायला लागलाय. ओडिसाच्या पाइकांना खच्ची करण्याचा सतत प्रयत्न चाललाय. अशा गावांना घेरून त्यांच्या आवतीभोवती मुद्दाम मुसलमानांच्या वस्त्या वसवल्या जाऊ लागल्या. पठाणांना शेतीची जमीन, घरं देण्यात येऊ लागलं. त्यासाठी, साहजिकच मंदिरातली करविरहित जमीन उपयोगात आणली जाऊ लागली. अशात

तऱ्हेने सरधापूर, मुकुंदपूर, दिव्यसिंहपूर, बोलगड, काइपदर, रथीपुर, बलरामगड वगैरेच्या जवळपास व सिंहलब्रह्मपुरच्या आसपास मुसलमानांची गावंच्या गावं निर्माण झाली. मंदिराला दिलेल्या तीनशेसाठ बिघ्यांपैकी बरीचशी जमीन तर हातसांड झालीच होती. आता पन्नासेक बिघे असेल नसेल. त्यात द्वादश पर्व व इतर सणवार साजरे करणं कठिण होऊन बसलं होतं. तरीही संचालक स्वत: अर्धपोटी राहून कसंबसं भागवत होते.

दधिवामन मंदिर हेमाडपंती होतं. उत्कलमध्ये त्याला 'पीढ–रीति'ची बांधावळ म्हणतात. सूर्यवंशी राजांच्या कारकीर्दीतली मंदिरं बहुधा याच तऱ्हेची आढळतात. कोणार्कचं मंदिर निर्माण झाल्यानंतर राजे व शिल्पकार यांची सगळी हौस फिटली होती. शिवाय सूर्यवंशी राजांच्या कारकीर्दीत नवीन मंदिरं बांधण्यापेक्षा जुन्यांना म्लेच्छांपासून बचावण्यासाठी जास्त जागरूक रहावं लागे. पुन्हा दधिवामन मंदिरासारखी जी मंदिरं आडबाजूला बांधली गेली होती तिथं साधीसुधी कलाच ठीक होती. या मंदिराच्या तटावर, भिंतीवर, सभामंडपात कुठेही कलाकुसर नव्हती. खांब तीसेक फूट उंच होते; व त्यांवर मधून मधून पानं, फुलं, नृत्यांगना कोरण्याचा प्रयत्न केलेला दिसत होता. काही ठिकाणी हत्ती, घोडे, बैल, माकड आणि आळोखेपिळोखे देणाऱ्या कन्या दिसत होत्या. कळसापर्यंत कमळ, वेल, कुयऱ्या काढल्या होत्या. तसं पाहिलं तर शिल्पकलेच्या किंवा स्थापत्यकलेच्या दृष्टीने हे मंदिर नगण्य होते. गर्भागाराला लागून 'जगमोहन' सभामंडप बनला होता. कुंज गडनायकाच्या पणजोबाने नाट–मंडप बांधण्याचा विचार केला होता पण ते काम तसंच अर्धवट पडलं होतं. त्याचा पाया जगमोहनचा उंबरा म्हणा किंवा अडथळा म्हणा झाला होता. चारी बाजूला असलेल्या दुर्गा, गणपति, कार्तिकेय, वराह वगैरे मूर्ती शेंदराच्या कवचाखाली झाकल्या गेल्या होत्या. यांची कलाकुसर मात्र अप्रतिम होती व म्हणूनच या कुठूनतरी दुसऱ्या ठिकाणाहून आणल्या असाव्यात हे सहज कळून येत असे. मंदिराच्या उत्तरेला बाग होती व अजून आहे. गावचे लोक त्या बागेलाच जगन्नाथवल्लभ म्हणतात. रोज कुंज गडनायक या बागेतल्या फुलांच्या माळा करून पूजेच्या वेळी देत असे. दक्षिणेला एक पुष्करिणी होती व जवळच कोठी, स्वयंपाकघर इत्यादि जीर्णावस्थेत होते. दैव फिरलं होतं, आणि सगळा परिसर दारिद्र्याने ग्रस्त, जराजीर्ण झाला होता. इकडे कुंज गडनायकही काळाच्या आघाताने दुर्बल झाला होता, वाकला होता. त्याचप्रमाणे मंदिरही गुल्माच्छादित व शैवालाच्छन्न झाले होते. तरी लोकांची श्रद्धा अभंग होती. विश्वास व भक्तीच्या महामेरूसारखं ते मंदिर अचल उभं होतं.

ओटयाची – किंवा चबुतऱ्याची अवस्थाही वेगळी नव्हती. हत्तीसमान उंच भिंत प्रत्येक ठिकाणी खचली होती. सात खणी बांधकाम आबाळीने पडझड झालेले दिसत

होते. तलावाचा आड झाला होता; आणि बागेचं जंगल. रथासाठी दोन हत्ती असत. त्यांच्यासाठी जागाही होती. पण ती म्हणजे आता काप गेले न् भोकं उरली पैकीच होती. कारण सध्या गडनायकालाच खाण्याची भ्रांत होती तिथं हत्ती कसले पोसतोय? पण तरी दोन अस्थिपंजर हत्ती होते तिथं. सणापर्वादिवशी त्यांना जरीदार झुली वगैरे चढवून सजवले जात असे. रथासाठी. पण रथ रस्त्यात कुठे अडकत नसल्यामुळे हत्तींना फारसं ओढण्याचं काम पडत नसे.

कुंज गडनायक निपुत्रिक होते. एक कन्या मात्र होती दुर्गेश्वरी नावाची. यमुना झाडपडा वैरीशलपच्या घरी तिचं मासर होतं. लग्न मोठ्या थाटामाटाने झालं होतं. पण वर्षभरातच तिचं कपाळ फुटलं आणि ती माघारी आली. एकुलत्या एक कन्येचं फटफटीत कपाळ पाहून व तिचा आक्रोश ऐकून गडनायक तीन दिवस तीन रात्र न खाता न पिता दधिवामन मंदिरात पडून जगन्नाथाला म्हणत होते, "अखेरीस विशर महांतीचा वंशक्षय केलास तू." त्यात ना प्रार्थना होती ना काकुळती. फक्त बोल लावला होता. ते म्हणत होते,

"असं कसं केलंस रे तू? शेवटच्या घटकेला गंगोदक तोंडात घालायला कुणी ठेवलं नाहीस. काय केलंस हे?"

शेवटी तिसऱ्या रात्री स्वत: जगन्नाथ स्वप्नात आले व म्हणाले,

"माझ्या भक्ताला अनेक आपत्तींतून जावं लागतं, माहीत नाही का? तुझ्यावरच्या संकटांचा तर कळस झालाय. आता कसली चिंता करतोस? जा. घरी परत जा."

सगळा शोक गिळून गडनायक परत आले पण शोकाबरोबर त्यांनी शब्दही गिळले होते. ते मुके बनले होते. आणि बहिरेही झाले होते. त्यांची पत्नी केव्हाच कुंकू लुटत स्वर्गी गेली होती. आता मंदिरात झाडू मारणं व दधिवामनासाठी फुलमाळा बांधणं एवढंच काम त्यांना उरलं होतं. त्यांचे डोळे लहान मुलासारखे निर्व्याज झाले होते. त्यांचा चेहरा वार्धक्याच्या रेषांनी भरलेला असूनही बालासारखा होता. त्यांना कसली काळजी नव्हती ना त्रास होता.

सगळ्या गावाला मंदिरावर होणारे घणाघात ऐकू जात होते. पण गडनायक निर्विकार होते. त्यांच्या चेहऱ्यावर विषादाचे एवढेही चिह्न नव्हते. त्यांचं आवडतं मंदिर चक्काचूर होत होतं आणि त्यांना त्याचा पत्ताच नव्हता. बधिरतेच्या शांत महासागरात अचल खडकासमान राहून ते नित्याप्रमाणे महाप्रभूसाठी दवण्याची माळ गुंफत होते.

## 2

सूर्य पश्चिमेला कलला होता. मंदिर फोडणारे आता थकून गेले होते. आग्नेयेकडे पडलेले खिंडार सापासारखे वाकडे तिकडे पसरलेले होते व त्यातून दोन चार दगड इकडे पडलेले होते. तोडफोड सुरू झाल्यावर मंदिरातली व आवारातली कबुतरं घाबरून दूर उडाली होती. ती पुन्हा परत येऊन बसू लागली होती. बहुधा त्यांना विश्वास वाटत होता की हातोड्यांनी हे भक्तीचं मंदिर उध्वस्त नाही व्हायचं. कबुतरांचं गुटर्रगूं जणू कामकऱ्यांचा उपहास करत होतं. पुष्करणीवरचे दोन खंड्ये त्या पाण्याला जाग आणायचा निष्फळ प्रयत्न करीत त्यावर घिरट्या घालत होते. तट फुटेना तेव्हा कामकऱ्यांनी देवतांच्या मूर्ती भंगायला आरंभ केला. अष्टभुजेचे चार हात भंगले. गणपतीची सोंड तुटली आणि लंबोदरला बऱ्याच ठिकाणी खरचटलं. वराहाचा उचललेला पाय तुटला.

ही सायंपूजेची वेळ. मंदिर फोडायला लोक आले होते तरीही सिंहद्वार लावून सकाळची पूजा कशी तरी उरकून घेतली होती. पण आता संध्याकाळी मंदिरात प्रवेश करण्याचे साहस कुणाच्याच अंगी नव्हतं. ते देखील बघ्यांबरोबर किंकर्तव्यविमूढ होऊन उभे राहिले आणि मंदिर फोडलं जाण्याचं निष्ठुर दृश्य शून्य दृष्टीने बघत राहिले.

गाजी सुलतानबेग तट्टावर बसून आरडाओरड करत होता, "हुं: ! जोरानं' शाब्बास, आणखी जोरानं. अल्ला हो अकबर."

त्याच्या या भयंकर अवताराकडे लोक भयभीत मुद्रेने पहात होते. गाजीमियाँच्या अंगात एक काळा झगा पायघोळ होता. गळ्यातल्या काळ्या निळ्या लाल मण्यांच्या माळा सायंकाळच्या प्रकाशात चकाकत होत्या. डोक्यावरचे केस सर्पांच्या जुडीसारखे दिसत होते. साक्षात् यम दिसत होता तो. त्याच्या कमरेला तलवार लटकत होती.

त्याचा आरडाओरडा ऐकला की थकले भागले लोक पुन्हा प्रहारांचा वेग वाढवत. दिवसभर घण चालवून मंदिर जस्से न् तस्से बघून गाजीमियाँचा तिळपापड होत होता. शिखरावर चढून कळसापासून सुरुवात करायची आज्ञा त्याने दिली. जहांबाजपुरचा फकीरामियाँ मंदिराच्या कंगोऱ्यावर पाय देत कशीबशी वर चढण्याची खटपट करू लागला. त्याचे बघून आणखी एक दोघे जण प्रयत्न करू लागले. पण भिंतीवरच्या शेवाळावर त्यांचे पाय निसटू लागले आणि त्यांना चढता येईना.

एवढ्यात फकीरा तर कसाबसा वर चढलाच; आणि गाजीमियाँ त्याला आनंदाने शाबासकी देऊ लागला.

फकीरामियाँ मंदिराच्या कळसावर दृष्टी लावून होता. आता शिखराची गरूड दांडी

...मग कळस ...असीम, अनंत, निराकारच्या चरणकमली अनेक हृदयातून निघणाऱ्या व्याकुळ प्रार्थनेवत् ते एका सुकुमार सरलतेने वर उचललेले होते. कळसावर सुदर्शन चक्रांकित नीलध्वज फडकत होता. जणू उत्कलचा अपराजित आत्माच. थोड्याच वेळात कळस ध्वज खाली पडणार, नष्ट होणार ही कल्पनाच जमलेल्या लोकांची अंत:करणे विदीर्ण करत होती

कळस तोडला की मंदिराचं फोड-काम सोपं जाईल हे लक्षात आल्यानं प्रत्येक जण आता तिथेच लक्ष केंद्रित करत होता. पावलांचे आवाज ऐकून कबुतरं पुन्हा उडायला लागली होती. पण सांजवेळी ती घरट्यात येणार नाही तर कुठे जाणार ? घिरट्या घालून दमूनभागून पुन्हा ती आपल्या घरट्याकडे झेपावत होती.

माकडासारखा कंगोऱ्यावर जिथे तिथे पाय देत फकीरा जेव्हा चढत होता तेव्हा प्रेक्षकांना वाटले आता कळस फुटल्यातच जमा आहे अन् मग मंदिर कोसळायला कितीसा उशीर ? श्वास रोखून सगळेजण पहात होते. गाजीमियाँही 'अल्ला हो अकबर' ओरडायला विसरला होता.

खरं म्हणजे फकीरामियाँ व त्याच्याबरोबरचे मंदिर-फोडे कामगार असं कृत्य आणि तेही धर्माच्या नावाखाली करतील अशी गावकऱ्यांना कल्पना नव्हती. इथलेच रहिवासी तर होते ते. बऱ्याचशा हिंदूंच्या समजुती, श्रद्धा अजूनही ते मनात जपत होते. त्यांच्या पोशाखात थोडाफार फरक असेल तरी मनात फारसा भेदभाव नव्हता. जगन्नाथाचा विनाश करण्यासाठी हातोडे व कुदळी घेऊन जरी ते किड्यामुंग्यासारखे तिथे जमले होते तरी त्यांच्यातले बहुतेक जण अल्लामियाँबरोबरच जगन्नाथाला भजत होते. मुसलमान असूनही सालबेगला प्रत्येक घरात आदराने वंदन करत होते. या सिंहल-ब्रह्मपुर गावातसुद्धा 'आहे नीलशइल प्रबल मत्त वारण...' गात होते. हरिदास यवन होता. पण त्याची भजनेही सर्वत्र गायली जात होती.

अच्युतानंद गुंसाईने 'शून्य – संहिते' यध्ये लिहिलेले पद 'तुर्की भजे अलफ् हिंदू भजे अलख्' काही केवळ पोथीतच नव्हतं. अवघ्या उत्कलभर गायले जात होते. उत्कल सहिष्णु भूमी होती. मुसलमानांचा अल्ला जसा निराकार आहे तसाच जगन्नाथदेखील अलख निरंजन आहे. ही सर्व अलखची लीला आहे. जगन्नाथ-अल्ला एक आहे. अशा तऱ्हेच्या समन्वय भावनेने धर्मांधतेच्या वर उठून हिंदू मुसलमानांना एक केलं होतं. ओडिसात कधीही मतांधता, धर्मांधता आणि असहिष्णुता नव्हती.

नायब नाजिमची राजधानी, कटकमधून किंवा दुसऱ्या शहरातून धर्माच्या नावाखाली होणारे अत्याचार ऐकायला मिळत, नाही असं नाही. पण बांबूच्या आणि काटेरी कळकांनी वेढलेल्या या कुग्रामात असं काही होईल अशी कल्पना कधी कुणी केली नव्हती.

आजवर सगळं ठीक चाललं होतं पण एके दिवशी गाजीमियाँचे पांढरे पाय या गावाला लागले. त्याने इथे शाळा– नव्हे मदरसा – सुरू केली. मग मशीद बांधायची धार्मिक इच्छा त्याला झाली व त्यासाठी पिपिलीच्या सेनाधिकाऱ्यापासून ते नायब–नाजिम तकीखाँ पर्यंत सगळ्यांचं त्याला सहाय्यही मिळालं; त्या दिवसापासून सगळंच फिरलं. शांत जलाशयासारखे व वेळूच्या बनासारखे असलेले त्या मुसलमानांचे प्रेमळ डोळे अचानक कठोर व निस्तेज झाले होते. आता कळस तोडायला चढलेला फकीरा दरवर्षीच्या चंदनयात्रेत भाग घेऊन चित्रविचित्र फटाके देऊन वाहवा मिळवायचा. ते तर चंदनायात्रेचं खास आकर्षण असायचं लहानथोरांना. त्यांची भाषाही उडिया – थोडी उर्दू मिसळलेली होती. आताच तो वरतून ओरडत होता. 'आबे नीचे खडा होके क्या देखताम ! सावेली एक ठो ले आम !' फकीरा मियाँची हाक ऐकून फैयाजमियाँ एक 'सावल' घेऊन वर चढतच होता एवढ्यात कुठूनतरी एक तीर सणाणत आला अन् फकिरमियाँ फणसासारखा धपकन् खाली कोसळला. इकडे गाजीमियाँही रक्त-बंबाळ होऊन तट्टावरून खाली आले होते. क्षणात सारं काही बदललं होतं. सगळी-कडून अगणित बाणांचा वर्षाव होत होता; आणि 'जय जगन्नाथ' चा गंभीर घोष ऐकू येत होता. त्यात आता गावकरीही सामील झाले होते.

पळभरात मंदिराचा आसपास स्मशानवत् झाला. कबुतरांचे घुमणे हीच काय ती तेथली जिवंतपणाची खूण ! कुंज गडनायकही कुठून आणि केव्हा कुणास ठाऊक तिथे उपस्थित झाले व गरूडस्तंभापाशी डोळे मिटून उभे होते. त्यांच्या डोळ्यातून आसवं वहात होती. दुर्गेश्वरी विधवा होऊन आली तेव्हा ते रडले होते त्यानंतर आज.

अचानक कुठूनतरी घोडेस्वार आले व अकस्मात आक्रमण करून, मंदिराचे रक्षण करून सूर्यास्तासारखे अस्त पावले.

त्या रात्री प्रत्येक घरात हीच चर्चा चालली होती की बिशर महांतीसाठी स्वत: प्रभु जगन्नाथ पांढऱ्या घोड्यावर व बळराम काळ्या घोड्यावर बसून आले होते. नरि पढिआरीच्या ओट्यावर भांग घोटता घोटताही हेच बोलणं चाललं होतं. पढिआरी म्हणत होते की शंखचक्रगदाधारी जगन्नाथ त्याने स्वत: प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले. जगु पट्टनायक आपल्या हातातली चिलीम दुसऱ्याला देता देता मिस्कीलपणे म्हणाला, "तेव्हा किती अफू पार झाली होती. पढिआरीजी ?" त्याबरोबर रागाने लाल होऊन भांगेची वाटाघाट सोडून ते उठून उभे राहिले व ओरडले, "साला स्वत: गंजेडी न् मला अफीमी म्हणतो ? अरे आपला तो हा, कोण रे तो, वैकुंठ, सांग तू ! तू नाही पाहिलंस 'काळ्या ठाकुराला ?' बिचारा वैकुंठ कधीची आशाळभूत दृष्टी लावून बसला होता की कधी भांग तयार होते न् कधी आपण ती घशाखाली घालतो.

सबंध दिवसात एकही घोट नव्हती मिळाली. डोकं चढलं होतं त्याचं; आणि त्याच्यानं ते सहन होत नव्हतं. तो उतावळेपणाने ओरडून म्हणाला, " खरी गोष्ट खरी म्हणायला कुणाच्या बापाची भीता आहे ?"

पण तरीही कुणी कुणी म्हणत होतंच की आता मुसलमान हाफिज कादर बेग झालेले खोर्धाचे महाराज रामचंद्रदेवच घोडेस्वारांच्या मागून, मंदिर तोडणारांवर तीर सोडत होते.

नरि पढिआरी रागावला. म्हणाला, " असली वाह्यळ बडबड बंद करा. रामचंद्र-देव......हुं ! त्याचं नाव उच्चारणं देखील महापाप आहे बरं. तो कशाला अडमडेल ? खुद्द जगन्नाथच आला होता बळिरामाला मदतीला घेऊन. नाहीतर आज काही राहिलंच नसतं !"

3

चिकाकोलपासून कटकपर्यंत ज्या अनेक अतिथीशाळा आहेत त्यापैकी बालूगावची अतिथीशाळा तेव्हा विशेष प्रसिद्ध होती. तिच्या मालकिणीच्या नावाने म्हणजे सरदेईच्या नावाने ती ओळखली जायची. त्या रस्त्याने जाणारे व्यापारी, ठेकेदार, फौजदार, लष्करचे अंमलदार बहुश: सरदेईच्या अतिथी शाळेत उतरत असत.

मुख्य रस्त्यापासून हाकेच्या अंतरावर ही अतिथीशाळा होती — म्हणजे काय तर दक्षिणाभिमुख तीन-चार कच्च्या बांधकामाच्या खोल्या. तिच्या मागे चिलिकेचं वाळवंट आणि कळकांचं जंगल होतं. समोर चिकाकोल-कटक रस्ता आळोखे पिळोखे देत कुठंतरी हरवला होता. अतिथीशाळेपासून थोड्या लांब एक तळं होतं व त्याला टेकूनच एक वडाचं झाड. त्या वडालाही नाव होतं 'हांडि भंगावर'

सरदेई अतिथीशाळेचा पत्ता सांगणाराही त्या हांडि भंगावराचा उल्लेख करूनच पत्ता सांगे.

चिलिकेच्या कालिजाई देवीचं दर्शन आटोपून जेव्हा यात्रेकरू परततात तेव्हा याच वडातळी मुक्काम ठोकतात. त्यांच्या खुणा म्हणून तिथे तीन दगडांच्या कामचलाऊ चुली, राख, जळकी लाकडे, कोळसे आणि फुटकी गाडगीही पडली आहेत. चिलिका जेव्हा भरगच्च असेल तेव्हा परतायला उशीर झालेले यात्रेकरू मग सरदेई अतिथी शाळेत उतरतात. अशी रहाण्याची सोय इतरत्र नाही. शिवाय एका रात्रीची वस्ती का

होईना, वृद्धांना बाबा, काका म्हणून, बरोबरच्यांना भाऊ अप्पा म्हणून तर लहानांना बाळ बेटा म्हणून सरदेई एक आपुलकी उत्पन्न करायची. तशीच वागणूक बायकांशीही असायची. स्वयंपाकासाठी ती त्यांना पाणी आणून द्यायची, भांडीकुंडी द्यायची. पैसे देऊन मिळणाऱ्या तांदूळ, शेगडी, लाकडे वगैरे वस्तू तर ती देईच, पण आपलेपणा, माया या अनमोल चीजाही ती सहजतेने द्यायची. अतिथीशाळा व सामानाचं भाडंही अन्य अतिथी शाळांपेक्षा कमी असायचं एका रात्रीचं भाडं एक कवडी असायचं. त्यात या सगळ्या वस्तूही असायच्या आणि सरदेईची प्रेमळ सेवाही असायची. म्हणून सरदेईच्या अतिथीशाळेची सर्वजण वाखाणणी करीत.

या कालिजाई यात्रेकरूंच्या शिवाय आणखी एक प्रकारचे गिऱ्हाईक अधूनमधून या अतिथीशाळेत येत. एका रात्रीसाठी एक कवडीच का आठ कवड्या म्हणजे त्यावेळी प्रचलित असलेला एक मोंगल रुपयाही भाडं द्यायला ते मागंपुढं पहात नसत. त्यांचे डोळे लाल असत... श्वास मदिरेनं सुगंधित असत. त्यांना लांबवरूनच सरदेई ओळखायची आणि हाकाही मारायची. त्यात व्यापारी, सावकार, नावाड्यांपासून ते शिपायापर्यंत अनेक प्रकारचे लोक असायचे. अन् ते बहुधा घोड्यावर एकटेच असायचे. इथं घोड्यांचंही व्यवस्थित स्वागत होई.

ओळखीच्या गिऱ्हाईकांशी थोड्या रुसव्याने सरदेई म्हणायची, " हे भलत्या वेळी कसं येणं झाल बरं ! रस्ता चुकलेला दिसतोय. नाहीतरी एका रात्रीच्या मुक्कामाची अशी काय आठवण राह्यचीय ?......" इत्यादि. तिचं हे गोडव्याचं स्वागत ऐकून ते डोळे आणखीच लाल होत.

या लोकांच्या सरबराईसाठी तिने एक जगुनि नावाचा नोकर ठेवलाय. अतिथी-शाळेमागे वाळूच्या टेकडाआड भट्टी आहे तिथून तो बाटल्या आणतो व गिऱ्हाईकांना पुरवतो. त्याचे एक वेगळे चुलाण आहे. त्यावर त्यांचे चार पायांचे पक्वान्न शिजते. ही सगळी मिळकत जगुनीची. सरदेई त्याला हातदेखील लावत नाही.

दारू पिऊन डोळे गुंजेसारखे तांबडे लाल झाले, तोंडातून फेस निघायला लागला की अगदी त्याच वेळी सरदेई काखेत कळशी घेऊन हांडिभंगावराच्या दिशेने पाणी आणायला जाई. एखादेवेळी वरच्यातला एखादा तिच्या मागे मागे जाई. सरदेईला मागं वळून बघायची सुद्धा गरज भासत नसे. चाहुलीवरूनच ती ओळखायची अन् मोठ्यानं जगुनिला हाक घालायची, " जगुनि , अरे जगुनि........"

झुडुपाआडून प्रगट होत आपले वाकडेतिकडे दात बिचकत तो ओरडायचा,

" आलो गे. मलाच बोलावलंस ना ? "

त्याची ती प्रचंड मूर्ती बघून येणारा मागच्या मागे पसार होत असे. जर कुणी

त्याच्याकडे दुर्लक्ष करायचे धाडस केलेच तर मग त्याला काटेरी जाळचात बराच वेळ पडून रहावेच लागे; आणि मग त्याला समजून येई की ज्या सरदेईला फूल समजत होतो ती काटा आहे.

एखाद्या वेळी एकाहून जास्त प्रेमवीर गोळा झालेले असतील तर सरदेई जगुनीला नाही बोलवत. प्रत्येकाकडे बघून अशी काही हसते की प्रत्येकाला वाटते की ही फक्त आपलीच ! नंतर अर्थातच ते आपापसात याचा निकाल लावून घेण्याचा प्रयत्न करत. मग मात्र शांतता नांदावी याच एका हेतूने जगुनीला धावत यावे लागे.

सरदेई आणि जगुनि.

एक फूल अन् एक काटा. पण काटा बोचून घेऊनही फूल तोडणं कधी कुणाला जमलं नव्हतं – जमेल असं वाटत नव्हतं.

फार मागे, एका भर दुपारी चिलिकातटावरच्या त्या गावात राजा रामचंद्रदेव तहानेने व्याकुळ होऊन आले होते आणि पाणी देणारीच्या वेदनार्द्र नेत्रांत स्वतःला हरवून बसले होते--सरदेईचे डोळे अजून तेच तसेच मोहक होते. त्यात मालिन्य आले नव्हते. तिच्या देहावर कालचक्राच्या खुणा थोड्याबहुत उमटल्या होत्या पण श्यामल सरदेई तीच होती. ती सरदेईच या सरदेई अतिथीशाळेचं खास वैशिष्टच होती.

चिलिकातटाच्या त्या वस्तीत तिची आंधळी, बहिरी अन् वेडी सासू होती. ती मेली तेव्हा सरदेईला त्या वस्तीत कोणताच पाश राहिला नाही. त्या दिवशी शांतीचा श्वास घेऊन ती जीवनाशी झुंजायला एकटीच बाहेर पडली. कधी ती बालूगावात आली अन् जगुनीच्या अतिथीशाळेत आश्रयासाठी प्रार्थना करू लागली. आता काही ते ठीकसं आठवत नाही. सड्याफटींग जगुनीलाही तिला ' देई ' म्हणावंसं का वाटलं ते सांगता येणार नाही. अतिथीशाळेच्या व्हरांड्यात, हांडिभंगा वडाच्या खाली किंवा तळ्याच्या काठी एकटी असली की सरदेई या सगळ्या गोष्टी मनात घोळवते....पण उमजत काहीच नाही.

बालूगाव हे काही जगुनीचं गाव नव्हे. पण तो कुठून व कसा इथं आला ते काही त्याला आठवत नव्हतं. बरेच वेळा सरदेई त्याला विचारायची, " कुठे होतं रे तुझं घर ? " पण चिलिकाच्या खाऱ्या पाण्यागत अथांग विस्मृतीच्या खेरीज त्याला काही आठवायचंच नाही. तसे तोही तिला कधी कधी प्रश्न विचारायचा भूतकाळाबद्दल. अशा वेळी सरदेईच्या डोळ्यांसमोर चिलिकेच्या अथांग पाण्यातल्या एकाकी नावेच्या चित्रासारखं काहीतरी तरळून जाई. त्या दोघांचे आपसात आपापल्या जीवनविषयक प्रश्नांचे अनुत्तरित समाधान व्हायचे. सरदेई एक उसासा सोडून गप्प

बसत असे. पण एखाद्या पोराप्रमाणे आपलं अंग तिच्या मांडीवर घुसळत जगुनि म्हणे "चल ग चल आता. भूक लागली खूप."

बहुधा सरदेई समोरच्या रस्त्याकडे पहात कुठतरी हरवलेली असायची. जगुनीचं बोलणं तिला ऐकूच यायचं नाही. तेव्हा तिला गदगदा हलवून तो म्हणायचा, " चल की ग आता. खरंच खूप भूक लागलीय."

त्याच्या केसातून प्रेमाने बोटं फिरवत ती म्हणायची, " किती दंगा करतोस रे" ; अन् तेवढ्यात तिला आठवण यायची न् म्हणायची, "अरे, तुझ्यासाठी राखेत मासा घालून ठेवला होता बघ. विसरूनच गेले. आता कोळसा झाला असेल. चल, चल."

जीवनाच्या झंझावातात ही दोन पानं कुठून तरी उडत आली आणि एकमेकांना बिलगून या बालूगावात राहिली होती.

पुसातलं सोनेरी उन सालेरीच्या डोंगरामागं गेलं होतं की ढगाआड लपलं होतं कोण जाणे ! पण शेतावर ते नाचत नव्हतं ना, त्यामुळे डोळे जड होत होते. जंगला-जवळ शेतं डवरलेली असत. पाखरांना तर ते मेजवानीचे दिवस. ते दिवस आले की कापणीला प्रारंभ व्हायचा.

या वर्षी असलं काही नव्हतं. शेतं ओस पडली होती. टिकाली रघुनाथपुर चिका-कोलला जेव्हापासून जोडलं गेलं तेव्हापासून मोगलांचे अत्याचार या भागात वाढले. खरं तर हा प्रदेश खोर्धा राज्यातला. पण त्याचे संरक्षण करण्याची शक्ती खोर्धात नव्हती. सगळा प्रदेश उजाड रखरखीत झाला होता. शेतात धान्यच नव्हते तर पक्षी तरी कुठचे अन् कापणी करणारे तरी कुठले ? खोर्धा राज्यात पुन्हा सैनिकी तयारींना प्रारंभ झाला होता. रोख पगार घेणारे आणि ज्यांना कराचा बोजा नव्हता असे पाइक रथीपुर, खोर्धा, शिशुपालगड वगैरे ठिकाणी छावण्या करून बसले होते. मग शेती करणार कोण ? आतापासूनच एक 'भरण' धान्याची किंमत वीस 'काहाण' झाली होती. शेतात गिधाडे उडायला लागली होती.

चिलिकेवरून थंड हवा येत होती आणि सरळ जंगलात घुसत होती. रस्ता निर्जन होता. पुन्हा सगळीकडे लढाईबद्दलची अफवा पसरली होती; त्यामुळे नेहमीचं जीवन थोडं विस्कळित झाल्यासारखं झालं होतं. लोकांनी आपली घरंदारं सोडून दिली होती व ते रानावनात, जाऊन राहिले होते. गुरंढोरं मालकांशिवाय हिंडत होती.

म्हणून तर कालिजाईहून कुणी येत नव्हतं. ज्यांचे नवसच बोललेले असतील ते अर्धामुर्धा बकरा नाहीतर कोंबडा घेऊन नावेत चढायचे.

एरव्ही दरवर्षी यावेळी बालूगावात यात्रेकरूंची ही गर्दी उसळते. सगळ्या अतिथी-शाळा भरून लोक हांडिभंगावडाखाली व क्वचित् उजाड प्रदेशातही मुक्काम ठोकतात.

आश्विन, कार्तिकात ते पुरीला जायला निघतात. बाणपुर, खल्लिकोट, गंजामगड इथूनच जास्त लोक पुरीला जायला बालूगावी येतात. इथून नावेतून माणिकपाटणा व तिथून पायी पायी श्रीलोकनाथदर्शन करून पुरीला पोचतात. तेव्हा ही भूमी खंजिरी व मृदंगाच्या आवाजाने दुमदुमून जाते. पण यावेळी 'पंचक'च्या वेळीही कुणी आले नाही. काही म्हाताऱ्या विधवा मात्र आल्या होत्या. तेव्हा काही कुठं लढाईचं नाव नव्हतं. जशी वादळाआधीची शांतता असावी तशी सगळीकडे शांतताच होती. मग आताच ही लढाईची अफवा कुठून पसरली होती कोण जाणे! जणू गेल्या दीडशे वर्षांत वारंवार लढाया, आक्रमण व अत्याचारांना तोंड देऊन लोकांचे सहावे ज्ञानेंद्रिय तीक्ष्ण झाले होते. त्यामुळे त्यांच्या अवचेतन मनाला धोक्याची सूचना मिळत होती. तसं पाहिलं तर टिकाली–रघुनाथपुरच्या लढाईत पराजय पदरी घेऊन रामचंद्रदेव हाफिज कादर बेग झाल्यावर लढाईचा प्रश्नच कुठे उरला होता?

अतिथीशाळा बंद होती. जगुनि सकाळपासून मुंगुस पकडण्यासाठी केवड्याच्या जंगलात घुसला होता. सरदेई पाणी आणायला म्हणून तळ्यावर गेली होती आणि आळसावून तिकडेच बसली होती. भरून आलेलं आभाळ, उजाड पडलेली शेतं, निर्जन सडक आणि वारा यांनी तिच्या अंतःकरणात जसा काही हाहाःकार मांडला होता. जंगलात कुणा एका पक्ष्याचा आवाज ऐकू येत होता. त्यामुळे असेल किंवा एरव्ही ती भानावर आली म्हणून असेल ती उगाच जगुनीला हाका मारू लागली,

"जगुनि.. अरे जगुनि."

पण केवड्याच्या बनाआडून जगुनीचा नेहमीचा आवाज ऐकू नाही आला.

घोड्याच्या टापेची चाहूल ऐकू येत होती.

इतर दिवशी तर या चाहुलीने गडबडून भयभीत हरिणीसारखी ती सराईत पळून गेली असती. पण आज कुणा अनोळखी घोडेस्वाराच्या टापांच्या आवाजाने तिला भीती वाटली नाही. ती जणू त्यांची वाट बघत बसली होती. जणू या रुक्ष चित्रात माणसाची तिला जरूर भासली.

घोडेस्वार बहुधा सैनिक असावा. घोड्यावरून उतरून कर्कश आवाजात त्याने विचारलं.

"बाणपूरला हाच रस्ता जातो का?"

हांडिभंगावडाखालून सडकेनं एक वळण घेतलं आहे आणि ती बाणपूरला पोचते. तिथून तर खोर्धा व बाणपूरच्या सरहद्दीवरचे जंगल सुरू होते. सरदेईने मान खाली घालून पदर तोंडावर ओढला आणि उत्तर दिले, "हो."

पण रस्त्याला लागण्याऐवजी तो हळूहळू तिच्याजवळ आला अन् म्हणाला, "पाणी हवंय."

सरदेईने त्या अनोळखी घोडेस्वाराच्या ओंजळीत पाणी ओतायला सुरुवात केली. पाणी पिऊन तो निघून गेला. त्याच्या घोड्याने उडवलेली धूळ झाडांवरच्या पानांवर ढगांप्रमाणे दिसायला लागली. पश्चिमेकडे आकाश लाल झाले.

सांज ढळली.

जगुनीला हाक मारत सरदेई अतिथीशाळेत परतली. तिला पाहून व्हरांड्यात बसलेला जगुनि म्हणाला, "देई, बघ तरी कसा छान मुंगुसाचा बच्चा पकडून आणलाय."

पूर्वी त्याचं एक मुंगूस होतं. सरदेईनंतर तेच आपलं विश्वासाचं अशी त्याची खात्री होती. मध्येच तिच्याबद्दलही त्याला शंका वाटे पण मुंगुसाबद्दल तो निःशंक असे. तेच ते खात्रीचं मुंगुस पळून गेलं होतं. तेव्हापासून तो एखाद्या मुंगुसाच्या बच्च्याच्या शोधात होता. आज दिवसभर भटकून त्याने एक पिल्लू पकडलं होतं आणि ते पिंजऱ्यात ठेवून सरदेईला दाखविण्यासाठी तो तिची वाट पहात बसला होता. मोकळ्या वातावरणातून पिंजऱ्यात बंद झाल्याने पिल्लू सारखं चिट्र चिट्र करत होतं. पिंजऱ्याला चावत होतं. एक कच्ची बिट्टी त्याला गजातून देत जगुनि मोठ्या मायेने म्हणत होता, "हं, घे पोरा."

पण त्या मुंगसाला ते प्रेम कळतच नव्हते. त्याचा आरडा ओरडा वाढत होता.

...अशा ढगाळ दिवशी सरदेईच्या मनाच्या आकाशातही कोणकोणत्या स्मृती कोंदटतात. त्यात ती स्वतःला काही वेळ हरवून बसते. आजही तळ्यापाशी वेळ घालवून परतताना तिची अवस्था तशीच होती. म्हणून जगुनि काय म्हणत होता तेही तिने ऐकलंच नाही. बराच वेळ दूर राहिलेल्या वासराला बघून गाय हंबरते तशाच आवाजात ती त्याला म्हणाली, "सकाळपासून कुठं गेला होतास रे तू? खाणं नाही. पिणं नाही आणि आत्ता संध्याकाळी उगवतोहेस तू!"

ओसाड जंगलात वारा थैमान घालत होता. तो तिचा स्वर उडवून गेला.

सरदेईने मनातल्या मनात वाऱ्याला शिव्या घातल्या – हा मेला वारादेखील वैरी झालाय! तेव्हाच जगुनीची नजर तिच्यावर पडली. अतिथीशाळेत ती येते न येते तोच तो उत्साहाने म्हणाला, "बघ, बघ तरी माझं मुंगुस." त्याने मुंगुसाच्या तोंडावर ती बिट्टी दाबून धरली होती. घागर खाली ठेवीत ती म्हणाली,

"अरे, अरे जगुनि काय करतो आहेस? मरेल ना ते. किती लहान आहे. याला का ती बिट्टी खाता येणार आहे?"

जगुनीने विचारले, " मग याला काय देऊ ?"

सरदेई म्हणाली, " जरा मोठं असतं तर हरकत नव्हती. पण याला दूध पाजून केव्हा हा मोठा होणार ? याला दूध तरी आपलं आपण पिता येतं आहे की नाही कुणास ठाऊक. बोळयानं पाजलं पाहिजे नाहीतर प्राण सोडेल बघ."

हे ऐकून त्याच्या हातातली बिट्टी गळून पडली. वाऱ्याने ती लांबवर गेलीही. जगुनि थोडा वेळ त्या मुंगुसाला विसरून काळवंडलेल्या आकाशाकडे आपल्या करुण नेत्रांनी पहात राहिला.

वाळूतून मध्येच दिसणाऱ्या खेकडयाप्रमाणे काही आठवणी त्याच्या स्मृतीत तोंड दाखवायला लागल्या. अतिशय भयानक असा एक दुष्काळ, त्यातच आईबापांनी टाकलेलं एक अजाण पोर...तेव्हा तर माणसं एकमेकांना खात होती तिथं कोण कुणाला आश्रय देणार ?

पण तरीही कुणाच्या तरी पुत्रहीन भुकेल्या मनात प्रेमाची हिरवळ जागली होती. कुणाच्या तरी तोंडून ऐकलेल्या कथेसारखं आठवतंय. कुणीतरी त्या आसन्नमरण पोराला दूध पाजलं. त्याला दूधही पिता येत नव्हतं. मांडीवर घेतलं. अजून ती ऊब लक्षात होती खरी. हळूहळू मूल बोबडया स्वरात आई–बाबा म्हणायला लागलं.

दुष्काळ तेव्हा नेहमीचाच सोबती होता. काही वर्षांनी मोंगलांचा हल्ला व दुष्काळ संगेसंगेच आले. दुष्काळाची सर्वग्रासी क्षुधा व मोंगलांच्या अत्याचारांनी चारी बाजूला सापळयांचे ढीग लागले. अगोदरच्या दुष्काळात ज्यांनी त्या बालकाला रस्त्यावरून उचलून वाचवले होते तेही यावेळी त्या सापळयांच्या ढिगात सापडले. पुन्हा एकदा अनाथ होऊन तो रस्त्याच्या कडेला आला. त्यावेळी कुणा भल्या माणसाने त्याला बालूगावच्या अतिथीशाळेच्या म्हाताऱ्या मालकिणीला विकले. तेव्हा तो होता असाच बारा–चौदा वर्षांचा. दुष्काळात अशी मुलं विकत घेऊन गुलामांच्या रूपात परदेशी पाठवणं एक फायदेशीर धंदा पुष्कळजण करत असत.

बालूगावच्या त्या म्हातारीचाही अतिथीशाळेशिवाय आणखी एक धंदा होता. तिच्या एका बाजूच्या खोलीत अशी खूप अस्थिपंजर मुलं कोंडून ठेवलेली असत परदेशी पाठवण्यासाठी.

जगुनीच्या स्मरणात अजूनही त्या म्हातारीचा भयंकर चेहरा आहे. तिला टक्कल होतं. डोळे खोल गेलेले होते. भुवयाही पिकून पांढऱ्या झाल्या होत्या. वरचे दोनतीन वाकडेतिकडे पिवळे किटलेले दात होते. तोंडाच्या शुष्क कातडीवर हे ऽ ऽ कोळयाच्या जाळयासारखे सुरकुत्यांचे जाळे, गिधाडाच्या चोचीसारखे लांबलचक नाक जणू कुणीतरी तिच्या सपाट चेहेऱ्यावर चिकटवलं होतं. शरीर धनुकलीसारखं वाकलेलं आणि दोन्ही

भुजांवर टसटसलेल्या शिरा व तीक्ष्ण नखे. लोक तिला माणसांना खाऊन टाकणारी जखीण म्हणत.

पण तिच्या तरुणपणी जेव्हा ती लग्न होऊन इथं चिलिका तटावरच्या मानसिंह गावी आली होती तेव्हाच्या आठवणी सांगणारे लोकही होते. म्हणतात, तिने आपला नवरा आणि मुलं यांना एकेक करून खाऊन टाकले. असं तिची सासू व नणंद म्हणत असत. अमावास्येच्या रात्री चिलिकेच्या काळ्या पाण्यावर लाटा उठायला लागल्या, वेळूच्या बनातून वारा विव्हळायला लागला व आकाशात मुडद्यांच्या निर्जीव डोळ्यां-सारख्या तारा चमकायला लागल्या की म्हणे म्हातारी हंडीभंगावडाच्या खाली चूल पेटवून माणसं शिजवते. आपले हातपाय चुलीत सरकवून पेटवते. हा देखावा जर चूकून कुणा एखाद्या वाटसरूच्या दृष्टीस पडलाच तर त्याला तिथल्या तिथं रक्ताची उलटी होऊन तो गार होतो. त्या भीतीनेच तर रात्री किंवा दुपारी तिकडे कुणी फिरकत नाही. अजूनही लोक त्या जागेला भितात. म्हातारी अजूनही तिथं येऊन बसत असल्याचं तांत्रिकांनी कधी कधी बघितलं आहे.

तिला कुणाबद्दलच दयामाया नव्हती. तिच्या अतिथीशाळेत रहाणाऱ्या पाहुण्यांची पाणी आणण्यापासून ते रानातून सरपण आणण्यापर्यंतची सगळी कामं ती हडकुळी मुलं करायची. मधून मधून ती एखाद–दुसरं मूल विकून टाकायची किंवा एखादं मरायचं तेवढंच सुटायचं.

सगळे गेले. फक्त जगुनि तेवढा उरला.

त्याचं नशीबच होतं. कित्येक वर्षं कोरडी गेल्यावर त्यावर्षी खूप पाऊस झाला. मोंगल हल्ले थंड पडले. धान्य पिकलं. खूप वर्षांनंतर लोकांना शांतता मिळाली. पण एवढ्यात महामारी फैलावली. गावच्या गावं उजाड व्हायला लागली. पण ती आजारी म्हातारी मात्र लठ्ठलठ्ठ व्हायला लागली. तेव्हा जो कुणी कसाबसा वाचला तो म्हणायचा की या थेरडीचा जीव कालिजाईच्या पाण्यात अगदी तळाशी एका डबीत आहे व तिचे रक्षण एक भलामोठा रुईमासा करतो. म्हणून महामारी तिच्या वाटेला जाऊ शकली नाही. कुणी म्हणे ही महामारीची सख्खी बहीण आहे आणि तिचं पारिपत्य केल्याशिवाय महामारीचं संकट टळणार नाही.

आजसुद्धा त्यादिवशीचं ते भयानक दृश्य जगुनीला आठवतं. एक दिवशी हांडिभंगा-वडाखाली आजूबाजूचे लोक जमले. तिथं त्यांनी मोठी आग प्रज्वलित केली. ज्वाळा आकाशाला स्पर्श करू लागल्या. त्या दिवशी म्हतारी मसणात कुठली जडीबुटी शोधायला गेली होती. लोकांनी तिथून तिला शोधून आणली व त्या होळीत तिला वांग्यासारखं फेकून दिलं.

तो संबंध दिवस जगुनि घाबरून वेळूच्या बनात लपून बसला होता. हळूहळू सकाळी आग विझली. लोकही पांगले. विझणाऱ्या आगीतून धूर निघत होता आणि तरीही त्यातून जळक्या मासाची दुर्गंधी येत होती. लपल्या जागेतून जगुनि अतिथीशाळेत परत आला. त्यानंतर महामारीही संपली.

पिंजऱ्यातून तोंड बाहेर काढून चीं चीं करणारं ते मुंगसाचं पोर जगुनीला त्याच्या बालपणच्या आठवणी करून देत होतं. एकदा त्याला सोडून द्यावं असाही विचार त्याच्या मनात आला पण दुसऱ्याच क्षणी तो झटकून तो शेजारच्या गोठ्यात गेला. सरदेईने त्याला दूध पाजायला सांगितलं होतं. अतिथीशाळेत दूध नव्हतं. जवळच म्हशींचा गोठा होता. तो मुंगुसासाठी दूध आणायला निघाला.

आत संध्याकाळची दिवाबत्ती करून जर सरदेई बाहेर येते तर जगुनि तिथं नव्हता. जोराचा वारा वहात होता. तिकडं ते मुंगुस चं चं करत होतं. वेळूच्या जंगलातून वटवाघळांची झुंड पंख फडफडवीत येत होती. दुसरीकडून घरट्याकडे परतणारे पक्षी निमूटपणे येत होते.

सरदेईने हाक दिली, "जगुनिऽऽ एऽऽ जगुनि रेऽऽ." पण वाऱ्याच्या झोता-बरोबर ती हाक परत आली – अर्धीमुर्धीच ! उत्तर आलं नाही.

एक चादर पांघरून ती ओट्यावर खांबाला टेकून बसली. फार दमली होती. तिच्या आसपास संध्याकाळ भरारून आली होती. बाणपुर जंगलाच्या वर आकाशाच्या अंगणात जणू कुणी गुलाब उधळला होता. वादळी रात्रीच्या स्वागतासाठी वेळू, ताड, खजुराची झाडं पिशाचिनींसारखी केस विखरून जणू नाचत होती. सायंकाळचा समस्त अंधकार, रात्रीची सारी वटवाघळं, वादळाचा सर्व तुफानवारा जवळच्या त्या ढांडिभंगा-वडाच्या जटांमध्ये उतरत होता. केवड्याच्या बनाआडून येणारी कोल्हेकुई त्या वातावरणाला आणखीनच भयानक करीत होती.

बाणपूरचा रस्ता विचारणारा आता कुठं असेल कोण जाणे ! तो कोण होता ? असं काय मोठं जरूरीचं काम अडलं होतं बाणपूरला ? या प्रश्नांच्या दोरखंडाला धरून भूतकाळाचा एक तुकडा तिच्या मनःचक्षूसमोर आला. चिलिकेजवळची ती निर्जन वस्ती...ती दुपार...त्यालाही अशीच तहान लागली होती...गुडघे टेकून बसून ओंजळ तोंडासमोर धरून तो अर्धी घागर पाणी प्याला. तिनं एक सुस्कारा टाकला. अभागीचं जीवन, अंधार, मोंगल–दंगा, दुष्काळ हे सर्व मिळून जणू एकाकार झाले होते. त्यांना परस्परांहून भिन्न करणं अशक्य होतं. तो अनोळखी घोडेस्वार, त्याची तहान, रणरणती दुपार सारं मिळून तिच्या मनात एकजीव झाले होते. त्यानेही त्या दिवशी मालकुदा गावात तिच्या घरासमोर उभं राहून असाच बाणपूरचा रस्ता विचारला होता. बाणपूर

कुठंय, कोणतं राज्य आहे हे तिला काय माहिती ? सरदेईला फक्त बाणपूरची भगवती ऐकून माहीत होती. नवसाला पावणारी. तिचा सासरा गेला होता खूपदा नवस फेडायला...

सरदेईच्या मनासमोर एक चेहरा तरळला. पाषाणातून कोरून काढावी अशी मूर्ती, मोठेमोठे कल्ले, खांद्यावर रुळणारे केस...तिचा नवरा ! कुठे गेला तो ? कुठे गेले तिचे दीर ? त्यांची लग्नं ठरली होती. जावा यायच्या होत्या. भरल्या घराचं साधंसुधं स्वप्न तिची सासू पहात होती. पण अचानक मोंगलांनी खोर्ध्यावर केलेल्या आक्रमणामुळं ते फुटून गेलं. देश म्हणजे काय, स्वातंत्र्य म्हणजे काय हे काहीही तिला माहीत नव्हतं. पण मोंगलांशी दोन हात करायचेत म्हणताना पाइकाच्या अस्सल कुळीचा कुणी घरात स्वस्थ बसणे शक्य नव्हते. पाइकाच्या पोटच्या मुलीनेही अडथळा केला नसता.

तिचा सासरा तर अंगात आल्यासारखा घुमायला लागला होता.

"नामर्दांनो, घरात काय बसलात ? षंढांनो, पाइकांच्या कुळाचे आहात की भंगी ? मुसलमानांचे हात शिवशिवताहेत जगन्नाथाची मूर्ती फोडायला आणि मग उत्कल राह्यला काय न् मेला काय !"

रस्त्यावर रणशिंगं, रणवाद्ये वाजायला लागली. मस्तकी शुभतिलक लावून, पंचारती ओवाळून सरदेईने नवऱ्याला, दीरांना निरोप दिला. पण ते परतून आलेच नाहीत. शत्रू माघारी गेले. शांतता पुन्हा प्रस्थापित झाली पण ते तिघंचौघं एकदा गेले ते गेलेच. एकटी सरदेई राहिली वाट बघत.

त्या दिवशी भर दुपारी ज्यांनी तहानेने व्याकुळ होऊन पाणी मागितले ते काय खरंच खोर्धाचे महाराज होते ? उत्कलचे शिरोमणि !! पहिल्यांदा त्यांनी स्वतःची ओळख दिली नाही पण मोंगल सैनिकांनी एका अबलेवर हात उचलला तेव्हा त्यांच्यानं राहवलं नाही. आजही त्या सैनिकांची आठवण येताच तिच्या अंगावर भीतीचा काटा आला. आज ते महाराज कुठे असतील ?

सरदेईने आपल्या बाहूवरची जखमेची खूण पाहिली. अंधारात ती दिसत नव्हती म्हणून तिने चाचपून पाहिली.

एकाएकी तिने जगुनीला हाक मारली. "जगुनि रे...ए जगुनि..." तो येतच होता. रात्र एक प्रहर झाली होती.

दिवसभर थकला होता म्हणून जगुनि पाय पोटाशी घेऊन झोपला होता. चुलीत लाकूड जळत होतं. त्या निखाऱ्यांचा मंद प्रकाश पसरला होता. बाहेर वाऱ्याचे प्रलयंकारी तांडव चालूच होते. वेळूच्या बनात जणू युद्धाचे नगारे वाजत होते. जगुनीच्या डोक्याजवळ मुंगसाचा पिंजरा होता. तेही बेटं झोपून गेलं होतं. काकडलेल्या जगुनीच्या

अंगावर पांघरूण घालून वादळाचे गर्जन ऐकत सरदेई बसून राहिली. वादळवाऱ्यात एका अनिश्चित भीतीने अतिथीशाळेची दारं थरथरत होती.

एवढ्यात तिला भास झाला की दरवाजावर कुणी टकटक केलं. वारा असेल असं समजून ती स्वत:शीच पुटपुटली " जळ्ळी ही रात्र कधी संपेल कोण जाणे. "

पण आता दारावरच्या थापांबरोबर आवाजही आला, " उघडा हो, कोण आहे आत ? "

अशा भलत्या वेळी, प्रलयरात्री, अनोळखी आवाज ऐकून सरदेई घाबरून गेली. चोर आहे की सैनिक आहेत ? कोण आहे ?

सरदेईने जगुनीला हलवून जागं केलं. बिचारा डोळे चोळत चोळत उठून बसला; आता तिच्या जिवात जीव आला. त्याच्या ताकदीवर आणि धाडसावर तिचा विश्वास होता. भित्र्या स्वरात ती त्याला म्हणाली, " बघ जरा कोण कडी वाजवतंय ते ? "

बाहेरच्याचा आवाज ऐकून जगुनि हातात कुऱ्हाड घेऊनच उठला. दार उघडताच तुफानाच्या वेगाने ती दारं भितीवर जोरात आदळली. जगुनीच्या हातात उजेडासाठी धरलेले जळके लाकूड होते. त्यातून ठिणग्या उडून चारी बाजूस उडाल्या.

समोर दोन पाइक उभे होते. अंगरखा घातलेले. धोतरावर एक कमरबंद होता व त्यात सुरा खोचला होता. छातीवरच्या पदकावर नीलचक्र होतं. खोर्धा राजाची खूण. डोक्यावर पगड्या होत्या. गालमिश्या न् मिशा याऽ भरघोस होत्या. पाठीवर ढाली, हातांत भाले, ओटचाखाली घोडे.

जगुनि सरदेईसमोर जितका निरीह आणि असहाय्य असतो तितकाच रुक्ष आणि कठोर इतरांसमोर असतो. रुक्ष स्वरात त्याने विचारले, " कोण आहात तुम्ही ? काय हवंय ? "

त्यातला एक जण क्लान्त आवाजात म्हणाला, " खोर्ध्याच्या बक्सीचे पाइक आहोत. बाणपुरास जातो आहोत. ही रात्र इथं काढू ? "

झोपेतून उठवल्यामुळे जगुनी चिडल्यासारखा झाला होता. पण तो भांडायच्या आधीच सरदेईने आतून म्हटले, " जगुनि, येऊं दे त्यांना. " खोर्ध्याचे होते ना ते !

कुडकुडत, एक जांभई देऊन तो म्हणाला, " या आत. घोड्यांना कुठं राहू देत ? त्या पलीकडे झोपडीत ? " अतिथीशाळेच्या जवळच घोड्यांसाठी तबेला होता. तो दाखवून पुन्हा एकदा किटाळं उडू नयेत म्हणून जपून जळकं लाकूड धरत तो त्यांना आत घेऊन आला.

वारा जोरात वेडावाकडा आत घुसत होता. दार बंद करणं सरदेई विसरूनच गेली. विचार करत होती,

"हेही बाणपूरला चाललेत. खोर्ध्याचे पाइक दिसताहेत. खोर्धा पुन्हा संकटात आहे ?"

रात्र वाढत होती. तुफानाचा जोर कमी झाला होता. पण झाऊ वनातला वारा तसाच गर्जत होता. चिलिकेचं पाणी रात्रीच्या अंधारात तटाच्या मर्यादा सोडायला आतुर झाले होते. जगुनि पुन्हा झोपी गेला होता. एक ते पाईक अन् सरदेई यांना झोप शिवत नव्हती. तिच्या मनात तर अनेक विचारांनी झाऊवनातल्यासारखे तुफान माजवले होते. असंख्य भावनांचा गुंता झाला होता.

जवळच्या खोलीत ते दोघेजण बोलत होते. एकजण दुसऱ्याला म्हणत होता,

"तर राऊत, खोर्धाचा राजा गेल्यातच जमा म्हणा."

खोर्ध्याच्या राजाचे नाव ऐकताच सरदेई कान लावून ऐकू लागली.

राऊत वैतागाने म्हणाला,

"शिशुपालगड सोडल्यापासून शंभर वेळा हे एकच वाक्य ऐकतोय. पण भानगड काय आहे सांगाल की नाही ? सोबतीच तर आहे तुमचा."

सोबती म्हणाला, "म्हणजे ? माहिती नाही का ? जे पत्र घेऊन तुम्ही महाराणी-कडे चालला आहात त्यात बक्सीने सगळं लिहिलं आहे की ?"

राऊत म्हणाला, "तुम्हीच सांगा. मी पत्र उघडलंही नाही न् वाचलंही नाही."

पाइक म्हणाला, "चिकाकोलचा सेनापती कटकच्या नायब–नाजिमला नजराणा पाठवणार आहे. सालेरीजवळ ही रक्कम लुटली गेली पाहिजे असा सल्ला देणारं पत्र बक्सीने महाराणीला लिहिलंय."

राऊत म्हणाला, "मूर्खागत बोलू नकोस. समज नजराणा लुटला तर तो राणीच्या पाइकांनी. त्यामुळे राजाचं काय नुकसान ?"

पहिला त्याच्या बुद्धीची कीव करून म्हणाला, "काही समजत नाही बघ तुला. नायब–नाजिमने राजाला ताकीद केली आहे. रुपये सहीसलामत कटकला पोचले पाहिजेत म्हणून बजावलं आहे. वाटेत लूटमार होता कामा नये. आणि तरीही रस्त्यात जर नजराणा हडप झाला तर जबाबदार कोण ? तू, मी, महाराणी की राजा ?"

"राजा, अर्थातच." राऊत म्हणाला, आणि गंभीर झाला.

मग पाइक उत्साहाने म्हणाला, "तुला ठाऊक आहे. ज्या दिवशी गाजीमियाँचा सिइल–ब्रह्मपूर गावी खून झाला त्या दिवसापासून नायब–नाजिमाच्या मर्जीतून खोर्धाराजा उतरलेत. ते फक्त संधीची वाट बघताहेत राजाला कच्चा चावून खायची.

तकीखाँ मुर्शिदाबादेला गेलाय. तिकडून काही बातमी आली होती म्हणून. नाहीतर एव्हांना खोध्र्याचं बरंवाईट झालंच असतं. खोर्धामहाराज पुनश्च साखळदंडात बांधले गेले जाते. कटकला पाठवले गेले असते. मग सांग, अशा परिस्थितीत जर नजराणाही गडप झाला तर काय होईल ? राजाची घडगत राहणार नाही.''

राऊतने विचारले, ''पण माझ्या लक्षात अजूनही येत नाही की बक्सी भ्रमरवरला यापासून काय लाभ ? '' पाइक राऊतच्या मूर्खपणाला वैतागून उत्तरला,

''अरे लाभ काय म्हणून काय विचारतोस ? राज्यलाभ ! बक्सी जर राजा झाला तर आपला सगळ्यांचाच लाभ आहे, समजलास ? ''

दुसऱ्या बाजूस कान देऊन ऐकणाऱ्या सरदेईच्या अंगावर जणू रसरसते निखारे ओतले. तिला राजकारण कळत नव्हतं पण तिला एवढं कळलं की खोर्ध्याच्या राजा-विरुद्ध मोठं कारस्थान चालू आहे. याचाच अर्थ पुन्हा लढाई. पुन्हा लेकीमुलांची कपाळं फुटणार बांगड्या फुटणार. पुन्हा एकदा सर्वत्र स्मशानकळा पसरणार. खोर्ध्याच्या राजाला पुन्हा एकवार लोखंडी पिंजऱ्यात बंद करून कटकला नेणार......नाही, नाही. हे होता कामा नये. सरदेईच्या हृदयाने जणू आर्तनाद केला.

बाहेर वाऱ्यांचे थैमान चालूच होते. झाऊवनात सूं सूं करीत वाहणाऱ्या वाऱ्या-सोबत तालवनात जणू नगारे दुमदुमत होते.

घोडेस्वारांपैकी पाइक अचानक म्हणाला, ''अरे, राऊत पत्र तर घोड्याच्या जिनातच राहिलं. आता ?''

राऊतला झोपेने घेरलं होतं.

तो झोपाळू स्वरात म्हणाला,

''राहीना ! झोप आता.''

थोड्याच वेळात दोघांचे तालबद्ध घोरणे ऐकू येऊ लागले.

सरदेई पुन्हा जगुनीला हलवू लागली. एक जांभई देऊन उठून बसत तो म्हणाला,

''आज झोपू देणार आहेस की नाहीस ?''

बाहेर निर्जन रात्री वादळ गर्जतच होतं. सरदेई हळूच म्हणाली, ''शू: ! हळू बोल आणि जरा घोड्यांच्या तिथवर चल. पण आवाज न करता हं. त्या मेल्या पाइकांना सुगावा लागता नये.''

जगुनीला काही कळले नाही पण तो सरदेईबरोबर निघाला.

# 4

कुरलबिसाच्या सिद्दलब्रह्मपूर गावचं ते मंदिर फोडताना बाण लागून तट्टावरून खाली पडून गाजी सुलतानबेग मरण पावला. त्यानंतर ते बिचारं तट्टू या सगळ्या प्रकारामुळं घाबरून शेतं, रानं पार करत जे चौखूर उधळलं ते दृश्य जर कुणी पाहिलं असतं तर त्या क्रूर परिस्थितीतही त्याला हसू आवरलं नसतं.

त्या परिसरात एक फकीरमियाँचं आणि आणखी दोन दुसऱ्यांची प्रेतं पडली होती. वैशाखातल्या वादळाने क्षणार्धात सारं उधळून लावावं त्याप्रमाणे एकंदर सगळा प्रकार इतक्या झटपट घडून आला होता की कधी काय झालं हे हिंदू प्रेक्षक आणि मंदिर फोडणारे मुसलमान कुणालाच कळलं नाही. त्यामुळे हिंदू भयभीत होऊन व मुसलमान आत्मसंरक्षणासाठी शेतात, झाडीत व वेळूच्या बनात इतस्तत: पळून गेले. नंतर कुणीतरी अफवा फैलावली की काळ्या व पांढऱ्या घोड्यांच्यावर स्वार होऊन बळिराम न् जगन्नाथ आले होते. तर कुणी म्हणत होते की खोर्धा राजा हाफिज कादर बेगलाच तीर चालवताना पाहिले होते.

मग संध्याकाळ गडद होत गेली व हीच चर्चा करत लोक घरी परतले.

मंदिरापासून ते लोक लांब गेल्यावर जवळच लपलेले मंदिर तोडणारे काही लोक चोरासारखे लपतछपत बाहेर आले. संध्याकाळच्या अंधुक प्रकाशात दधिवामनाचं ते अर्धंतुटकं मंदिर छायाकृतीसारखं दिसत होतं. कबुतरंही वळचणीला परत आली होती. वरचं नीलचक्र खाली पडलं होतं. त्याच्याकडे मंदिर तोडणाऱ्यांपैकी कुणाचंच लक्ष नव्हतं.

त्या आकृत्यांनी आवारात पडलेले फकीरमियाँ व दुसऱ्या एकाचे मुडदे भीतियुक्त श्रद्धा व भक्तीभावाने उचलले व गाजीमियाँच्या मुडद्याजवळ ठेवून दिले. नंतर काळोखातच त्यांनी देवळाजवळ एका शेवरीच्या झाडाखाली खणले. दक्षिण दिशेने क्षीण प्रकाश येत होता. खड्डे खणणारे खणतच होते. खणून झाल्यावर अगोदर गाजी सुलतानबेगचा मुडदा उचलला. कबरीत ठेवून त्यावर माती लोटली. मग दुसऱ्या दोघीत उरलेले मुडदे ठेवून त्यांवर त्यांनी माती लोटली. वर देवळाचे तुटके दगड आणून ठेवले. त्या कबरींमध्ये गाजीमियाँची कबर जरा उंच व मोठी दिसत होती.

त्या तीन ताज्या कबरींवर शेवरीचा वृक्ष आपल्या फांद्या पसरून उभा होता. त्यावर लाखो काजवे चमकत होते. त्याच्या आसपास केवडा, बांबू वगैरेंची जंगलं आणि दूरदूरपर्यंत सपाट जमीन, शेतं पसरली होती. कबरींचे काम पुरे होईस्तोवर हलके हलके कृष्णपक्षातला अष्टमीचा चंद्र दूर बांबूच्या वनाच्या वर आला होता. त्या उदास

क्षीण प्रकाशात त्या तीन कबरी एकाकी दिसत होत्या. गाजीमियाँ तर धर्मकार्यात मेल्याने शहीद झालेच होते. फकीरा मियाँ व त्याचा सोबती खास महत्त्वाचे नसल्याने शागिर्द बनले आणि त्यांच्या कबरी गाजी मियाँच्या दोहों बाजूंना खणल्या गेल्या. ते दोघेही गाजिमियाँबरोबर कधी ना कधी उठतील व अल्लामियाँ त्यांना पोटाशी धरील. दुवा मागण्यासाठी कबर खोदणाऱ्यांनी हात पसरून 'करामात्, करामात्' म्हणून शहीदांना सलाम केला; व अंधुक चांदण्यात पहाता पहाता ते दिसेनासे झाले.

गाजी सुलतान बेग हा पीर–ए–रोशनअली बुखारचा शिष्य होता. हाच अलीबुखार राजुखाँ कालापहाडबरोबर मंदिरे तोडून मशिदी बनवण्यासाठी ओडिसात आला होता. या अलीबुखारने कितीतरी मूर्ती व देवळे तोडली होती. इतिहासकार असं म्हणतात, बारवाटीच्या हल्यात कुणीतरी त्याचे मुंडके धडापासून वेगळे केले. मुंडके बारवाटीत पडले होते आणि शिरविरहित कबंध घेऊन घोडा जाजपूरला गेला. म्हणून तर कलीबुखारची कबर दोन्ही ठिकाणी आहे. बारवाटीत जिथे त्याचे मुंडके पडले होते तिथे एक कबर आहे आणि दुसरी जाजपूरची कबर तर देवीच्या मुक्तिमंडपातच आहे. एवढा कडवा द्वेष काफिरांच्या देवी देवता व मंदिरांबद्दल बाळगूनही शेवटी त्याच्या आत्म्याला त्यांच्याच दैवताच्या पायाशी शांती मिळाली होती. ही इतिहासाची क्रूर थट्टाच नव्हे तर काय ? त्याच जागेला हिंदूंनी एका पवित्र स्थलाचे रूप दिले होते. त्याकाळी मंदिर तोडणाऱ्या या पीरांच्या समाधींना मुसलमानांपेक्षा हिंदूच अधिक धूपदीप नैवद्य दाखवायचे.

अलीबुखार सारखाच गाजी सुलतान बेगही कट्टर मुसलमान होता. त्याचं रूप अक्राळविक्राळ होतं. लठ्ठ आणि ठेंगणा. तोंडावर देवीचे वण. डोळे गहिरे आणि लाल. नाक चपटे व रुंद. जाड ओठ. अंगावर काळा डगला. अस्ताव्यस्त केसांना आवरणारा पांढरा दोरा. त्यावरून ते हाजी असल्याचं कळून येई. त्यावर पांढरी टोपी...गळ्यात लालनिळ्या खड्यांच्या माळा आणि स्वारीसाठी एक तट्टू. हिजली मेदिनीपूरपासून ते पुरी खोर्धापर्यंतच्या मुसलमान सुभेदार व फौजदारांमध्ये त्याला अतिशय मान होता. पण हिंदू किल्लेदार व मंदिराच्या रक्षकांना मात्र त्याची तितकीच भीती वाटे. नायब नाजिम तकीखाँच्या दरबारात त्याचे मोठे वर्चस्व होते. त्याच्या अंगी एक अलौकिक शक्ती होती. त्याचं नाव घेताच हरवलेली वस्तू, गाय वगैरे सारं सापडत असे.

याचा प्रत्यय खुद्द तकीखाँला आला होता. एकदा त्याची हिऱ्याची अंगठी लाल बागेच्या न्हाणीघरात हरवली. दासदासी; अमीर–उमराव, मीर, बक्सी व मुत्सद्दी सगळ्यांनी खूप शोधली पण सापडेना. शोधून शोधून दमले तेव्हा कुणीतरी गाजीमियाँचं नाव घेतलं व पुढच्याच क्षणी ती अंगठी न्हाणीघरातल्या पाण्याच्या हौदात

मिळाली. चोरीच्या आरोपावरून एका भिस्त्याला सुळी चढवलं गेलं. पण या प्रसंगा-नंतर गाजी पीरचं नाव सगळीकडे प्रसिद्धी पावलं. तकीखाँ त्याला बक्षीस देणार होते पण त्यानं नको म्हटलं. तो परमार्थी होता. गुरु अली बुखारसारखंच त्याला रज्म, बज्म, आणि इबादत याशिवाय इतर काही प्रिय नव्हतं. भद्रखपासून खोर्धापर्यंत सगळीकडे तो मशिदी व इमामवाडे बांधणार होता. एकही मंदिर उरू देणार नव्हता. मगच त्याला चैन पडलं असतं. म्हणून तर दिल्ली शाहजहांबादच्या निजाम- उल्- मुल्ककडून देखील त्याला परवानगी मिळाली होती. त्याच्या मर्जीविरुद्ध जर कुणी काही काम केलं वा त्याला अडथळा आणला तर त्याला मृत्युदंडाचीच शिक्षा व्हावी – समस्त काजी-लोकांनाही ही सूचना दिलेली होती.

याच परवानगीच्या आधाराने त्याने मंदिरफोडीचे कार्य नव्या उत्साहाने सुरू केले होते. जाजपूरच्या बिरजामंदिरासमोरचा जयस्तंभ यानेच वाकडा केला होता; अन् शिखरस्थ गरूडाला थोडा धक्का लागला होता. याशिवाय तसं फारसं नुकसान देवळाचं नव्हतं झालं. दशाश्वमेध घाटावरच्या सप्तमातृकामूर्ती त्यानेच नदीत फेकून दिल्या होत्या. आणि मंदिर जमीनदोस्त केले होते. मंदिराच्या दगडांनी मशीद बांधली होती. त्याच तऱ्हेने बडदीहचा बौद्धस्तूप फुटला व त्या पहाडावर एक मशीद उठली.

शेवटी तो हे दधिवामन मंदिर पाडायला आला व स्वतःचे प्राण गमवून बसला. पण अशा पवित्र आत्म्याला कबर दिल्याशिवाय त्याचे मुसलमान भक्त कसे राहतील ? म्हणून संकटाच्या सावलीतही कबर देऊनच ते आले होते.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे सिंहल ब्रह्मपुर गावचे पंडित गोविंद तिहाडी आपल्या काटकुळ्या कमरेला नाममात्र लंगोटी लावून डाव्या हातात तांब्या घेऊन उजव्या हाताच्या चिमटीत तपकीर घेऊन ओढत प्रभूचं नामस्मरण करत प्रातर्विधीसाठी चालले होते. अकस्मात् शेवरीच्या झाडाखाली तीन दगड पाहून ते घबकले. म्हणजे ? ते लांडे प्रेत होऊन इथेच पडले होते ना ? मंदिर तोडण्याच्या वेळचे दुपारचे दृश्य त्यांच्या नजरेसमोर तरळले. बाण लागल्याने गाजिमियाँ इथेच तर घोड्यावरून खाली पडला होता. गेली कुठे ती प्रेते ? कोल्ह्याने नेली म्हणावे तर फरफटल्याचे किंवा कसलेच चिन्ह दिसत नव्हते. सेमल वृक्षाखाली तीन दगड मात्र होते. आता गोविंद तिहाडींच्या डोक्यात प्रकाश पडला. देवाच्या शापाने त्यांच्या शिळा झाल्या हो !

तिहाडींच्या शरीरातून एक वीज सळाळून गेली. आपण कशासाठी व कुठे चालले आहोत याचे त्यांना विस्मरण झाले. ते परत फिरले व गावात शिरताच ओरडून सगळ्यांना सांगत सुटले, " लवकर या रे, मेले जगन्नाथाच्या न् बळिभद्राच्या शापाने सर्व म्लेंच्छ कसे पाषाण बनलेत बघा तर."

तिहाडी मोठमोठ्याने हेच सांगत गढनायकाकडे धावत चालला होता. त्याच्या म्हणण्याचे अनेकांनी अनेक अर्थ लावले. एकजण म्हणे की, "म्लेंच्छ मंदिरावर चढले तेव्हा मंदिर अपवित्र झालं म्हणून दधिवामन शेवरीखाली येऊन बसलेत. आता तिथं नवं मंदिर बांधलं पाहिजे." कुणी म्हणालं "म्लेंच्छांनी पुन्हा मंदिरावर आक्रमण केलं आहे." आणि कुणी तिहाडीचं बोलणं नीट समजावून सांगितलं की मंदिर तोडणारे म्लेंच्छ प्रभूच्या शापाने पाषाण झाले आहेत. कुणी काय तर कुणी काय असे बोलत सर्वजण तो चमत्कार स्वतःच्या डोळ्यांनी बघायला चालले. त्यामुळे एक झालं सगळ्यांची साखरझोप उडाली. लोक घराबाहेर पडून रस्त्यावर उभे राहून खरा प्रकार जाणून घ्यायचा प्रयत्न करू लागले.

तिहाडी त्यावेळी शेवरीखालचे तीन दगड दाखवून सर्वांना सांगत होते– "पहा ते म्लेंच्छ कसे पाषाण झालेत." म्हणता म्हणता सिंहल ब्रह्मपूर व आसपासच्या पंच क्रोशीत हीच कथा व चर्चा पसरली. जगन्नाथाने पांढऱ्या घोड्यावर आणि बल-भद्राने काळ्या घोड्यावर येऊन देवळाचे रक्षण केल्याची घटना **गौण** झाली.

काही दिवसांनंतर मक्रामपूरहून एक मौलवी व काही मुसलमान भर दुपारी आले. आधी गावकऱ्यांना वाटलं की पुन्हा मंदिर तोडायलाच लोक आले वाटतं. त्यामुळे सगळेजण पळून गेले. आणि केवड्याच्या झाडीआड लपून भयभीत नजरेने त्यांना बघू लागले. पण आलेल्यांनी मंदिरात जायचे तर सोडाच पण मंदिराकडे ढुंकूनही बघितलं नाही. आणि चुपचाप त्या कबरींपाशी ते गेले. तिन्ही कबरींची रंगसफेती केली व लाल चादरींनी त्या झाकून टाकल्या. त्यावर पांढऱ्या कापडाने चंद्रकोर बनवलेली होती. पिपिलीत असाच चंद्रांकित कपडा मिळतो. हिंदू लोक तो देवाखाली अंथरतात. आता मुसलमानांनी त्याच श्रद्धेने तो कपडा कबरीवर घातला. या मागचे रहस्य त्या लप-लेल्या लोकांना समजणं कठीणच होते. त्यानंतर त्यांनी तिथे धूप उदबत्त्या लावल्या. उदबत्त्यांचा धूर निघू लागला. छोटेमियाँ मौलवी तिथे गुडघे टेकून बसले. बाहू पसरले, पुन्हा उठले, पुन्हा बसले...त्यांचे अनुकरण बाकीच्या सगळ्यांनी केले. नमाज पढला. मग ते आले तसे शांतपणे मैदान, शेतं ओलांडून मक्रामपूरकडे निघून गेले.

झाडाझुडुपांआडून छपून हा सगळा प्रकार बघणारे गावकरी मुल्लामौलवी निघून गेल्यावर हळूहळू त्या कबरींपाशी आले; आणि त्या सर्वांनी त्या कबरींना नमस्कार केला. काहींनी त्या दगडांना शेंदराचे टिळेही लावले. पण एकंदरीने त्यांना या सगळ्या प्रकाराचे कोडेच पडले होते.

नंतर पुढे पुष्कळ दिवसांनी दूरगावच्या एका मुसलमानाने येऊन त्या कबरींपुढे उदबत्ती लावली व दुवा मागितला. तेव्हा कुठे त्यांच्या डोक्यात प्रकाश पडला की

त्यातला मोठा दगड म्हणजे गाजीसाहेब पीर आहे. व त्याला नवस केला तर हरवलेली वस्तू परत मिळते. जो मुसलमान तिथे दुवा मागायला आला होता त्याच्या मुलीचा चांदीच्या पदकांचा हार खळ्यात हरवला होता. गाजीसाहेब पीराला नवस बोलल्याबरोबर तो मिळाला होता. म्हणून तो दुवा मागायला आला होता.

आता तो दगड सिंहल–ब्रह्मपूर आणि आजूबाजूच्या गावात सगळीकडे गाजीसा पीर नावाने प्रसिद्ध आहे; आणि जो जो दधिवामनाच्या दर्शनाला येतो तो तो पीराचं दर्शन हटकून घेतोच.

तिकडे दधिवामन मंदिराच्या आवाराच्या प्राचीरांच्या अभय शीतल छायेत गाजीसा पीराच्या कबरीच्या अवतीभवती हिंदू–मुसलमान संस्कृती समन्वयासारखी लालपिवळी, निळी, गुलाबी फुलं फुलायला लागली अन् त्याच वेळी इकडे लालबागेच्या किल्ल्यात खोर्धा व श्री पुरुषोत्तमक्षेत्रावरच्या हल्ल्याचे बेत शिजायला लागले; त्याला महतावीस, काजी, खोजा, बक्सी, अमीर उमराव यांचाही पाठिंबा होता. संस्कृतीसमन्वय असा राजकारणाच्या क्षेत्रातही होता. गाजीमियाँसारखा पीर पैगंबर सिंहल ब्रह्मपूरसारख्या मामुली गावात मारला जावा याची त्या लोकांनाही – ते हिंदू असले तरी – फार म्हणजे फार चीड आली होती.

त्याच वेळी नायब–नाजिम तकीखांचे सासरे सुजाखाँच्या हुकुमाने पटना–अझिमाबादवर सैन्य चालून गेले होते. कारण तिथे सुजाखाँच्या मर्जीतल्या अलिवर्दीखांच्या विरुद्ध अफगाण बंड करून उठले होते. सरदार अलिवर्दीखां सुजाखाँच्या निष्ठावान सरदारांपैकी एक. तेव्हा सुजाखाँने आपला जावई तकीखां यालाही त्याच्या मदतीला जायला फर्माविले. त्याच्या गैरहजरीत तत्वत: बंधुराज्य असलेल्या खोर्धावर चालून जाण्याची धिटाई कुणी करावी ? म्हणून सगळे हात जोडून तो परतण्याची वाट बघत बसले होते.

इकडे गाजीपीरचे अपभ्रंशित नाव गांजासा जवळजवळ रूढ व्हायला लागले होते म्हणा ना ! त्याचे असे झाले –

गाजीसाहेब धर्मांतरित मुसलमान. तेव्हा दारू वगैरे न पिण्याच्या कुराण–शरीफाच्या आज्ञा तो अत्यंत कट्टरतेने पाळे. पण गांजा, अफीम या हिंदू फकीरांना प्रिय असलेल्या नशांचे त्याला तसे वावडे नव्हते. त्या दिवशी असाच एक मुसलमान आला होता. त्याच्या काही बहुमूल्य वस्तू हरवल्या होत्या आणि गाजीसाला नवस बोलल्यावर त्या सापडल्या होत्या. म्हणून तो शिरणी प्रसादभोग चढवायला सिंहल ब्रह्मपुरला आला होता. त्याच्या पूजाअर्चेत एक–दोन हिंदूही सामील झाले होते.

त्या दिवशी हंसुआ गावचे नरि पलेई, बंधु राऊन इत्यादी भक्त देखील हजर होते. गाजीसाला शिरणीचा नैवेद्य दाखवला जाऊ लागला तेव्हा त्यांना अतिशय आशा वाटू लागली. शिरणीपासून गांजापर्यंत पोचायला किती काळ लागला असता कुणास ठाऊक. पण अचानक घडलेल्या त्या घटनेमुळे सारे झटपट झाले. नरिपलेईचा म्हातारा बैल कुठेतरी हरवला. तो येस्तंवर सगळ्यांना उपास. कारण बैल जरी झाला तरी गोमातेचाच पुत्र की नाही. तो परतेस्तंवर स्वयंपाकघरच बंद. तेव्हा घरातली लहानथोर मंडळी त्याला शोधायला गेली. संध्याकाळपर्यंत तो सापडेना तेव्हा नरीने गाजीसाचे नाव घेतले, नवस केला अन् पलीकडच्या केवड्याच्या झुडुपाआड बैल चरताना आढळला. पण त्याने आपल्या गोठ्याकडे जी पाठ फिरवली होती ती काही केल्या परतायला तयार होईना. शेवटी फरफटवत चौघा–पाच जणांनी घेऊन जायचे ठरले. वृषभराजाला बहुधा या बेताचा वास लागला असावा कारण लगेच कान झाडून तो उठून उभा राहिला व सावकाश घराच्या दिशेने चालू लागला. नंतरच्या गुरुवारी पलेई मोठ्या थाटामाटाने गाजीपीराची पूजा बांधायला आला तेव्हा उदबत्तीच्या धुरात गांजाचा धूर मिसळला. त्याच दिवसापासून हळूहळू गाजीसा पीरही गांजासा पीर बनला. नवस फेडणाऱ्यांत हिंदूंची गर्दीही वाढली. सारखं काहीतरी कुणाचं तरी हरवे. मग पीराच्या कृपेने सापडे; की गांजा पिऊन उत्सव सुरू. पण मुसलमान यामुळे नाराज व्हायचे. ते म्हणायचे गांजा प्यायला हरकत नाही पण लांब जाऊन प्या. याच सुमाराला अच्युतानंद गोसाव्याचं 'तुर्की भजे अलेफ, हिंदू भज अलख्' भजन जास्त लोकप्रिय होतं.

ह्याच वेळी खोऱ्यावर गिधाडासारखे पंख पसरून टाकलेल्या महाकाळाची मात्र कुणालाच कल्पना नव्हती.

दललता डोंगराच्या जवळ जे राऊतपडा होतं त्याला लागूनच सिहल–ब्रह्मपुर होतं. ते राऊतपडाच्या क्षेत्रमर्यादेतच येत होतं. खोऱ्याच्या चारी बाजूला व्यूहरचनेप्रमाणे किल्ले बांधून काढले होते. त्यातलाच एक राऊतपडागड होता. ज्या दिवशी गाजी बेग दधिवामन मंदिर पाडायला सिहल–ब्रह्मपुर गावी आला होता त्याच दिवशी रामचंद्रदेव दललता जंगलात शिकारीसाठी आला होता. तिकडे ही खबर मिळताच ते राऊत पडा-गढातून काही तीरंदाज पाइक घेऊन तिथे गेले होते व त्यांनी मंदिराचे कसे रक्षण केले ते सर्वांनी पाहिले होते.

त्यावेळी स्वत: बाजूला व अगदी न दिसता रहायचा महाराजांनी शिकस्तीचा प्रयत्न केला. पण ते कसे शक्य होते ? त्या दिवशी स्वत: रामचंद्रदेव आले होते व त्यांच्याच बाणामुळे गाजी मियाँ व त्याचे सोबती मारले गेले होते ही बातमी तोंडोतोंडी खोऱ्याला

व कटकला पोचली. रामचंद्रदेवांनी मात्र या वृत्ताचा निषेध केला होता. कलमा पढल्यावर आपल्या मनात हिंदूंच्या देवांबद्दल व मंदिरांबद्दल मुळीच आदर, पूज्यभाव राहिला. नाही असंच ते म्हणत. पण तकीखाँचा वकील लोधुमियाँ यावर विश्वास ठेवत नसे त्याला महाराजांबद्दल सहानुभूती होती. त्यांने हे वृत्त ऐकलं तेव्हा बराच वेळ तो नुसता टाळूवर हात फिरवत तोबा तोबा म्हणत बसला. तकीखाँ परत येईल तेव्हा काय म्हणेल हीच एक चिंता लोधुमियाँना पडली होती.

असल्या काळज्या डोक्यावर घेऊन रामचंद्रदेव व लोधुमियाँ दोघे खोर्ध्याच्या पत्थरगड महालात बसले होते. मधोमध बुद्धिबळ मांडून तयार होते. पण रंग भरत नव्हता. दोघेही नुसते सोंगट्या इकडून तिकडे हलवत होते. लोधुमियाँ भयभीत झाले होते की रात्री तकीखाँ कटकला येणार व गाजीमियाँच्या शहीद होण्याची बातमी त्याला कळणार न् मग.........ते ‘ मग ’ लक्षात आलं की त्याच्या अंगाचा थरकाप उडत होता. रामचंद्रदेव मात्र निश्चित होते. एकदा भविष्य काळे आहे म्हणून कळल्यावर माणसाची जी स्थितप्रज्ञ अवस्था होते तशी त्यांची मनःस्थिती झाली होती.

फार फार तर काय–किंवा तसं कशाला–नक्कीच तकीखाँ परतला की खोर्ध्यावर हल्ला करणार. ज्या दिवशी टिकाली–रघुनाथपुर खोर्ध्यापासून तोडलं तेव्हाच खोर्ध्याची नियती तकीखाँने काय ठरवली आहे याचं चित्र स्पष्ट झालं होतं. खोर्ध्याला कटक सुभ्यात सामील करायची अभिलाषा तकीखाँच्या मनात असल्याचं उघड झालं होतं. भूतकाळातही नाही का मानसिंह, केशवदास, मारु वगैरे मोंगल सेनापतींनी व खान–ए–दौरांसारख्या अनेक फौजदारांनी व नायब–नाजिमांनी असेच निष्फळ प्रयत्न केले होते. पण आता पाइकांचे ते दृढ मनोबळ नाही. वारंवार लढाया करून ते संपत आलंय. खोर्धा दुष्काळाने ग्रस्त म्हणून सेनेचा पगार द्यावा तर खजिना रिकामा. मुख्य म्हणजे खोर्धा राजाला श्रीजगन्नाथाचा सेवक मानला जात असे व प्रत्येक पाइक, किल्लेदार, मांडलिक राजा, सरदार त्याच्यावर निष्ठा ठेवून असे; तीच आता राजा म्लेंच्छ झाल्याने भंगली. उत्कलचे मनोबळ भंगले. शिवाय तिकडे राजकुमारांत सिंहासनाबद्दल भांडणे सुरू झाली. त्यामुळे हीच मुहूर्तवेळा खोर्ध्याला मोंगलांचे अंकित बनवायला योग्य एवढा समज रामचंद्रदेवाला होता. तकीखाँलाही या सगळ्याचा पत्ता होता. पण कोणत्याशा अज्ञात कारणामुळे तो खोर्ध्यावरचे आक्रमण लांबणीवर टाकत होता. मुजाखाँची राजनीतीही अशाच प्रकारची होती. त्याला माहीत होतं की खोर्ध्याराजाला बंदी करणं व खोर्ध्यावर वर्चस्व स्थापन करणं या सर्वस्वी भिन्न गोष्टी आहेत. अकबराच्या वेळेपासून खोर्ध्याला व पर्यायाने उत्कलला अफगाण शक्तीविरुद्ध संरक्षक ढाल म्हणून वापरलं जात होतं. मानसिंहापासून चालत आलेली ही सफल राजनीती मुजाखाँही चालवत आला होता.

सांप्रत बिहार व उत्तर उत्कलमध्ये जे अफगाण बळ एकत्र होऊन वाढीस लागले होते त्याला जर खोर्ध्याचे पाठबळ लाभले तर उत्कलमधून मोंगलसत्तेचे उच्चाटन होणे अटळ होते. म्हणून खोर्ध्याला चुचकारणे व जगन्नाथाच्या जवळपास न फिरकणे हे पथ्य पाळणे फार जरूर आहे. हीच ताकीद मुर्शिदाबादेहून सुजाखाँ आपल्या जावयाला तकीखाँला – वारंवार देत असे, म्हणून तर रामचंद्रदेवांचा पराजय करून त्यांना बंदी बनवून कटकला आणले तरीही त्यांच्याशी सौजन्यपूर्ण वर्तणूक करणे वा त्यांना मान देणं तकीखाँने सोडलं नाही.

पण तकीखाँला एक धार्मिक विश्वास असा होता की आता काय, रामचंद्रदेव तर हाफिज कादर बेग झालेच आहेत. तेव्हा खोर्ध्यात इस्लामी सत्ता प्रतिष्ठित झालीच पण आता इस्लामांतर्गत राज्यात गाजीमियाँसारखा पीर पैगंबर काफिराच्या बाणाने शहीद होईल असं तकीखाँच्या स्वप्नातही नव्हतं आलं. ते प्रत्यक्षात आलेलं पाहून त्याची काय प्रतिक्रिया होईल हे सांगणं कठीण होतं. याच निमित्ताने तो खोर्ध्यावर सूड घेणार व रक्तपात करणार हे तर निश्चित असल्यासारखंच होतं.

लोधुमियाँ म्हणाले, " लालबागेहून खबर आली आहे की रमजान संपतासंपता नायब नाजिम तकीखाँ कटकला परत येतील. खबर मुर्शिदाबादची आहे."

पण रामचंद्रदेव काही बोलले नाहीत. त्यांना कसलीही भीती वाटत नव्हती. ते या परिणामाला तयार होतेच, बक्सी भ्रमरवरच्या कारस्थानामुळे काही सामंत फिरले होते; तरीही बहुसंख्य किल्लेदार, पाइक अद्याप त्यांच्या पाठीशी होते. त्यांच्याशी संपर्क बांधण्याची गुप्त कारवाई त्यांनी चालवली होती. गाजीमियाँची कबर खोदली त्या दिवसापासून. आजही लोधुमियाँला माहीत नव्हते पण त्या दिवशी आठगडचे सामंत हरीचंदन जगद्देव खोर्ध्याला आले होते. जगद्देव रामचंद्रदेवाचे व्याही. धर्मांतरित झाले तरी रामचंद्रदेवाबद्दल ते पूज्य बुद्धी बाळगून होते. एकट्या त्यांच्यावरच महाराज विश्वास टाकून होते.

त्यांच्याबरोबर कुराढमल व चंपागढचे दुर्गपती आज विचारविनिमय करायला येणार होते. वेळ दवडायला अवधी नव्हता म्हणून तर लोधुमियाँला बुद्धिबळं खेळायचा आग्रह महाराज करत नव्हते. उलट तो जातो कधी त्याचीच ते वाट बघत होते.

एकाएकी हातातले प्यादे फेकून देऊन महाराज मखमली मोजडी फरफटवत आत निघून गेले. नमाजाची वेळ झाली होती. लोधुमियाँही उठले व नमाज पढायला निघून गेले.

तो गेल्यावर आतल्या दालनात आठगडचे हरिचंदन जगद्देव, कुराढमलचे पीतांबर

मंगराज व चंपागढचे शत्रुघ्न दलगंजान यांना घेऊन रामचंद्रदेव मनसुबे करू लागले. विषय अर्थातच तकीखाँचे खोर्ध्यावरचे संभाव्य आक्रमण. आणि खोर्ध्यावरचे आक्रमण म्हणजे जगन्नाथावरचे आक्रमण. म्हणून आपले व खोर्ध्यापेक्षा जगन्नाथाचे रक्षण कसे करायचे हा मुख्य प्रश्न होता. कारण टिकाली–रघुनाथपूर गेलं तेव्हापासून पूर्वीसारखे चिल्का जगन्नाथासाठी सुरक्षित राहिलं नाही. बाणपूरचा राजा हा रामचंद्रदेवाचा सासरा; पण रामचंद्रदेव धर्मांतरित झाल्यापासून महाराणी ललितादेई मुलांना घेऊन माहेरीच राहते आहे व श्वशुरगृह शत्रुगृह बनले आहे.

काळ्या पाषाणमूर्तीप्रमाणे अविचल बसून जगद्देव हाच विचार करीत होते. कपा–ळावर आठ्यांचे जाळे पसरले होते. ते आपल्या शरीराप्रमाणेच विचारांतही विशाल होते. आपले कल्ले कुरवाळत ते म्हणाले, "तकीखाँ जर पुरीवर हल्ला करणार असेल तर जगन्नाथाला हलवलाच पाहिजे; आणि उगंच मांजरी पिल्लं नाचवते तसे आज चिल्का तर उद्या आणखी कुठंतरी असला प्रकार करण्यात अर्थ नाही. हे मोंगलांचं भय संपेतो जगन्नाथाला अरण्यवास पत्करावा लागणार."

रामचंद्रदेव चिंतेच्या सुरात म्हणाले, "पण आता कुठलं अरण्य त्यांना आसरा देण्याजोगं राहिलंय ?"

जगद्देव उत्तरले, "ती काळजी नका करू. तोच दाखवील वेळ आल्यावर." पण असं म्हणताना त्यांनाच शंका वाटत होती. रत्नसिंहासन सोडून जगन्नाथ कोणत्या अरण्यात राहतील याची कल्पनाच त्यांना करवत नाही.

त्यावेळी कुराढमलचे पीतांबर मंगराज म्हणाले,

"रत्नसिंहासनाचा त्याग करून प्रभू अरण्यवासी होणार ? छे, छे, काय म्हणता हे जगद्देव आपण ?"

जगद्देवनी उत्तर केलं, "का ? यापूर्वी महारण्यातच त्यांचं घर नव्हतं का ? तेव्हा विश्वावसू शवरी नारायणाच्या रूपात त्यांची पूजा करत होता. पुन्हा एकदा जगन्नाथ आपलं शवरी नारायणाचं पूर्वरूप धारण करतील. त्यात एवढं काळजीचं काय कारण ?"

रामचंद्रदेवांच्या म्लान डोळ्यांत चैतन्य झळाळले. जगद्देवाच्या अभयवाणीने त्यांना सगळ्या चिंता कस्पटासमान वाटायला लागल्या. त्या विषयावर कदाचित आणखी चर्चा झाली असती. एवढ्यात प्रतिहारीने वर्दी दिली की बालूगावाहून कोणी एक आलाय व महाराजांना भेटू इच्छितो. कसलंतरी पत्र घेऊन आलाय कुणी सरदेईने धाडलेलं. पण महाराजांशिवाय कुणाकडेच द्यायला तयार नाही. वेडपटच दिसतोय. नाव जगुनि म्हणतो.

बाळूगाव ! सरदेई !! महाराजांना चटकन् काही समजेना. सरदेईच्या नावाशी निगडित होती चिलिका तटाच्या मालकुदा नावाच्या ओसाड वस्तीची सडक, ती जलदात्री, आश्रयदात्री, हतभागिनी आणि तिची विषादमय मूर्ती. तिथली स्मृती त्यांच्या मनात अढळ होती. पण बाळूगावची सरदेई कोण ?

जगुनीला आत सोडण्याचा हुकूम त्यांनी दिला.

थोड्याच वेळात जगुनि आला. चेहऱ्यावर भाबडेपणा, आश्चर्य. खोर्धाराजा त्याने फक्त कहाण्यांतूनच ऐकलेला. त्याला प्रत्यक्ष पाहण्याची कल्पनाही एक ठसा त्याच्या मुद्रेवर उमटवून गेली. येताना सरदेईने ताकीद दिली होती की सरदेईचं पत्र घेऊन तो रामचंद्रदेवांपाशी जात असल्याची बातमी बाहेर फुटता कामा नये.

त्याच्या कानात सोन्याच्या चुका होत्या, गळ्यात सोन्याच्या मण्यांची कंठी, हातात चांदीचे कडे. लाल धोतर व निळा कुडता घालून जगुनी आज नटला होता. आत आल्यावर नमस्कार वगैरे न करता त्याने अंगरख्यातून बांबूची नळी काढली आणि त्याच्यात काळजीपूर्वक ठेवलेलं पत्र बाहेर काढीत विचारलं, "कोण आहे खोर्ध्याचे महाराज ?"

रामचंद्रदेव उत्कंठेने म्हणाले, "कुठून आलास ? कुणी पाठवलं आहे पत्र ?"

निष्कपटपणे तो म्हणाला, "माझ्या सरदेईने. दुसऱ्या कुणी ? पण ती खोर्धा महाराजांच्याच हाती द्यायचीय. त्या दिवशी ते दोन घोडेस्वार आले होते ना, त्यांच्या-पास्नं तिनं चोरली. अं हं – ती कशाला चोरेल म्हणा ! मी तिच्याबरोबर घोड्यांच्याकडे गेलो, जिनातून ही चिठ्ठी काढली......कसलं वादळ होतं त्या दिवशी ! अरे बापरे !"

हे बोलणं रामचंद्रदेवाला कोड्यासारखंच वाटत होतं. त्यानं उठून ते पत्र जगुनीच्या हातून ओढून घेतलं.

पत्राचा आरंभ असा होता, "म्लेंच्छ हाफिज कादरचे आठवे वर्ष, तूल दि. ५...,"
रामचंद्रदेवाच्या कपाळावर आठ्यांचे जाळे पसरले आणि डोळे कठोर झाले. सगळं पत्र वाचून झाल्यावर कुठल्यातरी विचारात गढून ते समोरच्या भिंतीवरच्या ढालीवर दृष्टी खिळवून हरवून गेल्यागत बसले.

त्या दिवशी वेणु भ्रमरवरने पुरीच्या बालीसाही प्रासादातून जे पत्र महाराणी ललितादेईला लिहिलं होतं तेच हे पत्र. त्याचे दोन घोडेस्वार ते घेऊन बाणपूरच्या अडंगगडला चालले होते. त्याच्यावर वेणु भ्रमरवरचे केवळ हस्ताक्षरच नव्हे तर मोहोरही होती. चिकाकोलहून येणाऱ्या नजराण्याच्या रकमेची लूटमार इत्यादी भयानक कारस्थान पाहून रामचंद्रदेव हतबुद्ध झाले. सगळं कोडं पहाता पहाता त्यांच्या-समोर क्षणार्धात उलगडले.

त्यांना अशा तऱ्हेने विचारात पडलेले पाहून जगद्देवाने विचारले, "अशी काय पत्रात बातमी आहे भाई की एवढया चितेत पडला आहात ?"

काही न बोलता त्यांनी ते पत्रच जगद्देवांपुढे केले. पीतांबर मंगराज व शत्रुघ्न दलगंजनही उत्कंठित झाले होते. त्यांनी देखील पत्र वाचले.

पत्र वाचून एक सुस्कारा सोडत जगद्देव म्हणाले, "तरी मला कधीपासून शंका होती की हा बक्सी शकुनी आहे. आता खात्रीच पटली."

चंपागडचे शत्रुघ्न दलगंजन म्हणाले, "तो त्या दिवाण भगी भ्रमरवराचा बेटा. असाच असायचा. बिभीषण आहे बिभीषण. तर्कीखाँला दोष देण्यात काय फायदा आहे ?"

रामचंद्रदेव मोठ्याने हसले. म्हणाले, "आम्ही विचारच करीत होतो की पाइकांना महिना पगार दिला पाहिजे, शिवाय बालेश्वरमध्ये फिरंग्यांच्याकडून बंदुकाही विकत घ्यायच्यायत. पैसा कुठून आणावा ? बक्सीने वाट दाखवली याबद्दल त्याचे उपकारच मानले पाहिजेत."

रामचंद्रदेवांना या भयानक पत्राचा गर्भितार्थ समजला नाही की काय ?

आश्चर्याच्या स्वरात जगद्देवांनी विचारले, "पण ते पैसे तुम्हाला कोण द्यायला बसलं आहे ? बंदूक तर बक्सीच विकत घेईल."

राममंद्रदेव उतरले, "चीक आपल्याच माथ्यावर बसणार हे निश्चित आहे तर फणस फोडून खायला काय हरकत आहे ?" प्रश्न त्यांनी सर्वांनाच विचारला पण पाहिलं मात्र मंगराजकडे. ते काही बोलले नाहीत पण त्यांच्या ओठावर हलकीशी स्मितरेषा तरळून गेली. त्यांच्याच नव्हे......सगळ्यांच्याच.

मनातल्या मनात मात्र रामचंद्रदेव शोधत होते की ही सरदेई कोण ? त्यांना राहून राहून मालकुदा गाव आठवत होतं. पण त्यांना पाणी देणारी कल्याणी तर त्यांच्या डोळ्यांदेखत मोंगलांचा भाला लागून ठार झाली होती. ठार झाली होती की घायाळ ? काही का असेना, खोर्धाचे महाराज असूनही ते एका असहाय स्त्रीचे रक्षण खोर्ध्याच्या हद्दीत करू शकले नव्हते.

उदास नजरेने जगुनीकडे पहात त्यानी विचारले, "कोण आहे रे ही तुझी सरदेई ?"

आतापर्यंत राजवाड्याच्या भिंतीवरची चित्रं, कलाकुसर बघण्यात मग्न असलेला जगुनी म्हणाला, "कमाल आहे. सगळ्या जगाला ठाऊक आहे बालुगावच्या अतिथी-शाळेची सरदेई. आणि महाराजांना पत्ताच नाही."

रामचंद्रदेव मनातल्या वादळात बुडून बुडून शोधत होते.

"ही सरदेई कोण ?"

# पाच

## 1

पटणा–आझिमाबादचे अफगाण बंड मोडून काढून तकीखाँ रमजान संपता–संपता कटकला पोचला. मोठ्या खुशीत होता. मुर्शिदाबादेहून त्याला असत्‌गंज हा किताब, पाच हजारांची मनसबदारी व पंधरा हजार रुपये प्राप्त झाले होते.

यानंतर शावाल महिन्यांत ईद–उल्–फितरचा सण. ईदेचा चांद दिसण्याआधी दोन दिवस उत्सव सुरू करण्याची कटकची प्रथा आहे. पण पूर्ववर्ती नायब–नाजिम सुजाउद्दौला सुजाउद्दीन मुहम्मद खांच्या वेळेपासून हा उत्सव सात दिवस साजरा करण्यात येतो. यावेळी मोंगलाधीन सगळे जमीनदार, रयत, जहागीरदार नजराणे घेऊन लालबागेत येतात आणि खिलात वा बक्षिशी घेऊन उपकृत, कृतार्थ वाटून जातात. खरं तर या दिवशी नाच गाणे कुराणाला मंजूर नाही. पण रमजानच्या दिवसात ईद–उल्–अज्ञा चा उपास व देहदंड याला कट्टर इस्लाम धर्मातही मनाई आहे. तरीही कटक हवेलीत इतर उत्सवांपेक्षा हा उत्सव जास्त धामधुमीत साजरा होतो. म्हणून तर मुर्शिदाबादमधील हजार कटकटी बाजूला सारून तकीखाँ परतला होता.

पण त्याच्या मनात उत्साह नव्हता. सुजाखाँचा सख्खा मुलगा सरफराजखाँ आपले आजोबा जाफरखाँ नासिरपासून चालत आलेल्या बंगाल, बिहार, ओडिसाच्या मनसबदारीला आपल्या बापामुळेच आचवला होता; आणि म्हणून त्याचा डोळा वारंवार कटकच्या नायब–नाजिमीवर वळत होता. तसा सरफराज अतिशय सरळ आणि निष्पाप मनाचा होता. मुर्शिदाबाद दरबारात त्याला हाजी मुहम्मदसारख्या काही कारस्थानी दरबाऱ्यांनी हाताशी धरला व बंगाल–सीमेवर हल्ला करण्याची तयारी केली. त्यासाठी ओडिसाच्या अफगाणांशी तो बोलणी करत होता आणि तकीखाँला ही बातमी मुर्शिदाबादेतूनच कळली. शिवाय जलेश्वर, भद्रखहून येणाऱ्या जाणकारांकडून अफगाणांच्या वाढत्या उपद्रवांबद्दल समजत होतेच. जलेश्वर बंदरात इंग्रजांनी प्रथम करंगळी घुसवून मग हात पसरायला सुरुवात केली होती. ते मोंगल

सेनापतींनाही ऐकेनासे झाले होते. कटक हरिशपूरमध्येही त्यांचे बस्तान नीट बसले होते. बंडखोर याच जागी आश्रय घेत आणि मोंगलाच्या सुलतानीला ते कायमचे संकट होते. शिवाय बंडखोरांना बंदुका आदि शस्त्रास्त्रे ते विकत होते ते वेगळेच. या सगळ्या घटनांनी तकीखाँ त्रासून गेला होता.

अशात लालबागेत येताक्षणीच त्याला गाजीमियाँ मंदिर तोडताना काफिराच्या बाणाने शहीद झाल्याची बातमी कळली. जुल्फिकारखाँकडून तक्रार आली होती की त्यावेळी खुद्द हाफिज कादर काफराच्या बाजूने लढला होता.

सैयद जुल्फिकारखाँ मोठे सैयद होते अशातला भाग नव्हता. पण ते उलावी सैयद होते. धर्मकर्माच्या मामल्यात कटक दरबारात त्यांचा दबदबा होता.

त्याचं असं होतं, औरंगजेबानंतर दिल्लीच्या शासनव्यवस्थेत जुल्फिकारखाँ बरेच प्रभावशाली होते. दिल्लीच्या तख्तावर कोणी बसायचे कोणी नाही हे तेच ठरवत असत. उलावी सैयद असूनही शाहजहांबाद, दिल्ली आणि लाल किल्ल्यात त्यांचे वजन होते. गाजीमियाँ ज्या तऱ्हेने शहीद झाले होते ते त्यांना अवघ्या इस्लामी धर्माला –सत्तेला दिलेले आह्वान वाटत होते.

जुल्फिकारखाँ मध्यम वयाचे होते. इस्लामी धर्माचा प्रसार करायला त्यांचे बाहू व त्यांची तलवार सतत स्फुरण पावत असे. मंदिरामागून मंदिरे जमीनदोस्त करून त्याजागी मशिदी व इमामवाडे उभारण्याची त्यांची धार्मिक लालसा दिवसेंदिवस वाढत चालली होती. सगळीकडे कुराण शरीफच्या आज्ञा पाळल्या जात आहेत की नाही हे ते जातीने बघत असत.

त्यांचा धाक तकीखाँलाही होता. दिल्ली–शाहजहाँबादेपासून ते मुर्शिदाबादेपर्यंत प्रत्येक राजनैतिक दृष्टचा वजनदार माणसाशी त्यांचा उत्तम परिचय होता. त्यांच्या धर्मनिष्ठेबरोबरच त्यांच्या कठोर चेहेऱ्यानेदेखील आपल्यासाठी एक महत्त्वपूर्ण स्थान निर्माण केले होते. जुल्फिकारखाँ होते शिडशिडीत शरीरयष्टीचे, इतके हडकुळे की सबंध अंगावर ताणून चामडी बसवली असल्यागत वाटायची, गोटा केलेलं मस्तक, भुवया नसलेल्या चेहेऱ्यावरचे घारीसारखे बाकदार नाक व कठोर डोळे, त्यांत कट्टर धर्मनिष्ठा तळपत असायची.

आता ते तकीखाँसमोर उभे होते. एका हातात स्मरणी चाळवत आणि दुसरा हात ज.उमी पंखाप्रमाणे नाचवत त्यांनी बजावले की गाजी सुलतानअली बेगच्या खुनाचा बदला घेतलाच पाहिजे. खोर्धा जाळून पोळून राख झालंच पाहिजे. त्याच्यावरून गाढवाचा नांगर फिरला पाहिजे. हे जर नाही झालं तर तक्रार निजाम–उल्–मुल्क-पाशी जाईल. त्यांना हशीमखाँ, रसूलखाँ वगैरेंचा पाठिंबा आहे. बक्सीही बरोबर

आहेत. बक्सींना तर खोर्ध्यावर लवकरात लवकर हल्ला करण्याची घाई झालीय; अर्थात् कारण धार्मिक नव्हे आर्थिक आहे. परिस्थिती खालावली आहे. हल्ला झाला की लूटमार करता येते. गेली कित्येक वर्षे ती न करता आल्याने धनसंचय आटत आला आहे.

तकीखाँने सगळं ऐकून घेतलं. मग उत्तरादाखल म्हणाला की रीतीप्रमाणे या वर्षी-देखील ईद–उल्–फितरसाठी खोर्ध्याहून हाफिज कादर बेग येतीलच. तेव्हाच त्यांना कटकमध्ये गिरफदार करू म्हणजे झालं. नुकतीच आजिमाबादची मोहीम करून फौज परतली आहे, विश्रांतीची जरूर आहे तिला. तेव्हा आता लगेच खोर्ध्यावर हल्ला कसा करणार ?

ईद–उल्–फितरला दोनच दिवस राहिले होते. मुर्शिदाबादेहून तकीखाँ परतल्याचे कळल्यावर अभिनंदन करण्यासाठी राजे–महाराजे, सरदार, जहागीरदार, कटक सुभ्याचे किल्लेदार, फार काय बालेश्वर, हरीशपुर आणि गंजामचे फिरंगीदेखील नजराणे घेऊन येऊ लागले. जातेवेळी आपापल्या पदानुसार कंठा, पदक, पगडी, पोशाख असं काहीबाही घेऊन जाऊ लागले. पण प्रत्येक जण वाट पहात होता की खोर्धाराजा केव्हा येताहेत. आज येतील उद्या येतील म्हणता म्हणता अजून तरी आले नव्हते. असं का झालं त्याचा तपास लावण्यासाठी लोघुमियाँकडे एक माणूस गुप्तपणे पाठवला होता, तोही परत आला. सांगत होता की खोर्ध्यात ईदेची जोरदार तयारी चालली आहे; आणि हाफिज कादर नायब–नाजिमना भेटायला लवकरच येणार आहेत. हे कळल्यावर तकीखाँ आणि मंडळींचा जीव जरा भांड्यात पडला. पण जसजशी ईद जवळ येत चालली तसतशी हाफिज कादर येण्याची शक्यता कमी व्हायला लागली.

लालबागेच्या एका खास महालात मखमली गालीचावर रत्नजडित सिंहासन होते. त्यावर तकीखाँ अर्धोन्मीलित डोळ्यांनी बसला होता. त्या सिंहासनाचा आकार विमानासारखा दिसत होता. चारी बाजूला सोनेरी बेलबुटांचे काम केलेले खांब होते. व त्यावर रत्नामोत्यांनी मढवलेला घुमट होता. दिल्लीचं मयूरसिंहासन काही ते नव्हतं, पण बादशहा काय चैनीत बसेल मयूरसिंहासनावर अशा व इतक्या चैनीत निश्चित मनाने तकीखाँ त्यावर बसला होता. सिंहासनाच्या दोन्ही बाजूला मखमली खुर्च्या होत्या. दरबारातली अत्यंत विश्वासपात्र व खास मंडळी त्यावर बसली होती. सिंहासनाच्या मागं राहून सेवक पंखे वारत होते. समोरच्या मखमली गालिचावर सतार तंबोरे, सरोद, तबला, डग्गा वगैरे अंत:पुरातल्या दासींप्रमाणे पडले होते. आदल्या

रात्री पेटवलेले दिवे काही अजून जळत होते. तेल संपत आल्याने ते नुसते मिणमिणत होते. दिनामारच्या फिरंग्याकडून विकत घेतलेलं झुंबर छताला लोंबकळत होते. त्यातला प्रकाशही कमी होत आला होता. पडदे ओढून घेतले होते पण फटीतून बाहेरचा प्रकाश आत येत होता. त्यात इतस्तत: विखुरलेली वाद्ये चमकत होती. गेल्या रात्री नाचणारणींच्या अंबाडयातून गळलेले चमेलीचे गजरे इतस्तत: पसरले होते. फिरंग्यांकडून विकत घेतलेल्या दारूच्या लाल निळ्या रिकाम्या बाटल्या मेलेल्या शिपायांसारख्या अस्ताव्यस्त पसरलेल्या होत्या.

पण एवढं सगळं उत्सवाचं वातावरण असूनही कुणाच्या चेहऱ्यावर त्याला साजेसा हुरूप नव्हता. खोर्ध्याहून राजा रामचंद्रदेव आले असते की त्यांना कैद केल्यावर ईदेचं सार्थक झालं असतं. पण ते आलेच नाहीत. ते येणार'की नाही याचाही काही पत्ता नव्हता. जुल्फिकारखाँ वगैरे मंडळी याचाच खल करत होती; आणि हीच चिंता मसनदीवर बसल्या बसल्या तकीखाँ करत होता व करता करता बहुधा झोपी गेला होता. ईदची मुबारक द्यायला कुणी येई तेव्हा खोजा त्या व्यक्तीचे नाव हुद्दा वगैरे पुकारी. मग डोळे न उघडता तकीखाँ आपला जरीचे चढाव घातलेला पाय पुढे करी. आलेला माणूस त्या चरणाचे तीनदा चुंबन घेऊन, तीन कदम मागे जाऊन, तीनवार झुकून आदाब अर्ज करीत असे. बोटांनीच खुणावून जेव्हा तकीखाँ त्याला बसायची आज्ञा देई तेव्हा त्याची बोटं पक्ष्याच्या जखमी पंखासारखी भासत. तो आगांतुक समोर पडलेल्या एखाद्या खुर्चीवर बसला की त्याच्या आवडीचे मद्य त्याला दिलं जाई. न पिणाऱ्यांना सरबत व मेवा दिला जाई. त्याचं खाऊन पिऊन झालं की पुन्हा ती बोटं वळवळत की आता उठा. येणाऱ्या पाहुण्यांना खजिनदाराकडून त्यांच्या भेटवस्तू मिळत. त्यांपैकी जे खास लोक असत त्यांना नायब नाजिमच्या समोरच भेटी दिल्या जात.

हे सर्व चालू असतानाच खोजानं येऊन वर्दी दिली की, " पटियाचे राजा पद्नाभदेव आलेत. "

त्यांच्याबरोबर आणखी दोन लोक होते. त्यांच्या खास मर्जीतले.

लाल रेशमी कुडत्याने गळ्यापासून पायापर्यंत त्यांचे अंग झाकून टाकले होते. कमरेला जरीचा कमरपट्टा, त्यात हस्तिदंती म्यानांमध्ये सुरे लटकत होते. पायात जोडे नव्हते. पण डोक्यावर भलंमोठं पागोटं बांधलेलं होतं. त्रिकच्छ रेशमी धोतर नेसून त्यांनी त्यावर पांढऱ्या मखमलीचा जरीकाम केलेला पायघोळ अंगरखा घातला होता. डाव्या बाजूला जरीचे बंद लोंबकळत होते. गळ्यात लांबलचक सोन्याची माळ होती. गाल–मिशा, कल्ले, मेण लावून नीटनेटके केले होते. आता ते मधून मधून पांढरे झाले होते ती गोष्ट वेगळी. केस खांद्यावर रुळत होते. परिस्थिती ओळखून त्यांनी एक मुसलमानी

टोपी घातली होती. हा पोशाख काही आजकालचा नव्हता. मानसिंह, टोडरमल आदींच्या वेळेपासून त्यांच्या वाडवडिलांनी तो बनवून ठेवला होता. नायब नाजिमांच्या भेटीसाठी लालबागेत येताना तो घालून येण्याचा दैन्यग्रस्त इतिहास जणू त्याच्या जीर्णशीर्णतेत रेखांकित करून ठेवला होता.

सारंगगडची कनिष्ठ पाती म्हणजे पटिआ. अकबर–सेनापती मानसिंहाच्या कारस्था–नामुळे आणि टोडरमलाच्या बंदोबस्तामुळे राजा मुकुंददेवाचे वंशज खोर्धा सिंहासनाला कसे आचवले आणि आली, सारंगगड वगैरे किल्ले घेऊन कसे निमूट बसले होते याचा इतिहास मागेच येऊन गेला आहे. त्यामुळे बक्सी भ्रमरवरला सारंगगडची प्राप्ती झाली व त्याच्या कनिष्ठ भागाला पटिआ मिळालं. फक्त बारा गावांचं. त्यातच साईविरा परगणा–मोंगलांचा देखील होता. एवढा टीचभर मुलुख अखत्यारात असूनही पटिआचे महाराज स्वत:ला "वीरश्री गजपति गौडेश्वर कर्णाटोत्कल वर्गेश्वर वीराधि वीरवर श्री श्री श्री पद्मनाभदेव" म्हणवून घेत असत व चिठ्ठी–पत्रात स्वत:चा तसा उल्लेख करत असत.

त्यांचं खोर्ध्यावर प्रचंडच प्रेम होतं आणि तितकाच दुयडी भरून ज्येष्ठ अंश सारंग–गडाबद्दल मत्सरही वहात होता. गढी म्हणवून घेणाऱ्या, चारी बाजूला काटेरी झाडी असलेल्या आपल्या कच्च्या मातीच्या घरातल्या उंच ओटयावर बसून जेव्हा तो खोर्धा राजवंशाला अश्लील शिव्या घालत असे किंवा जहांगीराकडे पुरुषोत्तमदेवाने आपली युवराज्ञी पालखीतून कशी पाठवली वगैरे हकीगती सांगत असे तेव्हा त्याच्या खुशामत–खोरांना वाटत असे की हाच खरा खोर्धा राजसिंहासनाचा अधिकारी. पद्मनाभदेव ओरडून म्हणत, "कसला घेऊन बसलात यदुवंश? हं:! हे काय आमच्यासारखे अस्सल सूर्यवंशी क्षत्रिय आहेत? हे आहेत भोई. समजलं? गजपतींच्या गावांची देख–भाल करत होते, खनावणी करीत होते, पंचाग सांगत होते, जमाखर्च लिहीत होते. मानसिंहाच्या वेळी पुरीच्या चंदनयात्रेसमयी काही भंगेडी पंड्यांना हाताशी धरून हा भोई रमेई राऊत राजा रामचंद्रदेव बनला झालं, हे सगळे खरे पंचांग बनवणारे कुंडमुंडे आहेत झालं. खरे गजपती आली अन् सारंगगडचे अधिराज आहेत."

लगेच ऐकणारे तथास्तुचा गजर करत.

वेणु भ्रमरवरसारखीच मनीषा पद्मनाभदेवाच्या मनातही होती की विश्वासघात करून खोर्धा राजसिंहासन बळकावावं. पण तेवढं बळ नव्हतं हातांत. म्हणून सध्या ते खोर्धा–पटिआ सीमेवरची गावं एका पाठोपाठ एक आपल्या घशात घालण्याचा उद्योग करत होते.

म्हणून तर नायब–नाजिमाला ते विश्वासू वाटत होते. शिवाय पटिआ खोर्धा व

कटकच्या सीमेवर वसले होते. म्हणून राजनैतिक दृष्ट्या ते महत्त्वाचे होते. पाच वर्षांची नजराण्याची बाकी त्यांच्याकडे होती. पटिआच्या गरीब प्रजेला मारपीट करून जी काही प्राप्ती होई ती गढीच्या खर्चाला पुरेशी होत असे. त्याशिवाय पटिआचा अधिपती हा गजपती म्हणवून घेत असे. त्यासाठी त्याच्याकडे दोन म्हातारे हत्ती, काही अरबी घोडे, पालखी वाहणारे, आणि काही खासगतीचे नौकर एवढ्यांचा खर्च त्यांना भागवायचा असे. नजराण्याची रक्कम वाढतच होती. ईदेच्या निमित्ताने नायब–नाजिमाला भेटून त्या कर्जफेडीची मुदत वाढवून घेण्याचा त्यांचा उद्देश होता.

पद्मनाभदेव तकीखाँच्या चरणांचे चुंबन घेऊन कुर्निसात करून मागे सरणार तोच तकीखाँ स्वत: सिंहासनावरून उठला व पद्मनाभदेवाला आदराने स्नेहालिंगन देऊन म्हणाला, "या, या. आपले कुशल आहे ना ?"

या त्याच्या वागण्याने इतरांप्रमाणे खुद्द पद्मनाभदेवही चकित झाले. सध्या खोर्धा राजाला शह द्यायला हा निर्बुद्ध बरा आहे असे तकीखाँने अनुमान बांधले.

पद्मनाभदेव आसनावर बसताक्षणीच खोजाने त्याने आणलेल्या नजराण्याची यादी वाचायला सुरुवात केली– " . ...नबाबांना योग्य अशी तांदळाची गाडी, चार बकऱ्या, तूप एक मडकं, वगैरे वगैरे." हे सर्व सामान प्रजेला मारपीट करून वसूल केलेलं होतं. असल्या क्षुल्लक गोष्टी नजराणा म्हणून भर दरबारात नायब–नाजिमसमोर वाचताना खोजाच्या घशात वारंवार काहीतरी अडकत होते.

नजराणा पेश करून झाला. खोजाने दारूचा प्याला पुढे केला. त्याचा वास जाणवताच पद्मनाभदेव अनुनासिक स्वरात म्हणाले, " छे, छे मी याला स्पर्शही करत नाही."

काही न बोलता सेवक सरबत व मेवा घेऊन आला. त्यांचं खाणंपिणं चाललं होतं. एवढ्यात तकीखाँच्या इशाऱ्याप्रमाणे सेवक आतून बक्षिशीची थाळी घेऊन आला. त्यात एक ठाण रेशमी कपडा, बादशाही शिर्पाव व वीस नूरजहाँनी मोहरा होत्या. या वस्तू त्याने पद्मनाभदेवाला भेट दिल्या. आपण दिलेल्या वस्तूंच्या बदल्यात एवढी भारी बक्षिशी मिळेल अशी आशा पद्मनाभदेवानी मुळीच केली नव्हती. त्यांचे डोळे चमकले; व ते जिन्नस स्वत:च कवटाळावेत अशी तीव्र इच्छा त्यांना झाली. कसं तरी स्वत:ला सावरत नम्र स्वरात ते म्हणाले, " यावच्चंद्रदिवाकरौ आपलं राज्य कटक सुभ्यावर राहो."

पण या आशीर्वचनाकडे तकीखाँचे लक्षच नव्हते. तो विचार करीत होता की अजून रामचंद्रदेव कसे आले नाहीत ? म्हणजे हे तर उघड उघड बंड झाले. जसजसा वेळ जात चालला तसतशी ही शंका बळकट होत चालली.

अकस्मात् झापडीतून जागं होऊन त्याने एक हुंकार भरला आणि दरबारीजन भयचकित झाले. कारण याचा अर्थ त्याने मनात काही क्रूर विचार पक्का केला असा होता.

या सगळ्या अवधीत तकीखाँ पद्मनाभदेवाला विसरूनच गेला होता. बोटांच्या इशाऱ्याने त्याने पद्मनाभदेवाला निरोप तर देऊनच टाकला होता व आता बरोबर आणलेल्या सेवकांकरवी बक्षिसी गोळा करवून तो जायच्या तयारीने कुर्निसात करीत होता.

तकीखाँ सिंहासनावर एकदम ताठ बसला. कांचाच्या टरफलासारखी आपली लालसुर्ख नजर त्याने एकदा चारी बाजूला फिरवली व उठून अंतर्महालात चालता झाला.

दादळापूर्वीची लक्षणं होती ही. दरबारींनी एकमेकांकडे अर्थपूर्ण कटाक्ष टाकले.

लालबाग दुर्गाच्या दक्षिणेला रजियाबेगमचा महाल होता. तिथे व्हरांड्यावर उभी राहून ती काटजोडी तलावाचं निळेशार पाणी व त्यावरच्या मंद मंद लाटा बघण्यात मग्न झाली होती. व्हरांड्याच्या दाराशी एक खोजा दगडी पुतळ्यागत निश्चल उभा होता. बाहेर गुलाबाच्या बागेतून एखाद्या व्याकूळ आत्म्याच्या विव्हळण्यासारखे पक्ष्याचे क्रंदन ऐकू येत होते. भरल्या घागरीतून पाणी हिंदकळावं तसा तो आवाज थांबला की कबुतराचे गुटर्गू ऐकू येत होतं. दुरून सनईचे बागेश्रीचे सूर शांत शीतल वाऱ्यावरून तरंगत येत होते.

काठजोडीवरून आर्द्र, शीतल झुळुका येत होत्या आणि त्याच्या मधुर स्पर्शाने रजियाची सुर्मेदार नेत्रकमळे मिटायला लागली होती. एवढ्यात खोजाने पुकारले, "मुतामिन उल्मुल्क अल्लाओदौल्ला महमद तकीखाँ नासीरजंगखाँ बहादुर असद-जंग !"... ..

अशा भलत्या वेळी हा इथे का येतो आहे ? रजियाच्या अंतःकरणाचा थरकाप झाला. गेले काही दिवस रामचंद्रदेवावर झालेली तकीखाँची गैरमर्जी, खोर्धा खालसा करून पुन्हा त्याला बंदी बनवण्याचे मनसुबे वगैरे रजियाला अपरिचित नव्हते. या सगळ्या कुशंका वटवाघळासारख्या पंख झाडून तिच्या मनात उतरल्या.

एखाद्या हवा भरलेल्या फुग्यासारखा तकीखाँ मंद मंद पावलं टाकीत अंगण पार करून व्हरांड्यापाशी आला. तकीखाँला असा अचानक पाहून रजियाने भयभीत स्वरात त्याचं स्वागत केलं, "यावं जहांपनाह. आज बरी आठवण झाली या गरीब दासीची ?"

त्यानं आपली तीक्ष्ण दृष्टी तिच्या चेहऱ्यावर रोखून धरली होती. तीपासून बचाव करण्यासाठी मग रजिया गडबडीने शयनकक्षाकडे वळली. तोही तिच्या मागोमाग आला. मखमली आसनावर बसून ती पान तयार करू लागली. कोणत्या रीतीने बोलणं सुरू करावं याचा तकीखाँ विचार करत होता. महालात इकडेतिकडे हिंडत असताना लाल पाषाणाच्या स्तंभाला टांगलेल्या पोपटाच्या पिंजऱ्यापाशी थांबला.

तकीखाँला पाहून पोपट आत पंख फडफडवू लागला. पान करता करता रजिया त्याला शिकवू लागली.

" म्हण, म्हण 'जहाँपनाह' " पण आज पोपटाच्या मनातच नव्हतं. तकीखाँ तिथून उठून शुभ्र संगमरवराच्या आसनावर बसला. आणखी काही अशुभ क्षण गेले. मग अचानक स्फोट झाला, " ईद संपत आली. सगळे राजे महाराजे आले पण हाफिज-भैय्यांचं काही दर्शन घडलं नाही."

रजियाने विचार केला की आता नाटक करावं तेच योग्य. नाहीतर नसत्या हजार प्रश्नांना उत्तरं देत बसावं लागेल. तकीखाँ नसताना हाफिज कादर येत जात होते की नाही, रजियाचा व त्यांचा पत्रव्यवहार आहे, की नाही, हाफिज कादर सध्या काय करताहेत वगैरे कित्येक प्रश्नांचं उत्तर द्यावं लागेल. रजियाला वाटत होतं की कटकहून गेल्यावर हाफिज कादर तिलाही विसरून गेलेत. म्हणून या क्लेशदायक प्रश्नांपासून बचावण्यासाठी तिने मेंदीभरल्या हातांनी आपले मुख झाकून घेतले. व हुंदके द्यायला सुरुवात केली.

रजियाप्रमाणेच तकीखाँचा जन्मही हिंदू मातेच्या पोटीच झाला होता. ती सुजाखाँची अपत्ये होती. बहीण भावंडे होती. पण जेवढा तकीखाँ निष्ठुर होता तेवढीच रजिया कोमल होती. अस्सल सुन्नीपेक्षा तो धर्मांध होता, आणि कारस्थाने, कारवाया यांत सुजाखाँच्या औरस पुत्रापेक्षा सरफराजखाँपेक्षा काकणभर सरस होता. म्हणून तर आपल्या मुलाला डावलून सुजाखाँने त्याची नेमणूक आपला उत्तराधिकारी म्हणून केली होती. पण दोन्ही बहीणभावंडांच्या स्वभावात एवढा विरोध असूनही तकीखाँला रजियाबद्दल अतिशय प्रेम व श्रद्धा होती. रजिया रडायला लागली तेव्हा आश्वासक स्वरात तो म्हणाला, " रडू नकोस शहाजादी. सणाच्या दिवशीही तो बदतमीज हाफिज कादर आला नाही म्हणून तुला किती दुःख झालं असेल याची कल्पना करता येते."

रजियाने पाहिले की अभिनयाचा बरा परिणाम होतो आहे. डोळे पुसून ती गेंगाण्या स्वरात म्हणाली, " माझी गोष्ट सोडून द्या जहाँपन्हाँ, मी तर फुटक्या नशीबाचीच आहे. पण आपण उत्कलचे नायब–नाजिम, सर्वाधिकारी. आपल्या चरणाशी त्यांनी येणं जरूर नाही का ? सैन्यानिशी सेनापती पाठवून त्यांना कैद करून आणावं."

तकीखाँने एकदा तिच्याकड अर्थपूर्ण नजरेने पाहिले. हिला बिचारीला ओडिसा सुभ्याची राजनीती काय कळणार ? अफगाण बंड करतातच आहेत. सरफराजखाँची शनिदृष्टी कटकवर आहेच. ओडिसाचे राजे-महाराजे, जहागिरदार, जमीनदार यांच्याबद्दल कसलीच ग्वाही देता येत नाही. अशा वेळी खोर्ध्यावर हल्ला न करता बाबापुता करून हाफिज कादरला इकडे बोलावून घ्यावा न् मग कैद करावा......पण आमंत्रणावर विश्वास न ठेवता तो कटकला आलाच नाही तर? तसंच होईलसं वाटतं आणि सध्या तरी खोर्ध्यावर चालून जाणं शहाणपणाचं होईल असं वाटत नाही.

उघड तकीखाँ म्हणाला,

"त्याचं असं आहे रजिया, हाफिज कादर आमच्याचपैकी आमच्या नातलगातले आहेत. ईदसारख्या सणाच्या दिवशी त्यांना कैद करून आणणं योग्य वाटत नाही. शहाजादी तू पत्र लिही. तुझ्या पत्रानं जे काम होईल ते इतर कशानंही होणार नाही. त्यांचं येणं निकडीचं आहे."

इकडे पिंजऱ्यातला पोपट वारंवार कानावर पडणारं हाफिज कादरचं नाव ऐकून कावराबावरा झाला होता. हाफिज कादर जेव्हा बारवाटीत होते तेव्हा हा पोपट त्यांचा अतिशय लाडका होता. त्यांनीच त्याला "खुदा हाफिज" म्हणायला शिकवलं होतं. आताही त्यानं तोच जप चालवला होता. त्याच्याकडे बघून हसत हसत रजिया म्हणाली, "जहाँपन्हाँ, माझं पत्र म्हणजे हा पोपट. याला पाहिलं की ते कुठेही कशाही परिस्थिती असोत नक्की येतील. कुणा खोजाबरोबर याला तिकडे पाठवण्याची व्यवस्था करा."

रजिया व हाफिज कादर यांच्यातला हा प्रणयसंकेत कोणत्याही पत्रापेक्षा जास्त प्रभावी ठरेल यात तकीखाँला शंकाच नव्हती.

एकवार रजिया व तकीखाँकडे पाहून 'खुदा हाफिज' चीत्कारून पोपट पिंजऱ्यात गप्प झाला. ती दोघेही आपापल्या विचारांत चूर होऊन चूप बसली होती. सनई मंदस्वरात बागेश्वरी आळवत होती व तिला ताल म्हणून कबुतरांचे घुमणे. एरव्ही सगळीकडे शांतताच शांतता .....

## 2

अगोदर सिंहल-ब्रह्मपुर गावात गाजीमियाँ मारले गेले व लगेचच बाणपुर-सालेरी

घाटीत चिकाकोलहून येणारा नजराणा लुटला गेला; व यामुळे उत्कलभर घबराट माजली की आता काय होणार कोण जाणे!

हत्तीवर लादून नजराण्याची रक्कम घेऊन एक सरदार बरोबर पन्नास स्वार घेऊन येत होता. शहाजाहाँबाद दिल्लीहून मुर्शिदाबादेला सतत पैशाबद्दल विचारणा येत होती व त्याच प्रमाणात मुर्शिदाबाद कटकला ताकीद देत होता. अशावेळी तो नजराणा लुटला गेला म्हणजे भलतंच संकट!

आता खोर्धावरचा मोंगलाचा हल्ला चुकत नाही याबद्दल प्रत्येकाला खात्री होती. म्हणजे पुन्हा एकदा गावंच्या गावं बेचिराख होणार, लोक वणवण देशोधडीला लागणार, लूटमार, जाळपोळ यांना ऊत येणार या भयाने लोक हवालदिल झाले.

पण या सर्व पसाऱ्यात शांत निर्भयचित्त जर कुणी असेल तर राजा रामचंद्रदेव. तकीखाँचे प्रतिनिधी लोधुमियाँ व त्यांच्याबरोबरचे गदाधर मंगराज देखील चिंतातुर झाले होते की रामचंद्रदेवापुढे कोण जाणे आता काय वाढून ठेवलंय. पण खुद्द रामचंद्रदेव स्वस्थ होते.

फिरंगी दारूच्या बाटल्या उघडून ईदचा उत्सव साजरा करणं चालू होतं. मखमली गालीचावर रंगीत लोड–तक्क्यांना टेकून बसलेले रामचंद्रदेव संतुष्ट दिसत होते. त्यांच्याजवळच लोधुमियाँ व गदाधर मंगराज बसले होते. तिथंच ग्रहविप्र कुशनायक बसून रामचंद्रदेवांची जन्मपत्रिका बघण्यात मग्न होते. अनेक पोथ्या उलटचामुलटचा करून ते कटकला जाण्याचा प्रस्थानमुहूर्त शोधत होते. पण काही केल्या ती शुभघडी सापडत नव्हती.

ज्यावेळी तकीखाँ मुर्शिदाबादेहून परत आला तेव्हापासून हा मुहूर्त मिळतच नव्हता; आणि म्हणूनच केवळ रामचंद्रदेवांचे कटकला जाणे होत नव्हते. निदान लोधुमियाँना तरी याबबतीत कोणतीच शंका नव्हती. शुभघडी, मुहूर्त यावर हिंदूइतकीच मुसलमानांचीही श्रद्धा होती – किंबहुना काकणभर जास्तच. शुभ मुहूर्त मिळेतो मोंगल सेनापती लढाईदेखील सुरू करीत नसत. तोच कपिलाषष्ठीचा योग किंवा अमृतसिद्धीचा मुहूर्त मिळत नव्हता म्हणून तर रामचंद्रदेव तकीखाँला भेटायला जाऊ शकत नव्हते. या बाबतीत लोधुमियाँची खात्री झाली होती. या मागे काही कारस्थान असेल याची कल्पनादेखील त्यांना नव्हती. म्हणूनच तर त्यांनी दूताकरवी तकीखाँला तसे कळवले होते.

पण खरंच का इतक्या दिवसांत एकही मुहूर्त मिळत नव्हता? कशात दोष असेल. जन्मपत्रिकेतच किंवा आणखी कशात तरी. कदाचित लोधुमियाँच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठी असेल... असा विचार करीत आठवडाभर साजरा होणारा ईदचा उत्सव

सरत आला. पण जसजसा एक–एक दिवस जात होता तसतशी तिकडे तकीखाँची उत्कंठा वाढत होती. मनात संशयही बळावत होता.

लटलट कापणाऱ्या हातांनी लोधुमियाँ रामचंद्रदेवांच्या प्याल्यांत दारू ओतायची खटपट करत होते. पण जास्त झाल्याचा अभिनय करत रामचंद्रदेवांनी तो बाजूला केला व अडखळत्या शब्दांत ते म्हणाले,

"बस्स् झालं मियाँसाहेब. आपण घ्या, माझं मनच नाही ठिकाणावर. एवढी मोठी नजराण्याची रक्कम लुटली गेली तेव्हापासून मला चैन नाही बघा. तकीखाँ आमचे नातलग. काय म्हणत असतील आम्हाला मनात ? आमच्याच सीमेत हा प्रकार घडला ना ? एवढा मोठा सण संपत आला पण आमचं हे काळं तोंड दाखवण्याची हिंमत आमच्यात नाही."

आपलं चेंडूसारखं सुडौल शरीर हलवत लोधुमियाँ पुन्हा दारू भरायचा प्रयत्न करीत त्यांचे सांत्वन करत म्हणाले, "आपण अगदी फिकर करू नका. ज्यांनी हा खजिना लुटला ते नरकात जातील. एकदा नव्हे हजारदां, लाखदां."

खलीफा गदाधर मंगराज तक्क्यावर हात थापटत म्हणाला, "नक्कीच हुजूर. नक्कीच."

ग्रहविप्र ज्योतिषी आकडे मांडून काहीतरी गणित करत होता. तो थांबून त्या दोघांकडे आळीपाळीने बघत बसला. त्याच्याकडे एक अर्थभरा कटाक्ष टाकून रामचंद्रदेव ओरडले, "आज आठवडा होत आला. एक मुहूर्त मिळत नाही ?"

कुशनायकने पुन्हा एकदा पाटी पुसली. कापऱ्या स्वरात म्हणाला, "मी तरी काय करू ? महाराजांची रास आहे मेष. नक्षत्र भरणी, पुन्हा बुध प्रभावी... अजून दोन दिवस तरी बघायला नको. पण मी प्रयत्न करतो. आणखी थोडावेळ लागेल."

कुशनायक पुन्हा कुंडली मांडू लागले.

लोधुमियाँने अखेर त्यांचा पेला भरलाच. मग उत्साही स्वरात ते म्हणाले, "मुहूर्त मिळेल. आज नाही तर उद्या. त्याचं काय मोठंसं ? घ्या तुम्ही."

रामचंद्रदेव वरून वरून उत्सवात आकंठ बुडले होते पण आतून कोणत्याशा अशुभाची प्रतीक्षा करत होते. म्हणून हलक्या पावलांनी येऊन भीत भीत आत डोकावणाऱ्या प्रतिहारीकडे बाकी कोणाचं नाही पण त्यांचं लक्ष लगेच गेलं. ते शंकाकुल होऊन त्याच्याकडे बघू लागले.

प्रतिहारीने सांगितलं, "कटक लालबागहून एक खोजा आलाय. भेट मागतोय."

रामचंद्रदेवांच्या हृदयाचे ठोके वाढले. त्याला आत पाठवण्याचा आदेश देऊन

त्यांनी एका घोटात पुढचा प्याला रिकामा केला व डोळे मिटून ते उशीला रेलले. जणू एखादी बातमी ऐकण्याची ते कितीतरी दिवसांपासून वाट पहात बसले असावेत.

थोड्याच वेळात हातात पिंजरा घेऊन मुसलमानी वेशात एक खोजा आत आला. आणि रामचंद्रदेवांना कुर्निसात करून म्हणाला, "शहाजादी रजिया बेगमने आपल्या सेवेसाठी हा पोपट धाडलाय व आपण कटकला यावं असा निरोप दिलाय."

पोपटाला ते सर्वच वातावरण अपरिचित भासलं व त्याने पंख फडफडावून कर्कश स्वरात ओरडायला सुरुवात केली. रामचंद्रदेवांच्या खुणेनुसार खोजाने पिंजरा खाली ठेवला. लोधुमियाँ व गदाधर मंगराज नशेत चूर झालेले डोळे चोळून शहाजादीकडून आलेली ती अद्भुत भेट पहात राहिले. तिचा अर्थ काय हे तर त्यांना समजले नाहीच पण रामचंद्रदेवांनाही लगेच कळले नाही.

पोपटाने इकडे तिकडे पाहिले व त्याला रामचंद्रदेव दिसले. तो पुन्हा पुन्हा म्हणू लागला, "खुदा हाफिज, खुदा हाफिज."

ते परिचित शब्द ऐकताच रामचंद्रदेवाला बारवाटी दुर्गातले आपले कैदी जीवन आठवले. या पोपटासारखंच त्यांनाही एकदा असंच लोखंडी पिंजऱ्यात जखडून मालकुदा गावापासून बारवाटीपर्यंत आणण्यात आलं होतं.

पोपट ओरडतच होता, 'खुदा हाफिज!' लोधुमियाँ पोपटाची तारीफ करत म्हणाले,

"शहाजादी साहेबांचा पोपट भलताच शिष्टाचारसंपन्न दिसतोय."

राममंद्रदेव सरळ बसले. लोधुमियाँला म्हणाले, "कटकला खबर द्या. म्हणावं मुहूर्त मिळो न मिळो आम्ही उद्याच नायब–नाजिमना भेट द्यायला निघणार."

पिंजऱ्यात पोपट अजून 'खुदा हाफिज' म्हणतच होता.

रजियाबेगमच्या त्या आवडत्या पाखराला कुरवाळता कुरवाळता रामचंद्रदेवांनी पिंजऱ्याचे दार उघडले. पाहता पाहता पोपट भुर्रदिशी उडून गेला.

दोन्ही हात हवेत हलवत खोजा किंचाळला, "उडाला.... उडाला. शहाजादीचा पोपट उडाला."

लोधुमियाँनेही त्यात आपला सूर मिसळला. तोवर भीतरगड प्रासादाच्या बाहेर कळकांच्या काटेरी जंगलात पोपट अदृश्यही झाला होता.

जणू मद्याच्या अंमलाखाली असल्याप्रमाणे रामचंद्रदेव उगाच हसू लागले. त्यांच्या त्या अट्टाहासाच्या आवाजाने भीतरगड प्रासाद हादरला.

पण दुसरे दिवशी ते भीतरगड प्रासादात नव्हते. कटकलाही पोचले नाहीत. शहाजादीच्या पोपटाप्रमाणे तेही दऱ्याखोऱ्यांत, रानावनांत अदृश्य झाले होते.

## 3

लालबागेच्या दिवाण-ए-खास मध्ये दरबार भरला होता. तकीखाँच्या मसनदीला घेरून सेनापती, वजीर व इतर दरबारचे मानकरी बसले होते. अमीनचंद वगैरेसारखे हिंदू दरबारीही होते. बाहेर खडा पहारा होता. माशी देखील आत शिरू शकली नसती.

तकीखाँच्या नायब-नाजिमीला धोका उत्पन्न झाला होता. सिंहल-ब्रह्मपुर गावी गाजीमियाँचे दिवसाढवळ्या काफिरांकडून मारले जाणे, सालेरी घाटीत चिकाकोलच्या फौजदारावर हल्ला होऊन नजराण्याची रक्कम लुटली जाणे व या सर्वांवर कडी म्हणजे तकीखाँच्या प्रभुत्वाला डावलून खोर्धाराजा हाफिजखाँचे ईदला देखील न येणे; या सगळ्या गोष्टी जर बंगाल-बिहार व ओडिसाचा नबाब सुजाखाँपर्यंत गेल्या तर उत्कलमध्ये तकीखाँ रहातोय कशाला ? हाच दुर्बल म्हणून उत्कलमध्ये मोंगल राजसत्ता प्रभावहीन झाली आहे असा प्रचार सुजाखाँपाशी करायला मुर्शिदाबाद व दिल्लीत हितशत्रू काही कमी नव्हते.

रागाने तकीखाँ अपस्माराच्या रोग्यासारखा कापत होता. त्याचा थरकाप वाढला की कुणीतरी त्याच्या हातात मद्याचा प्याला भरून देत असे. त्यातल्या द्रव्याच्या एका घोटाने त्याच्या अंगाचा कंप थोडावेळ तरी कमी होत असे. चढेल आणि उर्मट अशा रामचंद्रदेवाला कैद करून त्याला काय शिक्षा करावी यावर तकीखाँ विचार करीत होता.

खोजा गेलाच होता. आता फक्त रामचंद्रदेव लालबागला केव्हा येताहेत याच एका प्रतीक्षेत मंडळी बसली होती. पण खोर्ध्याहून ना राजा आला ना खोजा आला. ना त्यांची काही खबर आली. लालबागचा कोतवाल जबारखान पुन्हा पुन्हा येऊन हेच सांगत होता.

अचानक दारूच्या कोठारात ठिणगी पडावी तसा तकीखाँ ओरडला, "चिकाकोलच्या सेनापतीला बोलवा."

बिचारा चिकाकोलचा फौजदार! सालेरी घाटीत त्याच्या ताब्यातला खजिना लुटला गेला, त्याच्या सैन्याची वाताहत झाली; वर या सगळ्यामुळे झालेला अपमान ! यामुळे विद्ध होऊन बरोबरच्या फौजेला चिकाकोलला परत पाठवून तो एकटाच झाल्या प्रसंगाचा जाब देण्यास लालबागेला आला होता. आल्याबरोबर त्याला कैद करण्यात आलं. बरोबरच आहे, त्याच्याच नालायकीमुळे ही लूट झाली. शिवाय मोंगलांची बेअब्रू व फटफजिती झाली ती वेगळीच. आणि खरंच लूट झाली आहे की

या बहाण्याने यानेच ती रक्कम घशात घातली आहे ? त्या काळात मोंगलांनासुद्धा एकमेकांबद्दल विश्वास वाटत नव्हता. संग्रामाची भव्य दिव्य स्वप्नं, आत्मविश्वास यांचा लोप होऊन जात असे आणि ऐनवेळी व्यक्तिगत स्वार्थाचा बुजबुजाट माजून राही. त्यात क्षमता वगैरेसारखे गुण देशोधडीला लागत. त्यामुळे प्रत्येकजण स्वतःच्या सावलीचाही विश्वास धरत नसे; मग शेजाऱ्याची तर गोष्टच दूर !

मोंगलांच्या ऱ्हासाच्या वेळी ही सगळी लक्षणे दिल्लीपासून मूर्शिदाबाद, आणि आजिमाबादेपासून कटकपर्यंत सर्वत्र प्रकट झाली होती.

तकीखाँने त्या अभागी फौजदाराकडून लूटीची समग्र हकीगत ऐकलीच नव्हती. त्याला तेवढा धीरच नव्हता तेव्हा. हातकड्या न् बेड्यांनी जखडलेल्या फौजदाराला जेव्हा तकीखाँपुढे उभं करण्यात आलं तेव्हा आपला पाय हापटून तकीखाँने ढग गडगडल्यासारख्या आवाजात विचारलं, "चिकाकोलहून निघताना तुझ्याबरोबर किती लष्कर होतं ?"

थरथर कापत फौजदार उत्तरला,

"शंभर घोडेस्वार. दोन हत्तींवर खजिना लादून आम्ही रानातून चाललो होतो. हत्तींच्या मागेपुढे घोडेस्वार होते. त्या सगळ्यांच्या मागे मी होतो."

"पुढे ?" तकीखाँने विचारले.

फौजदार म्हणाला, "शहंशहा मेहरबान, एका अल्लातालालाच माहीत लवकरात लवकर मुक्कामाला पोचावं म्हणून रस्त्यात कुठेही न थांबता आम्ही लालबागेच्या दिशेने येत होतो. आम्हाला भीती फक्त छत्रद्वार घाटीची होती. पण आम्ही सहीसलामत छत्रद्वार घाटी ओलांडली. बाणपूर पार करून सालेरी घाटीत पोचलो तेव्हा संध्यकाळ झाली होती. पण काटेरी वेळूचे दाट जंगल आणि डोंगराचा आडोसा यामुळे तिथे रात्रच झाली होती. मी घोडेस्वारांना हुकूम दिला की काही करून घाटी उतरून कुहुडगडला पोचणं भाग आहे. कारण तो सरकारांचा खास मुलुख आहे. पहाटेच्या नमाजानंतर तिथून आम्ही लगेच निघालो की पुढे खोर्धा आहे. दुसऱ्या दिवशी आम्ही कटकला पोचलो असतो."

तकीखाँचा राग अनावर झाला.

"हे काय बडबडतोयस तू ?" रागाने थरथरत तो ओरडला, "आम्ही विचारतो आहोत लूट कोणी केली ? त्यांची फौज किती होती ?"

फौजदार म्हणाला, "सालेरी घाटीत दहा पावलांवरचे काही दिवस नव्हते. आम्ही आपल्या वाटेने चाललो होतो. एकाएकी चारी बाजूंनी तीरांचा वर्षाव व्हायला

लागला आणि जहन्नुमच्या सैतानांसारख्या 'जय जगन्नाथ'च्या घोषाने जंगल दणाणून गेले. घोड्यांनी पाठीवरच्या स्वारांना इतस्ततः काटेरी जंगलात फेकून दिलं. आणि ते उधळले. मी तलवार उपसली होती पण......" एवढं म्हणून त्यानं दोन्ही हातांनी आपलं तोंड झाकून घेतलं व असहाय्य मुलासारखा तो ढळढळा रडू लागला.

तकीखाँ वसकन् ओरडला, "ठीक आहे. बायकांसारखं रडू नको."

महातासीव जुल्फिकारखाँ केव्हापासून खोर्ध्याच्या राजाविरुद्ध तकीखाँचे कान फुंकण्याच्या संधीची वाट पहात होता. तो म्हणाला,–"

"लूट करणारे 'जय जगन्नाथ' म्हणत होते हे खरं पण याला जबाबदार खोर्धाच्या राजाशिवाय एरव्ही दुसरं कोण असणार? त्या रकमेची सुरक्षितता त्यांच्यावरच निर्भर होती ना? त्यांच्याशिवाय आणखी कोण लूट करणार? आम्हाला काही हे सहन होत नाही. एकवेळ गाजीमियाँची कुर्बानी सहन करता येईल पण हे......"

तकीखाँचा राग पुन्हा उफाळला, ओरडून म्हणाला, "या हलकट हाफिज कादरचे तुकडे तुकडे करीन आणि प्रत्येक तुकड्यागणिक रकमेची एक एक पै वसूल करीन. मग खोर्धा खालसा होईल व जगन्नाथ मातीला मिळेल......".

अशा रीतीने सूडाची योजना तयार होतच होती एवढ्यात भयभीत झालेला खोजा हातात रिकामा पिंजरा घेऊन आला. त्याबरोबर दिवाण–ए–खासमधल्या सगळ्यांच्या नजरा त्याच्याकडे लागल्या. 'हाफिज कादर कुठे आहेत? केव्हा येताहेत?' हे अनुच्चारित प्रश्न प्रत्येकाच्या तोंडावर स्पष्ट दिसत होते.

खोजाने थरकापणाऱ्या स्वरात सांगून टाकले, "खोर्धा राजा कोण जाणे कुठे नाहीसे झालेत. राजवाड्यातही कुणाला माहीत नाही."

तकीखाँने रागाने विचारले,

"आणि शहाजादीचा तो पोपट?"

खोजा उत्तरला, "राजांनी पिंजऱ्याचं दार उघडलं अन् तो उडून गेला."

पण हाफिज कादरने केवळ शहाजादीचा पोपटच उडवून लावला नाही तकीखाँच्या हुकमतीचीच थट्टा केली, हे लक्षात येऊन तकीखाँ उभा राहिला व रागाने आंधळा होऊन त्याने दिवाण–ए–खासच्या काळ्या संगमरवरी खांबावर तलवारीचा जोराचा वार केला. खांब झणाणला अन् तलवार मधोमध मोडली. त्या तुटक्या तलवारीकडे तकीखाँने अशा नजरेने बघितले जसं काही ते हाफिज कादरचं मुंडकंच आहे.

रागाच्या त्या आविष्काराने सगळे दरबारी चिडीचूप झाले. एवढ्यात तकीखाँचा हुकूम निनादला, "फौजेला कूच करायला हुकूम द्या."

कटक हवेलीत एकच खळबळ उडाली. खुद्द सरकारस्वारी फौज घेऊन खोर्ध्यावर चालून जाणार ?

जेव्हा तकीखाँ परमपराक्रमी अर्धचंद्रांकित इस्लामी विजयपताका फडकावीत, गोलंदाज घोडेस्वार पायदळासहित युद्धाला निघाला होता त्याचवेळी रामचंद्रदेव खोर्धा व बाकीच्या सीमेवरच्या गहन अरण्यातील दांडिमाड पर्वताच्या एका शिखरावर बसून पौषातले उदास सृष्टीसौंदर्य निरखीत होते. सगळ्या वृक्षांची पानं झडली होती, झडत होती. एवढे पक्षी, एवढी फळफुलझाडं, एवढी शांती या भयग्रस्त पृथ्वीवर कशी नांदते कोण जाणे ? या विचाराने ते विस्मित झाले होते. वसंताची नवीन कोवळी पालवी धारण करण्याआधी वनश्रीने जणू तपोमग्न अपर्णेचे रूप धारण केले आहे. हजारोहजार वादळी पाने गिरक्या मारीत आडव्या उभ्या रेषा अवकाशात रेखत, पतनाचे संगीत गात पृथ्वीवर उतरत होती. जीवनवृक्षावरून गळून पडण्यात देखील इतका आनंद असतो ? मृत्यूदेखील एवढा मधुर असतो ? रिक्तपणातही इतकं ऐश्वर्य असतं... हा अनुभव रामचंद्रदेवाला अपूर्व असा होता. दक्षिणेचा झुळूझुळू वाहणारा वारा त्यांच्या चिंतामग्न ललाटावर हलका हात फिरवत होता. त्यांचे डोळे जड व्हायला लागले.

एवढे पक्षी... एवढे प्राणी... एकमेकापासून किती भिन्न पण तरीही स्वतंत्र. रामचंद्रदेव थोडावेळ तकीखाँचे आक्रमण, खोर्धाचे भवितव्य वगैरे सगळं विसरून गेले.

राजप्रासादातून पळून येऊन डोंगररानाचा आश्रय घेण्याची रामचंद्रदेवाची काही ही पहिलीच वेळ नव्हती. कित्येक वेळा खोर्ध्याच्या इतिहासात या प्रसंगाची पुनरावृत्ती झाली आहे. हे पलायन नव्हे, युद्धकौशल्याचाच एक भाग आहे. शिशुपालगड, धउलीगड, रथीपुरगड वगैरे दुर्गांशी लढून खोर्ध्याला पोचेतो मोगल सेना थकून जात असे. तोवर तिच्यावर खोर्धा व त्याच्या आसपास वेढा घालून बसलेले पाइक उफाळलेल्या समुद्री लाटांप्रमाणे तुटून पडत असत. त्या प्रखर हल्ल्यापुढे टिकाव धरणे पूर्वी मोंगल सेनेला कधीच शक्य झाले नव्हते, आताही तकीखाँची सेना अशीच पराभूत होऊन जाईल याची रामचंद्रदेवाना खात्री होती. विशेषत: नजराण्याची रक्कम हातात आल्यामुळे पाइकांना काही ना काही लभ्यांश झाला होता. परिणामी त्यांची शक्ती देखील परत आली होती आणि आपल्या स्वभावानुसार ते पुन्हा संघटित झाले होते. अकबर मेल्यानंतर खोर्ध्याचा मोंगल सेनेबरोबर हा असा लपंडाव चालला होता. पण तकीखाँ बरोबरचे हे उघड शत्रुत्व खोर्ध्याची शांती जशी नाहीशी करत होते तसेच जगन्नाथावरचे संकटही वाढवत होते. पुन्हा एकदा जगन्नाथ चिलिका प्रांतात वास्तव्य करणार, पुन्हा एकदा त्याला स्वरक्षणासाठी जंगलात इकडे तिकडे लपूनछपून रहावं लागणार... याच विचाराने रामचंद्रदेव वारंवार उद्विग्न होत होते.

परंतु थोडा वेळ रामचंद्रदेव तेही विसरले.

कासवाच्या पाठीसारखा खडबडीत पण वृक्षहीन पहाड; त्यापाठीमागे काटेरी कळकांचे गहन अरण्य, मध्येच शाल, निंब वगैरेचे भले मोठे वृक्ष व त्यावर लतावेलींची जाळी; त्यामुळे ते भैरवनाथाच्या साधकासारखे दिसायचे. पहाडाच्या पायथ्याशी उभे राहून जर कुणी शिखर बघू म्हणेल तर त्याला ते दिसणे शक्यच नव्हते. या पहाडाला घेरून दक्षिण, पश्चिम व पूर्व दिशांना दांडमाल पर्वतश्रेणी होती, दक्षिणेला मणिनाग पर्वत होता व पश्चिमेला खांडपडा पर्वतमाला एक दुसरीच्या गळचात गळा घालून होत्या. दुरून एखादी उभार उरोजांची सुंदर तरुणी आळसावून पहुडली आहे असा भास व्हायचा. परंतु हे दुरून. त्या पहाडावरून मात्र इथले भयंकर अरण्य स्पष्ट दिसत असे. पहाडाला कुशीत घेऊन रणनदीची एक शाखा दक्षिणेला वहात जाऊन महानदीला मिळाली होती. मधूनच नदीच्या आतवर पहाड घुसत होते व त्यावरून धबधबे कोसळायचे. त्यातूनच एक क्षीण प्रवाह वाहत गेलाय. यामुळे निसर्गतःच पहाडाचे संरक्षण होते.

दोनशे वर्षांपूर्वी पुरुषोत्तमक्षेत्रातून ज्या शून्यवादी बौद्ध संन्याशानी पलायन करून स्वतःचे प्राण वाचवले होते त्यांनी बांकीच्या या बाजूच्या पहाडात आपल्या भजन–साधनाची प्रतिष्ठापना केली होती. जेवढचा म्हणून यात गुहा आहेत त्या सगळचा आश्रयस्थळ म्हणून त्यांच्या कामी आल्या होत्या. म्हणून हा पहाड लोकांत शून्यगिरी म्हणून ओळखला जात असे. कलियुग अवतरले की शून्यदेही जगन्नाथ नीलकंदर सोडून याच शून्यगिरीवर येऊन वास्तव्य करणार अशी लोकांची खात्री होती. कारण निरंजनदास म्हणून कुणी होता त्याच्या पोथीत म्हणे हे सगळं लिहिलं होतं.

नाहीतरी हे खरंच होतं की जगन्नाथाने काही काळ शून्यगिरीवर वास्तव्य केलं होतं. खोर्धा राजा पुरुषोत्तमदेवाच्या कारकीर्दीच्या एकविसाव्या वर्षी ही घटना घडली होती. कटकच्या बाजूने जेव्हा मोंगल सेनापती मकरामखाँने खोर्ध्यावर हल्ला केला होता तेव्हा पुरीहून जगन्नाथाला पलायन करता येऊ नये म्हणून चिलिका प्रांताच्या बाजूलाही त्याने जागरूक पहारा बसवला होता. तेव्हा पुरुषोत्तमदेवांनी तिन्ही मूर्ती लपवून याच पहाडावर आणल्या होत्या. तिथे एका गुहेत आजही बलराम, सुभद्रा व जगन्नाथ यांची आसने म्हणून तीन पाषाण आहेत. दरवर्षी कार्तिकी पौर्णिमेच्या दिवशी दूरदूरहून भक्तजन या दुर्गम अरण्यात येतात व त्या शून्य आसनांची पूजा करतात. त्यादिवशी शून्यगिरीत लोकांचे जंगल फुलते. रणनदीच्या खडकाळ किनाऱ्यावर जत्रा भरते. राजा पुरुषोत्तमदेवाने प्रमुख पहारेकरीच्या रूपात आपल्या अनेक सेवकांसह

जगन्नाथाचे रक्षण करण्याकरता तिथे काही दिवस तळच ठोकला होता. मकरामखाँने खोर्ध्यावर कबजा केला व तो जसा बाणपूरच्या दिशेने सरकू लागला तसे पाठीमागून हल्ला करून पुरुषोत्तमदेवाने त्याचा पराभव केला. तेव्हापासून जगन्नाथ जरी इथं कधी आले नाहीत तरी खोर्धा राजांनी लपण्यासाठी या ठिकाणाचा वारंवार उपयोग केला होता.

रामचंद्रदेवानेही तकीखाँच्या संभाव्य आक्रमणाचा धोका लक्षात घेऊन काही सेनापती व सरदारांसह याच शून्यगिरीचा आश्रय घेतला होता. युद्धाच्या डावपेचांच्या दृष्टीने हे ठिकाण बिनतोड होते. शिवाय इतर राजे दुर्गाधिकाऱ्यांशी इथून सल्ला-मसलत करणे त्यांना सोपे होते.

विमनस्क अवस्थेत फेऱ्या घालत रामचंद्रदेव त्या शून्य गुहेजवळ आले. गुहेचे तोंड दक्षिणेला असल्याने मध्यान्हीच्या प्रकाशाने तिचा अंतर्भाग आता स्वच्छ दिसत होता. गुहेसमोर एक फणसाचे गर्द झाड होते. त्याच्या पानातून झिरपून पौषाचे मध्याह्नीचे उन्ह रांगोळी काढत होते. गुहेच्या आत तिन्ही मूर्तींची रिक्त आसनं पडली होती व गतवर्षी त्यावर वाहिलेली फुलं पानं नैवेद्य पडली होती. सबंध गुहेत वाळकी पानं फुलं पसरली होती.

रामचंद्रदेवाच्या नजरेला ती गुहा ऐश्वर्यसंपन्न भासली. एक प्रकारची शांती त्यांच्यावर सायीगत पसरली आणि त्याचे डोळे भारावले.

अचानक कुणी धक्का द्यावा तसे त्यांना स्मरण झाले. ते आता हिंदू राहिले नव्हते. या रत्नसिंहासनाजवळ त्यांना आता जागा नव्हती.

म्हणून तर आत जावंसं वाटूनही त्यांनी स्वत:ला आवरले. डोळे मिटून मनात उद्‌भवलेल्या अवर्णनीय शांतीसुखाचा अनुभव घेत ते तसेच उभे राहिले. त्यांना ना कसली याचना होती ना प्रार्थना, अंतश्चक्षूंना दिसत होतं की अंतरातलं सिंहासनही असंच रिक्त आहे. या जन्मी तरी ते पूर्ण व्हायची आशा नाही.

सगळीकडे शून्यताच शून्यता होती. आकाशात, पृथ्वीवर, पौषाच्या पानगळीतून शून्यताच झरत होती.

असे ते कितीवेळ स्वत:त हरवून उभे राहिले असते कोण जाणे! पण वाळल्या पानांचा चर्चर्र असा आवाज झाला आणि ते भानावर आले. कोणीतरी येत होतं. त्यांनी कमरेच्या तलवारीवर हात ठेवला व दबत्या पावलांनी ते जिकडून चाहूल आली होती तिकडे जाऊ लागले.

मलिपडागडचे किल्लेदार नरसिंह बिशोई धापा टाकत वर येत होते. रामचंद्रदेवांना पाहून ते म्हणाले,

" तकीखाँच्या सैन्याने शिशुपालगड ताब्यात घेतला. ते धऊलीगडाच्या दिशेने कूच करताहेत. बक्सी वेणु भ्रमरवर कोण जाणे कुठं नाहीसे झालेत. पाइकही बंड करून उठलेत.

रामचंद्रदेवांचा चेहरा कठोर झाला. रुक्ष स्वरात त्यांनी विचारले, " शिशुपालगड तर बक्सी भ्रमरवरचा. त्यांनी काहीच प्रतिकार केला नाही ?"

कपाळावरचा घाम डाव्या हाताने पुसत बिशोईंने विषण्णपणे सांगितलं, " बक्सीने व त्याच्या पाइकांनी बंड पुकारले आहे !"

मग सविस्तर हकीगत त्यांनी सांगितली ती अशी :

सुरुवातीला तकीखाँची सेना शिशुपालगडाच्या सीमेत पाऊल टाकायलाच कचरत होती. पूर्वी अतिबलाढ्य योद्धेदेखील शिशुपालगडाच्या पाइकांसमोर पराभव पावले आहेत. यांच्याच पराभवापुढे हतबल होऊन कालापहाडला लिंगराज मंदिराला हात लावता आला नव्हता. म्हणून अतिशय भेदरून जाऊनच तकीखाँचे लष्कर शिशुपाल-गडाच्या रोखाने कूच करत होते. काटेरी कळकाच्या जंगलातून त्याच्या तटाचे मधूनच दर्शन होत असे. मधूनच राजप्रासादाचे शिखर झळकत असे. पण तटावर एकही तीरंदाज गोलंदाज किंवा बंदुकधारी पाइक दिसत नव्हता. हातघाईचा प्रसंग आलाच असता तर प्रतिपक्षाचे बळ जाणून तकीखाँही कचरला असता. पण अडवायला तिथे होतेच कोण ? काळे कुत्रेसुद्धा नव्हते ! काटेरी कळकांच्या जाळ्यात गुरफटलेली शिशुपालगडाची तटबंदी तकीखाँच्या श्रमाची टर उडवत होती—न बोलता. शेजारून वहाणाऱ्या गंगेच्या पाण्यावर एकही तरंग आंदोलित होत नव्हता.

अशा संशयास्पद परिस्थितीत सेनापती हैराण झाले तर नवल नाही. त्यांना गडात शिरण्याचे साहसच होईना. मग तकीखाँने तटावर तोफा डागल्या. उंटानी तोफा वाहून आणल्या न् वाटेल तशा तोफा उडवल्या. पण शिशुपालगड होता तसाच गुपचुप राहिला होता. प्रतिकाराचा पुसटसा प्रयासही कुठे दिसून आला नव्हता.

सैन्याने गंगेच्या पाण्याने भरलेला खंदक पार केला आणि तरीही तीरंदाजांकडून अचूक शरसंधान नाही झाले. उलट शिशुपालगडाचे राजद्वार उघडेच होते. लष्कराने "अल्ला हो अकबर "चा जयध्वनी केला. व पुराच्या पाण्यासारखे ते गडभर पसरले. अरण्यातला वणवा गडामध्ये घुसला होता व सगळीकडे धूर कोंडला होता. लाकडे तडतडल्याचा आवाज येत होता. बक्सी भ्रमरवर आपल्या पाइकांना घेऊन केव्हाच गड सोडून निघून गेला होता.

एवढे सांगून बिशोई म्हणाले,

" घऊलीगड देखील पडलाच समजा. त्यानंतर रथीपूर. रथीपूरपासून हे इथंच तर खोर्धा."

स्वप्नात असल्यासारखे रामचंद्रदेव स्वत:शीच बोलावे तसे म्हणाले, " खोर्धा सर करून तकीखाँ पिपिलीवरून पुरीला जाईल."

रामचंद्रदेवाला स्वप्नातही वाटलं नव्हतं की बक्सी गड न झुंजवताच पळून जाईल. त्याची योजना दोन्ही बाजूंनी लाभदायक होती. बक्सी मेला असता तरी छान होतं, जिंकला असता तरी हरकत नव्हती. कारण जगलावाचला असता तरी तकीखाँने तहाची पहिली अट म्हणून बक्सीच्या शिराचीच मागणी केली असती. मेला असता तर खोर्ध्यामागचा खोकला सुंठीविना गेला असता. घऊलीगडही झुंजला असता. त्यानंतर रथीपूर. यांचा प्रतिकार करत असलेल्या तकीखाँला मागून हल्ला करून रामचंद्रदेवांनी चिमटीत पकडलं असतं.

पण बक्सीच्या धूर्तपणामुळे हे मनोरथ वाळूचे किल्ले ठरले. असं काही होईल याची रामचंद्रदेवाला कल्पनाच नव्हती. रामचंद्रदेवांनी निर्णय घेतला, " आता इथे थांबून फायदा नाही. खोर्ध्याला परतलंच पाहिजे. काय व्हायचं असेल ते तिथंच होईल."

जवळच पळसाच्या झाडाला त्यांनी आपला घोडा बांधून ठेवला होता तिकडे ते जाऊ लागले.

शिशुपालगडापासून कोस दोन कोस अंतरावर आग्नेय दिशेला सरदेईपूर पडतं. दया नदीच्या काठी व जगन्नाथ रस्त्यावर असल्यामुळे पुरीच्या यात्रेकरूंचे हे नेहमीचे विश्रामस्थळ असायचे. सबंध वर्षभर इथली अतिथीगृहे, धर्मशाळा उतारूंनी गजबजलेल्या असायच्या. सडकेवर तट्टू, पालखी, झालरी लावलेल्या धमण्या, रेंग्या यांची हीऽ गर्दी असायची. पण आज ते गजबजलेलं गाव पार निर्मनुष्य दिसत होते. गावकरी प्राणभयाने पळून गेले होते. सडकेवर गाईगुरं हिंडत होती. पण कोणत्यातरी अनामिक भयाने ती गवतकाडीला तोंड लावत नव्हती. नुसतीच माती हुंगत होती. काही गुरं तशीच दावणीला जखडून पडली होती. त्यांचं हंबरणं तेवढं ऐकू येत होतं. त्या निर्जन, विषण्ण चित्रावर पौषातला थंड वारा शेवटचा हात फिरवत होता.

सरदेईपूरनंतर घऊलीपूर आहे. दया नदीच्या पुराने तिथली अर्ध्याकच्च्या मातीची घरे कोसळली होती, शिवाय पुराच्या मदतीला वादळ व दारिद्र्य होतेच. काही घरे बांबूच्या एकाद्या आधाराला लटकून उभी होती; पण ती शेवटच्या घटका मोजीत असल्याप्रमाणे होती. जी घरे त्यामानाने ठीकठाक अवस्थेत होती त्यांच्या ओटद्या, पडव्या, भिंती लिपायला झाल्या होत्या. आता शेण माती काही अजून दुर्मिळ झाली नव्हती, पण वेळ नव्हता. मोंगलांच्या भयाने लोक गाव तसंच टाकून पळून गेले होते.

घऊली डोंगराच्या पायथ्याशी घऊली गाव आहे. डोंगर खडकाळ आहे; पण त्याच्या पायाशी बांबूचे घनदाट जंगल आहे. त्यातूनच एक नागमोडी पायवाट शिखरावरच्या धवलेश्वराच्या मंदिराकडे जाते.

धवलगिरीच्या दक्षिणेला अश्वत्थामा डोंगर आहे आणि दोघांच्या मध्ये अरण्य आहे. अश्वत्थामाच्या डोंगरावर सम्राट् अशोकाचे अनेक शिलालेख आहेत. पण लोकांना ते माहीत नाही, ते त्यांना भविष्यकाळाची सूचना देणारे, कुणा महात्म्यानी कोरलेले आदेश समजतात. कलियुग संपलं की लोक त्यावरची अक्षरे वाचतील – मग सत्ययुग येईल. त्या एका आशेवर लोक डोळे लावून बसले आहेत. सध्या तर घोर कलियुग आहे......कलियुग !

घऊलीगड खोर्ध्याच्या सीमेवर आहे म्हणून युद्धाच्या दृष्टीने त्याचे महत्त्व असाधारण होते. भोई रामचंद्रदेवाच्या कारकीर्दीत खोर्ध्याच्या चहूबाजूला जे दुर्ग बांधले गेले त्यातला हा एक. पक्क्या विटांनी हा बांधला होता. बांधकाम काही विशेष होते असं नव्हे. त्यात पाचशे घोडेस्वार न् दोन हजार पायदळ सामावत असे. याचा किल्लेदार होता नवघन सामंत राय. सध्या तो बक्सीच्या फुसलावणीमुळे शिशुपालगडाप्रमाणेच हा दुर्ग सोडून निघून गेला होता. नवघनबरोबरच सर्व सैनिकही निघून गेले होते.

धवलगिरी व अश्वत्थामा डोंगर यांच्यामध्ये गहन अरण्य होते. त्यात मध्यभागी धवलगिरीची इष्टदेवता महिषासुरमर्दिनीचे प्राचीन मंदिर होते. खोर्ध्याचे सगळे अधिपती विष्णूचे उपासक होते; तरीही प्रत्येक रज संक्रांतीला आणि दसऱ्याला देवीची पूजा करायला ते स्वतः येत असत. मधून मधून देवीला नरबळीही दिला जात असावा अशी भीती लोकांत होती. म्हणून तर लोक तिथे सहसा फिरकतच नसत. फक्त सरदेई-पूरचे देवीचे उपासक आणि पुजारी वगैरे जात असत. देऊळ चारी बाजूंनी वेत-कळकांच्या गर्द जंगलाने झाकलं होतं. सहसा कुणाच्या लक्षात त्याचं तिथलं अस्तित्व येत नसे.

ज्यावेळी तकीखाँ शिशुपालगडाचे लंकादहन करून आपल्या सैन्यासह धवलगिरीच्या दिशेने येत होता त्याच वेळी बक्सी तिथल्या देवीच्या मंदिरात आत्मसंरक्षणासाठी लपून बसला होता; व अभीष्ट सिद्धीसाठी देवीची पूजा करत होता. जवळच कवटीत देवीचा नंदादीप उजळला होता व त्याच्या क्षीण प्रकाशात देवी अतिशय भयंकर दिसत होती.

देवीच्या आसनाखाली असलेले यूपकाष्ट क्षीण प्रकाशात रक्तलोलुप दिसत होते. असंख्य बळी दिल्याने दांडक्यावर रक्ताची पुटे चढलेली दिसत होती. कुशासनावर बसून देवीचे तांत्रिक पुजारी गोविंद ब्रह्मचारी मंत्रपाठ करत आहुती देत होते. ते वृद्ध होते. चेहऱ्यावर तशी कांती होतीच. यज्ञज्वाळेचा प्रकाश पडून मुख अधिकच कांति-

मान दिसत होते. त्यावरच्या शिरा, हाडे स्पष्ट दिसत होती आणि ते हाडकुळच्या खापरागत दिसत होते. शुष्कचर्मावृत्त हाडकुळच्या छातीवरून बेंबीपर्यंत रूद्राक्षांची माळ रूळत होती. त्यांच्या उजव्या बाजूला तसल्याच कुशासनावर बसून बक्सी जप करत होते. दिव्याच्या क्षीण प्रकाशात त्यांचे क्षौर केलेले मस्तक, कपाळ व त्यावरच्या जाडया भुवया सर्वच निष्प्राण दिसत होते. ते अगदी निश्चल बसले होते. बीजमंत्राचा जप करताना त्यांचे मांसल ओठ हलत होते तेवढीच काय ती त्यांची जिवंतपणाची खूण !

अचानक मंदिरात सावली पडली म्हणून बक्सीने डोळे उघडले आणि गर्भागाराच्या दाराकडे पाहिले. कृष्ण नरींद्र आणि त्यांच्या मागे नवधन सामंतराय उभे होते. त्यांना पाहून बक्सी आसनावर उठले आणि उद्विग्न चित्ताने बाहेर आले. त्यांच्या आगमनाचे कारण शंकित स्वरात विचारु लागले.

कृष्ण नरींद्रने माहिती दिली की रथीपुर गडाचे पाइकदेखील सामील झाले आहेत. तिथेही तकीखाँला कुणी प्रतिकार करणार नाही. राजादेखील भीतरगड सोडून कुठे निघून गेला आहे. नवधन सामंतराय हीच तर बातमी घेऊन आलेत.

बक्सीने उल्लसित आवाजाने विचारले, "राजा भीतरगड सोडून गेले ही बातमी खरी ना ? खोर्ध्याचे पाइकही आपल्याला येऊन मिळाले काय ?"

नवधन म्हणाले, "मी पायवाटेने खोर्ध्याहून आलोय. किल्यात राजा नाही अन् खोर्ध्याच्या राजरस्त्यावर कुत्री रडताहेत."

वृत्तान्त ऐकून बक्सी खूष झाले आणि त्यांनी जयघोष केला, "जय मा भवानी" मग त्या दोघांना उद्देशून म्हणाले,

"हीच सुवर्णसंधी आहे. खोर्ध्याचे सिंहासन मोकळे आहे. जर लगेच जाऊन हस्तगत केले तर तकीखाँ आल्या आल्या त्याच्याशी कोणत्याही अटीवर तह करता येईल. मग खोर्ध्याचे सिंहासन आपलेच. राजा रामचंद्रदेव बहुधा तकीखाँच्या हातून मारला जाईल पण जरी जिवंत राहिला तरी राजसिंहासन त्याच्या हातून गेलेच म्हणा."

ही मसलत कृष्ण नरींद्र व नवधन सामंतराय दोघांनाही पसंत पडली. इथे या गिरीकंदरांत लपून बसण्यापेक्षा भीतरगडाच्या राजमहालात तकीखाँच्या स्वागताची तयारी करणे राजनीतीच्याही दृष्टीने योग्य होते.

कृष्ण नरींद्र म्हणाले, "मग आता इथं कशासाठी थांबायचे ? तकीखाँचे लष्कर एव्हाना सरदेईपुरापर्यंत आले असेल. आताच इथून खोर्ध्याला गेले पाहिजे. कोण जाणे, नंतर संधी मिळेल न मिळेल."

त्याचे शब्द संपले न संपले तोच एक मोठा आवाज झाला अन् नंदादीप ज्यावर जळत होता ती खापरी फाडकन् फुटली. जळता जळता वात शेवटपर्यंत पोचली असणार·

'पूजेत काहीतरी विघ्न आलेलं दिसतंय' – गोविंद ब्रह्मचारीने अनुमान केले. पण उघड तो काही बोलला नाही. त्याने त्याच खापराच्या एका तुकड्यावर दिवा लावला अन् तो पुन्हा पूजेत निमग्न झाला. खापर फुटल्याचा आवाज ऐकून बक्सी व त्यांच्या मागोमाग कृष्ण नरींद्र व नवघनही आत आले होते.

त्याचवेळी देवीच्या मस्तकावरून एक चाफ्याचे फूल गळाले. नवघनने ते उचलून घेतले व कपाळाला लावीत तो म्हणाला,

"देवीने प्रसन्न होऊन कौल दिला पहा. नाहीतर हे फूल असे पडलेच नसते. बक्सीना खोर्धा सिंहासनाची प्राप्ती झालीच म्हणून समजा."

बक्सीने देवीला दंडवत घातला आणि मनातल्या मनात मागणं मागितलं की मनोकामना पुरी झाली तर नरबळी देईन.

गोविंद ब्रह्मचारीने डोळे उघडले. एकदा देवीकडे व एकदा बक्सीकडे पाहिले. मग पुन्हा मंत्रोच्चारणात व आहुती देण्यात ते गढून गेले.

बक्सी व बाकी दोघेही देवीला साष्टांग दंडवत घालून बाहेर आले.

ते जेव्हा खोर्ध्याच्या भीतरगड महालात पोचले तेव्हा गड अगदी निर्मनुष्य होता. तकीखाँने तो वेळेपर्यंत धऊलीगड काबीज केला होता व त्याने रथीपूरला मुक्काम ठोकला होता. खोर्ध्याचे सगळे रस्ते उजाड होते. मोंगलांच्या भयाने लोक खडपडा, नयागड, रणपूर वगैरे जंगली भागात निघून गेले होते.

तकीखाँने जरी खोर्धा काबीज केलं तरी फक्त खार्धाचं निष्प्राण कलेवर त्याला मिळालं असतं. आत्मा अजेयच होता. भूतकाळातही या प्रसंगाची पुनरावृत्ती झाली आहे. यावेळीही तेच नाटक खेळले जाणार आहे. खोर्ध्याच्या नागरिकांना याचा सराव आहे.

बक्सी व बरोबरचे लोक किल्ला सर केल्याच्या आविर्भावात भीतरगडाच्या सिंहद्वारापाशी उतरले. काशाच्या त्या दारावर बाहेरून एक आघात करताच ते आतून उघडले. बक्सीने गरजत आत प्रवेश केल्याबरोबर कुठूनतरी अचानक येऊन रामचंद्रदेव एखाद्या भुकेल्या वाघाप्रमाणे त्यांच्यावर तुटून पडले; आणि त्यांनी हुकूम सोडला, "यांना कैद करा आणि अंधार कोठडीत टाका."

तोवर रामचंद्रदेवाचे पाइक मुंग्यांप्रमाणे येऊन त्यांना घेरून उभे होते.

इकडे धऊलीगडाचे जीर्ण तट विनाकारण जमीनदोस्त करून टाकून तकीखाँ दिमाखात रथीपुरात ठाण मांडून बसला होता. तिथे पाच हजार घोडेस्वार, दहा हजार पायदळ रहात असे. खोर्ध्याचा भीतरगड महाल हे सगळ्या राजांचे निवासस्थान होते. पण

रथीपुर खोर्ध्याचे राजनैतिक व युद्धसंबंधी बाबतींचे प्रमुख केंद्र होतें; अर्थात् खोर्ध्या-बरोबरची अखेरची लढाई तिथेच होणार हे गृहीत धरूनच तकीखाँ तिथे तयारीत बसला होता.

पण हेरांच्याकडून त्याला बातमी कळली की खोर्धा राजाचे पाइक शिशुपालगडा-प्रमाणे व धऊलीगडाप्रमाणेच रथीपूरही सोडून चालते झाले आहेत. गडावर कुत्री रडत आहेत. अर्थात् या बातमीवर तकीखाँचा तात्काळ विश्वास बसणे शक्यच नव्हते. ज्या खोर्ध्याच्या पाइकांनी मानसिंहाच्या वेळेपासून आतापर्यंत दीडएकशे वर्ष मोंगलांच्या नाकीनऊ आणले होते ते एकामागोमाग एक दुर्ग असेच सोडून जातील यावर त्याचा विश्वास कसा बसावा ? म्हणून तर रथीपूरच्या जवळ पोचल्यावर हल्ल्याच्या संभाव्यते-मुळे तो पुढे सरकत नव्हता. तिथल्या आंबराईत मुक्काम ठोकून एक दिवस झाला होता. तरीही रथीपूरच्या कोणत्याही हल्याची बातमी येत नव्हती.

रथीपूरचे तट तरीही विद्ध अभिमानाप्रमाणे अविचल उभे होते. तकीखाँच्या हुकमा-प्रमाणे गोलंदाच मोर्चे बांधून सज्ज होते. पण प्रतिकाराचे कोणतेही चिह्न दिसत नव्हते. गडात कुणी नव्हतेच; प्रतिकार करणार कोण ?

सगळ्या साधनांनिशी सज्ज होऊन गर्जत फुसांडत येणाऱ्या प्रमत्त शक्तीला गुपचुप राहिलेला विरक्त प्रतिस्पर्धी भेटला तर त्याच्याइतकी गोंधळवून टाकणारी, भेदरवणारी दुसरी कोणतीच गोष्ट नसते. रथीपूरगडाच्या निर्मनुष्य तटावर मोंगलद्रोही हाफिज कादरची आकृती जणू काही स्पष्टपणे उभी होती. तकीखाँने तट उडवण्याचा हुकूम दिला.

तोफा धडाडायला लागल्या. गडाचा उत्तरेकडचा तट धुळीला मिळाला. त्या लोटात गड थोडा वेळ अदृश्यच झाला. मग कुठे तकीखाँला पटले की खरंच गडामध्ये कुणी नाही. मग त्याने आपल्या सैन्यासह गडात प्रवेश केला.

लोधुमियाँ तिथे पोचले ते भीतरगड ओसाड आहे, राजा पळून गेला, ही बातमी सांगतच. त्यांचं म्हणणं असं पडलं की एवढे परिश्रम करून खोर्ध्याला जाणं फुकटचं होईल. म्हणून मग खोर्ध्याकडे जायच्या ऐवजी तिथेच थांबून हाफिज कादरला जिवंत किंवा मृत धरून आणायला तकीखाँने चारी दिशांना सेनापती व शिपाई रवाना केले. पण त्याचा कुठेच मागमूस लागत नव्हता. सगळी गावे ओसाड पडली होती, किल्ले निर्जन होते. रात्रीच्या अंधारात दिशाहीनपणाने भटकावे तसे भटकून ते सर्व हात हलवत परत आले.

असाच एके दिवशी तकीखाँ निष्फळ क्रोधाने खदखदत असता एका जासूदाने बातमी आणली की हाफिज कादरची स्वारी जहाँपनाहला भेटावयास आली आहे. सगळ्या

दरबारींयांना, फौजदारांना मोठेच आश्चर्य वाटले. त्यांचे डोळे एक प्रकारच्या उत्सुकतेने चमकू लागले. आता हाफिज कादरला काय शिक्षा मिळते ते बघायला, ऐकायला सगळे जण सरसावून बसले. पण हाफिज कादर स्वतःहून आलाय या बातमीवर तकीखाँचा मुळी विश्वासच बसेना.

अगदी त्याचवेळी रामचंद्रदेव किंवा हाफिज कादर मदिरेच्या नशेत तर्र होऊन लडखडत आत आले व कोणत्याही पूर्वभूमिकेशिवाय तकीखाँला गळामिठी घालून आक्रोश करू लागले.

"मी गुन्हेगार आहे. मला माफी देऊ नका जहाँपनाह. आपण माझ्या गोतातले— मोठे भाऊ माझे. पण मी आपले खूप अपराध केलेत. मला आपण सुळावरच चढवा. हो सुळावरच चढवा.

तकीखाँला काहीच समजत नव्हते. इकडे हाफिज कादरचा शोक–आक्रोश चालूच होता, "हाय रजिया बेगम, मी तर आता सुळावर चढणार. तुझी शेवटची भेटही घेता आली नाही. हाय, हाय !" रडता ओरडता हाफिज कादरने तिरक्या नजरेने तकीखाँ-कडे पाहिले. तो गोंधळला होता हे तर साफ होतेच. म्हणजे ढोंगाचा बरा परिणाम होतो आहे. त्यांनी स्वर थोडा आणखी वाढवला.

"आता वेळ कशाला लावता जहाँपनाह ? मी आपला धाकटा भाऊ, हाफिज कादर. आपल्या समोर हजर आहे. केवढी बेअदबी केली आपली ! आपल्या स्वतःच्या हाताने माझी गर्दन उडवा. मी बेअदबी केली आहे. मी अपराधी आहे."

किंकर्तव्यमूढ होऊन तकीखाँने त्यांना प्रथम एका आसनावर बसवले. म्हटले, "शू: ! जरा शुद्धीवर तर या."

बतावणीचा योग्य तो परिणाम झाला हे निश्चित कळून रामचंद्रदेवानी ढोंग तसेच चालू ठेवले. छातीवर हात मारत त्यांनी आरोळी ठोकली, "मला शुद्धही नाही न् मी बेशुद्धही नाही. जोवर जहाँपनाहचा एकही शत्रू जिवंत आहे तोवर या हाफिज कादरला शुद्ध कशी राहील ?" तकीखाँ आता मात्र वैतागला. तो रागावून म्हणाला,

"खरी गोष्ट अशी आहे हाफिज कादर, तूच माझा सगळ्यात मोठा शत्रू आहेस. मला सांग, सिंहल – ब्रह्मपूर गावी गाजी सुलतान बेगचा खून कुणी केला ?"

हाफिज कादरने नव्या जोमाने छाती पिटली व शोकावेगाने ते म्हणाले,

"हाय, हाय पीर गाजी बेगच्या कुर्बानीने स्वर्गात आणखी एका हुतात्म्याची भर पडली पण नरकातला एकही सैतान कमी झाला नाही."

या अस्पष्ट उत्तरावर नक्की काय विचारावे हे तकीखाँला समजेना. रागावून त्याने पृच्छा केली,

"चिकाकोलच्या सेनापतीला कोणी लुटलं, खरं सांग. तू जर त्यात नव्हतास तर इतके दिवस लपून का राहिलास? ईदच्या दिवशी कटकला का नाही आलास?"

याचीच नेमकी हाफिज कादर वाट बघत होते. लुटीचे नाव ऐकताच त्यांनी मोठ्या नाटकी अभिनयाने कुडत्याच्या खिशातून बक्सी वेणु भ्रमरवरने ललितादेवीला लिहिलेले पत्र काढले व तकीखाँच्या डोळ्यासमोर ते फडकवत म्हणाले:,

"खुदाबंद, जहाँपनाह, आपण आलम दुनियाचे मालक आहात. नजराण्याच्या लुटीच्या आरोपावरून आपण मला खुशाल सुळी चढवावे; पण खऱ्याखुऱ्या लुटारूलाही कठोर शिक्षा फर्मावायला विसरू नका. लूट कुणी केली, कोण शत्रू, कोण मित्र.. ......सगळं या पत्रात आहे."

बोलताना ते पत्र अशा रीतीने ते नाचवत होते की ते हस्तगत करायला तकीखाँ उतावीळ होत होता. शेवटी त्याने ते पत्र झडप घालून घेतलेच.

पण पत्र ओडिया भाषेत लिहिलेले होते. तकीखाँला कुठलं समजायला? जहागीरदार मुन्शी अमीनचंदने ओडिया लिपी व भाषेचा अभ्यास केला होता. म्हणून तर तो दरबारचा मुन्शी होता. त्याच्यासमोर ते पत्र करून तकीखाँने हुकूम केला, "याचा तर्जुमा करून आम्हाला सांगा, मुनशीजी." एक एक शब्द लावत, अडखळत मुनशींनी वाचले,

"......तोवर भागीरथीकुमारला सिंहासनावर बसवून तकीखाँशी तह करू......"

तकीखाँच्या अंगाची एकदम आग आग झाली. एखाद्या सामान्य माणसाप्रमाणे तकीखाँचे नाव त्या पत्रात लिहिले होते. ना त्याच्या पदव्या, ना 'जहाँपनाह'!

पण अमीनचंदचे इकडे लक्ष नव्हते. एक एक शब्द तो वाचतच होता,

"......तसं नाही झालं तर खोर्ध्याचे म्लेंच्छ राज्य नष्ट होणं कठीण."

रामचंद्रदेवाने कुर्निसात करून म्हटले, "यावरून आपणाला कळेल की खोर्ध्याचे इस्लामी छत भंग करायला कोणती तलवार धजली ते? पीर पैगंबर गाजी सुलतान बेगचा खून कुणी केला? नजराणा कुणी लुटला ते? खावंदांनी ओळखून घ्यावं कोण शत्रू व कोण दोस्त ते!"

तकीखाँ तात्काळ आसनावरून उठला आणि त्याने रामचंद्रदेवाला आलिंगन दिले. सद्गदित स्वरात म्हणाला,

"भय्या, माफ कर मला. मला याची काहीच कल्पना नव्हती अन् मी तुम्हाला कैद करण्याचा हुकूम दिला. एक तो अल्लाच जाणतो की माझ्या मनात तुमच्याबद्दल किती पराकोटीचे प्रेम आहे ते. मुर्शिदाबादेला मी नबाबसाहेबांना सांगितले आहे तुमची पाच

हजारांची मनसबदारी दहा हजारांची करायला. यारजंगची खिताबही तुम्हाला मिळेल योग्य वेळी. पण बक्सी कुठे आहे ? त्याचे साथीदार कुठं आहेत ?"

रामचंद्रदेव उत्तरले, "त्यांनी पाइकांना खावंदांविरुद्ध चिथावणी दिली होती. म्हणून मी त्यांना कैद केले आहे व पाइकांना हुकूम दिला आहे की कुणाही मुसलमानाचे पाक रक्त खोर्ध्याच्या मातीवर पडता कामा नये. जोवर माझ्या देहात प्राण आहे तोवर काय बिशाद मुसलमानाची तलवार आपल्या बांधवाविरुद्ध तळपेल ?"

सर्व दरबारवासीयांनी आपला आनंद प्रदर्शित केला, "वा, शाबास, शाबास !"

आपले निरपराधित्व पूर्णपणे शाबीत करता यावे म्हणून रामचंद्रदेव पुढे म्हणाले,

"म्हणून तर खोर्ध्याचा प्रत्येक किल्ला खाली झालेला आहे. भीतरगडातही आपल्याला रोखायला कुणी नाही."

आता तकीखाँचा सगळा संशय नाहीसा झाला. त्याने हुकूम दिला, "ताबडतोब बक्सी व इतर द्रोह्यांचा शिरच्छेद करून माझ्यापुढे मुंडकी हजर करा. जोवर त्यांची मुंडकी येत नाहीत तोवर इथली छावणी हलणार नाही."

तकीखाँच्या या हुकुमाची तामिली करायला रामचंद्रदेव आणखी काही विश्वासू सेनापतींसह रथीपूरहून खोर्ध्याकडे निघाले.

थोडयाच अवधीत बक्सी वेणु भ्रमरवर, दीवाण कृष्ण नरींद्र आणि त्यांच्या इतर हस्तकांचे शिरच्छेद करून ते पोत्यात घालून तकीखाँला नजर करण्यात आले. तकीखाँ खूष झाला की आता मोगल सत्ता निष्कंटक झाली. रामचंद्रदेव अशासाठी खूष झाले की जे डोळे खोर्ध्यावर दुष्ट हेतूने खिळले होते ते कायमचे मिटले.

त्यानंतर बाणपूरच्या चढाईचे बेत सुरू झाले; कारण बाणपूरही बंडखोरांचे एक प्रमुख केंद्र होते; म्हणून तिथला राजा सामंत जगन्नाथ मानसिंह याला शिक्षा ठोठावायचा तकीखाँचा विचार होता. पण रामचंद्रदेव म्हणाले की "बाणपूर तर त्यांच्याही डाव्या हाताचा मळ आहे. त्यासाठी खुद्द जहाँपनाहांनी तसदी कशाला घेतली पाहिजे ?" तेव्हा सेनापती हाशिमखाँला तिकडे रवाना करून रथीपुर गडाची छावणी हलवून तकीखाँ कटकला परतला.

खोर्ध्याने पुन्हा सुटकेचा श्वास सोडला.

# सहा

## 1

लोक हजार तोंडांनी बोलतात हेच खरे. म्हणून तर धुलियाच्या यात्रेकरूंनी एक आश्चर्यजनक 'गोष्ट देशाच्या कोनाकोपऱ्यात पसरवून टाकली होती की श्री जगन्नाथ आता मंदिरात नाही आहे. मंदिरात नाही मग गेला कुठे ? कोण म्हणे की खोर्ध्याच्या जंगलात आहे, तर कोण म्हणे रुसून ते बडदांड रस्त्यावर बसलेत. अशा अनेक अफवांचे नुसते पीक फोफावले होते. अर्थात् कुणीही स्वतःच्या डोळ्यांनी खरी गोष्ट काय आहे ते पाहिलेले नव्हते. पण रत्नसिंहासन सोडून जगन्नाथ कुठे बरं गेले असतील आणि का ? मोंगलांच्या हल्ल्याचे भय नाहीसे झाले होते. खोर्ध्याचा राजा व नबाब यांच्यात तह झाला होता. सगळीकडचे मोंगल पठाण दबून गेले होते. मग आता कशासाठी श्री जगन्नाथांनी रत्नसिंहासन सोडलं असेल ? पण त्यासाठी एक उत्तर पुरेसं असायचं की : "अरे बाबा, भक्ताची कळवळून हाक आल्यावर प्रतापशाली जगन्नाथ काय मंदिरात गुपचुप बसून रहाणार आहेत ?" यावर अर्थात्, "हरी बोल.", "हरी बोल." चा गजर होई आणि बाकी तर्कवितर्क, विचार यांना अर्थातच थारा रहात नसे.

ही रामचंद्रदेवाच्या कारकीर्दीतल्या नवव्या वर्षाच्या मेष महिन्याची घटना आहे.

दर वर्षी कुसून साहू बैलांच्या पाठीवर तांब्या पितळ काशांची भांडी लादून तळ-प्रांतातून व्यापारासाठी येतो व मिथुन महिन्यात रथयात्रेच्या वेळी त्याच बैलांवर मूग, उडीद, तांदूळ, मीठ वगैरे घेऊन परत जातो. तोच कुसून साहू सांगत आला की श्री जगन्नाथ मंदिरात नाही. आता त्याच्यावर कोण विश्वास ठेवणार म्हणा ! पण सगळी-कडून हीच बातमी कानावर यायला लागली.

म्हणून तर ज्या दिवशी यात्रेकरूंचे प्रमुख कंटमेकाप व पालिमा गोविंद महापात्र नदीच्या कवेतल्या मंगलपूर गावी आले व डोक्याला उपरणं बांधून जगन्नाथाचा अन्न-प्रसाद वाटू लागले, जगन्नाथाचे भजन गाऊ लागले तेव्हा खरी गोष्ट जाणून घेण्यासाठी लोकांच्या झुंडीच्या झुंडी गावाच्या मध्यभागी असलेल्या वडाच्या झाडाखालच्या भागवताच्या घरी लागल्या.

मंगलपूर व आसपासचा प्रदेश दरवर्षी पुराच्याखाली गडप होत, असतो. चारी बाजूला नद्या, नाले, ओढे एकमेकांच्या हातात हात व गळचात गळा घालून होते. सगळीकडे केवडयांचे जंगल, ताडवन, नारळीची उंच उंच झाडे, आमराया आणि कळकीची बेटे माजली आहेत व मधून मधून शेते दिसतात. तिथे बगळे आणि गिरक्या घेणारी फुलपाखरे दिसतात. खरं म्हणजे आता शेतांतून नांगर चाललेले दिसले पाहिजेत. पण सगळी कामे टाकून आसपासच्या गावातले लोकही मंगलपूरला आलेत. पुरुषोत्तमक्षेत्राची स्थिती जाणून घ्यायला.

गावाच्या मधोमध महापुरुषाचा वड आहे. म्हणतात की महापुरुष भजहरिदासने कैक वर्षांमागे या वडाखाली जिवंत समाधी घेतली होती. तिथे शेणामातीने लिंपलेली त्याची समाधी बांधलेली आहे आणि त्यावर भले मोठे दोन डोळे काढले आहेत; महापुरुषाच्या पादुकाही आहेत. लोकवदंता म्हणते की याच खडावा घालून भजहरिदास त्रिभुवन हिंडून येत असे. ज्या दिवशी त्यांनी इथे समाधी घेतली त्या दिवशी कुणी त्यांना जगन्नाथ मंदिराच्या बावीस पायऱ्यांवर पाहिलं तर कुणी पिपलीच्या बाजारात; कुणी बलिअंतामध्ये तर कुणी बारवाटीला. मंगलपूर गावचे म्हातारे सांगतात की समाधी घेण्याअगोदर सात दिवस ते या वडाखाली ध्यानस्थ बसले होते. अर्थात् हे सर्वसामान्य डोळयांना दिसणारे दृश्य होते. खरं तर ते त्यावेळी तीन त्रिभुवनभर भ्रमण करत होते. म्हणून समाधीपेक्षा लोक त्या खडावांनाच जास्त मानीत आले होते. मग तिथे एक पुजाऱ्याचं – म्हणजे भागवताचं घरही निर्माण झालं. वेळी अवेळी येणारे अतिथी, अभ्यागत, पुराण भागवत ऐकायला येणारी मंडळी, न्यायनिवाडा करणारे पंच, जिल्ह्याहून येणारा हिंदू अधिकारी वगैरे इथेच येत. आजचे पुरीहून आलेले पाहुणेही इथंच आले होते.

ओटीवर एक चटई पसरून कंठमेकाप व थोडचा अंतरावर गोविंद महापात्र बसले होते. डोक्यावर पागोटी होती. भगवा अंगरखा व हरिनामाचे छाप असलेली चादर त्यांनी पांघरली होती. मंगलपूर व आसपासच्या गावची प्रमुख मंडळी त्यांना घेरून बसली होती. मंडळी हात जोडून व डोळे किलकिले करून वरच्या दोघांचा प्रत्येक शब्द कर्णसंपुटात साठवायला उत्सुक हेती. बरेचजण गांजा चढवून आले होते. हरवलेलं गुरु जसं गोठयात यावं तशी चिलीम फिरफिरून कंठमेकापच्या हाती येत होती. लोक उत्कंठेनं पहात होते की ते काही बोलताहेत का ? स्वयंपाकघरात जे दोघे–चौघे जण अतिथींसाठी स्वयंपाक करत होते, उगीचच कुणाकुणाला बोलवत होते तेही मधूनच येऊन घाम पुसत क्षणभर थांबत कानोसा घेत होते.

गतवर्षी पुरीचे रस्ते उजाड पडले होते. मोंगलांचे भय होते ना ! पंचक्रोशीच्या यात्रे-

करूंशिवाय इतर कुणी फिरकलाच नव्हता. पंडचे बसून होते. **देवस्नान** पौर्णिमेपासून ते गुंडिचायात्रेपर्यंत अनेक व्रतं सण यायचे. यावेळी लोक आले तर मागच्या वर्षाची कसूर भरून निघेल. सगळ्यांनाच ही आशा वाटत होती. मोंगलांचे भय नाही, जगन्नाथ-देखील म्हणे पतितपावन झालेत; या बातम्या यात्रेकरूंच्या तोंडून ऐकल्यावर तर प्रत्येकजण पुरीला जायला अधीर झाला.

कंठमेकापने चिलमीचा एक जबरदस्त झुरका मारला. मग नाकातोंडातून हळूहळू धूर सोडत आध्यात्मिक गंभीरतेने त्याकडे बघत बोलायला सुरुवात केली :– " आम्हाला जे खरं वाटेल ते तुम्हा लोकांना वाटेल असं नाही. पण आता हे कलियुग ठेपलं. तो एक तर हातपाय जोडून फक्त प्रत्येक गोष्ट बघत बसलाय. आता तुम्हीच बघा, भक्तांचे संकट दूर व्हावे म्हणून जगन्नाथ न् बळिराम पांढऱ्या व काळ्या घोड्यां-वर स्वार होऊन कांचीच्या वेळी नव्हते का प्रत्यक्ष धावून गेले ?" लगेच सगळीकडे 'हरिबोल', 'हरिबोल'चा गजर झाला. हुलहुली नादाने (तोंडात जीभ फिरवून केलेला आवाज) वातावरण कंपायमान झालं.

चिलमीचा आणखी एक झुरका घेऊन गोविंद महापात्रने म्हटले, : " इतक्या लांबची गोष्टच कशाला ? दिव्यसिंह महाराजांनी कवी दीनकृष्णदासाला तुरुंगात टाकलं. कारण काय, तर ते म्हणत होते की फक्त कृष्णावरच कवनं करीन. तेव्हा नाही का त्यांची प्रार्थना ऐकून जगन्नाथ रोज तुरुंगात जात होते ? मग एकदा राजाने प्रभूची फुलमाळ तुरुंगात पाहिली. लगेच दासजींना त्याने मुक्त तर केलंच पण त्यांची पूजाही केली."

तोवर त्यांच्यापर्यंत चिलीम येऊन पोचली होती. पण थोडा वेळ त्यांच्या स्वरयंत्राला विश्रांती असावी म्हणून मंगलपूरचे मुखिया हरि शतपथी बोलू लागले,

" सगळ्यांत मुख्य काय असेल तर भक्ती. ती हवी. शास्त्रपुराणातही असंच सांगितलंय. ज्याचं मन मोठं असतं तेवढा ईश्वरही त्याच्या बाबतीत मोठा होतो."

आता कंठमेकापची पाळी. म्हणू लागले :

" ही सगळ्यांना माहिती असलेली गोष्ट आहे. परमेश्वराच्या प्रसादात एकदा केस सापडला. राजा इतका रागावला, म्हणाला, अरे सूपकारा, केवढा भयंकर रे तुझा अपराध. प्रसादात केस ? तुला तुरुंगातच डांबलं पाहिजे. कोण आहे रे, तिकडे ? याला टाका तुरुंगात. " सूपकाराला कैदेत टाकलं पण त्यानंतर प्रत्यक्ष परमेश्वराने राजाच्या स्वप्नात येऊन सांगितले की, 'माझ्या आचाऱ्याला मुक्त कर. नाहीतर तुझ्या नैवेद्याला स्पर्शही करणार नाही.' आता काय करणार ? खुद्द ठाकूर उपाशी रहायला लागले. शेवटी राजा स्वतः तुरुंगाच्या दाराशी गेला, आचाऱ्याची त्याने क्षमा मागितली आणि त्याला तिथून मुक्त केलं. तेव्हापासून तर ठाकुरजीला 'बालभोग' चढवतात."

पुन्हा एकदा 'हरिबोल'चा गजर झाला. आडोशाला उभं राहून बायका ऐकत होत्या. त्यांनीही हुलहुली ध्वनी केला.

कंठमेकाप मोठ्या गंभीर आध्यात्मिक मुद्रेने वर पहात सावकाश चिलीम फुंकत होते.

मेकापच्या डाव्या बाजूला मंगलपूरचे प्रतिष्ठित, धनसंपन्न पहली विश्वाल बसले होते. त्यांची साठी होऊन चुकली होती. पण शरीर अद्याप जवान होते. दरवर्षी रथयात्रेच्या वेळी पुरीला जायचा नुसता बेत करीत. पण दरवेळी काही ना काही अडचण निघे. कधी मोगलांचं भय तर कधी प्रपंचाची काही अडचण. या एकाच कारणामुळे बिचारे सदैव बेचैन असायचे. काही नाही तरी यात्रेकरूंच्या कहाण्या, वर्णनं ऐकायला नेहमी यायचे. आजही म्हणूनच ते आले होते. पण थोडे बहिरे होते. म्हणून भक्तिभावाने गद्‌गद् होऊन जर स्वर उंच झाला तर त्यांच्या कानी काही पडत होतं; नाहीतरी मधून मधून हात जोडून ते ते कपाळाला टेकून प्रणाम करीत. एरव्ही निष्प्रभ डोळ्यांनी एकटक त्यांच्याकडे पहात निश्चल मूर्तीसारखे बसत. डोकं तुळतुळीत होतं उघड्या पातेल्यासारखं व त्यावर पांढऱ्या केसांची झालर होती. पाठीमागे त्यांनी ते बांधून ठेवले होते. कानात वजनदार बाळ्या होत्या. त्यामुळे ते लोंबत होते. चेहऱ्यावर वयोमानाप्रमाणे असंख्य सुरकुत्या होत्या. हातात चांदीची वजनदार कडी होती. कपाळावर नाम गंध काही नव्हते. गळ्यात तिपदरी कंठी होती. गळ्यावर चंदनाचा छोटासा तिलक होता. पैरण उपरण्यासारखी गळ्यात टाकून ते अनिमिष नेत्रांनी कंठमेकापकडे पहात होते.

विश्वाल श्रीमंत होते. शेतीबरोबर त्यांचा थोडासा व्यापारउदीम होता. सावकारी देखील करायचे. पुरीच्या यात्रेकरूंना ते सढळ हाताने दक्षिणा देत असत. मेकापने विश्वालकडे पाहून विचारलं, "यावर्षी रथयात्रेला येणार की नाही, दादा? शास्त्र म्हणतं, पाण्यावर जसं चंद्राचं प्रतिबिंब तसं नश्वर हे आपलं शरीर. हे असेतो एकवार त्या सगुण मूर्तीचं दर्शन घडलं तर मोक्षप्राप्ती झालीच समजा. यावर्षी तर इकडून पुष्कळच लोक जायचेत. तुम्हीही का नाही चलत मुलाबाळांसहित, आजीबाईंना घेऊन?"

विश्वालला यातलं काहीच ऐकू आलं नाही. ते पूर्ववत् त्याच्याकडे स्मितमुखाने बघत राहिले. जवळच बसलेल्या एका श्रोत्याने सांगितले की मोठ्याने बोलल्याशिवाय त्यांना ऐकू येत नाही. मेकापने तेच भाषण ओरडून केले व आणखी एक श्लोक म्हटला,

" अहो तत्क्षेत्रमाहात्म्यं
गर्दभोऽपि चतुर्भुजः ।
यत्र प्रवेशमात्रेण
न कस्यापि पुनर्भवः ॥ "

पुढं म्हणाले, " असं आहे बरं श्रीक्षेत्राचं माहात्म्य. माणूस तर सोडाच गाढवदेखील चतुर्भुज होतं. " लगेच विश्वालने हात जोडून प्रणाम केला व दंतहीन बोळकं हलवत म्हणाला,

" जोवर महाप्रभू स्वतःहून नेत नाहीत तंवर जाण्याचे मनात आणून तरी काय करणार ? जाईन जाईन म्हणता आता आमची तरी वर जायचीच तयारी होत चाललीय. "

मेकापने बातमी दिली, " यावर्षी रथयात्रेला खूपच गर्दी होणार. श्वेतद्वीप, मगद्वीप, नेपाळ, काश्मीर, राढ, गौड, अवंती, अंग, बंग, काशी, वृंदावन, महाराष्ट्र, बिहार, द्वारका, मथुरा......काही विचारू नका. शिवाय जगन्नाथ पुन्हा पतितपावन झालेत. "

पुन्हा एकदा ' हरिबोल 'च्या गजराने वातावरण दणाणून गेले. तेवढ्यात लक्षात आले की हल्ली जगन्नाथ मंदिरात नाही आहे म्हणे ! अइंठू दासने अतिनम्रतेने हात जोडून विचारले, " महाराज, ऐकली ती गोष्ट खरी आहे का ?" मेकापने प्रश्नार्थी नुसत्या भुवया उंचावल्या. अइंठू दासने विचारले, " आता जगन्नाथ देवळात रहात नाही होय ?"

पालिआ गोविंद महापात्र ध्यानपूर्वक डोळे मिटून गोमुखीत माळ फिरवत नामस्मरण करीत होते. अइंठूदासच्या तोंडचे शब्द ऐकताच आकाशातून कोसळल्यासारखा आविर्भाव करत त्यांनी डोळे उघडले व तडक्न म्हटले,

" ही सगळी त्या तळहट्टीतल्या लोकांची बडबड आहे. मूर्ख आहेत अगदी ते ! अरे बाबांनो, ते साधंसुधं देऊळ नव्हे. श्रीवत्सशालामंदिर आहे. परमेश्वर जर ते सोडून गेले तर ही धरती जागेवर राहील तरी का ? उगीच आपलं देवानं तोंड दिलंय म्हणून वाटेल ते भकायचं म्हणजे काय ? परमेश्वर तर कलियुगाच्या अखेरीस रत्नवेदिका सोडून जातील."

अइंठूदास तोंडात मारल्यासारखा होऊन स्वतःच अपराध केल्यागत म्हणाला, " मी आपलं ऐकलं ते बोललो, महाराज. त्या दिवशी साआंतरापुराच्या बाजारात आमच्या नखिआमांच्या दीराला कुसून साहू म्हणत होते. "

मेकापने गळा साफ केला. म्हणाले, " जगन्नाथ तर आता पतितपावन बनून एका घुमटीत विराजमान झालेत. मंदिर सोडून कसे जातील ?"

हो, तोही एक सगळ्यांना प्रश्नच पडला होता. सगळ्यांनीच एकस्वरात विचारले,

" जगन्नाथ पतितपावन झालेत हे आम्हीही ऐकलं. पण म्हणजे काय झालं ?"

मेकाप सरसावून बसले. त्यांच्याशिवाय हा विषय उत्तम रीत्या कोण समजावू शकणार ?

म्हणाले, "एके दिवशी भगवान् छोटचा उपाध्यायांच्या स्वप्नात आले. म्हणजे आपल्या विष्णु पश्चिम कपाट महापात्रच्या – आणि म्हणाले, 'माझा परम भक्त खोर्धा राजा यवन झाला. म्हणून तो माझ्या रत्नसिंहासनाच्या नजीक येऊ शकत नाही, होय ना ? मग मीही रत्नसिंहासनावर बसणार नाही. जिथे राजा माझं दर्शन घेऊ शकेल तिथंच माझं वास्तव्य राहील." श्रोत्यांची उत्सुकता वाढली. त्यांनी विचारलं.

" मग काय झालं ?"

भक्तीच्या उमाळ्याने मेकापचे डोळे अर्धोन्मीलित झाले. ते तसेच ठेवून तो बोलू लागला,

" बाबांनो, तुम्हाला खोटं वाटेल. पण आम्हाला अगदी सूर्यप्रकाशाइतकं सत्य आहे. चैत्र शुक्ल दशमीची गोष्ट. एक प्रहर रात्र होती अजून. पण मंदिराचा दरवाजा उघडला. शंख, वीणा, घंटा, मृदंग, शिंग वगैरे वाजली. आतून दोघे महापात्र दिवे घेऊन आले. जय–विजय दाराची अर्गला वगैरे तपासू लागले. ते उघडले. छोटचा उपाध्याया-मागोमाग बाकीचे सेवकही मणिमा, मणिमा म्हणत आत आले. जय–विजय दारापासून मुख्य दरवाजापर्यंत दवना व नागेश्वराची फुले रांगोळीगत निखरून पडलेली दिव्याच्या प्रकाशात सगळ्यांनीच पाहिली. छोटे उपाध्याय चकित होऊन विचार करत स्तब्ध राहिले.

गेल्या रात्री देव झोपतेवेळी ते स्वतः मंदिरात होते. त्याआधी मंदिराचे शोधनही झाले होते. मग या फुलांच्या पाकळ्या कुठून आल्या ?"

श्रोत्यांची उत्सुकता शिगेला पोचली.

पण मेकाप अतिशय उत्तम गोष्टी सांगणारा होता. तो काहीच बोलला नाही. प्रथम त्याने स्वतःची बैठक बदलली. डाव्या पायावर उजवा पाय त्याने केव्हाचा चढवला होता. त्याला मुंग्या आल्या होत्या. मग पुढे सुरुवात करून तो म्हणाला, "सगळे सेवक आत आले. शय्या ठीक करण्यासाठी शयनकक्षात गेले. पहातात तो काय ? शय्यागृहात श्रींच्या गालउश्या, पायउश्या इतस्ततः पडल्या होत्या. रात्री तर बडसिंहारनंतर संखुडिसिहार संपूर्ण झाला होता. पुराण प्रथेनुसार 'तांबूल समर्पण', 'हडप लागि,' 'सिहार पिठा', 'कांचि बाटुका', 'पखाल भोग' वगैरे विधीदेखील यथास्थित पार पडले होते. शयनभोग चढवला होता. शय्या नीटनेटकी रचून सुवर्ण अर्धनारीनारायण

देवाला फुलांची माळ घातली होती. दीप, चंद्रबत्ती, छत्र, आलटखदी, वीणा, गीत गायनादि सगळे उपचार झाले होते. मग सिंहारी जगमोहन सुवर्ण पीठिकेवर विराजमान करून जय–सिंहार नैवद्य पंच उपचारांनी समर्पित करून पूजा केली होती. आरती ओवाळली होती. भंडाराच्या प्रमुखाने राज अखंडदीप वा अन्य दीप उजळले व मग देवाला शयन करवले. असे असताना इतक्या सकाळी उशा इतस्तत: झाल्या कशा ? हे अघटित कसे घडले ?"

माना ताणून व कानांत प्राण आणून प्रत्येकजण ऐकत होता.

चिलमीचा एक झुरका मारून मेकाप पुढे म्हणाला, "वेळ होत होता. सकाळची काकडआरती व्हायची. अभ्यंगस्नान, पोशाख वगैरे सगळंच व्हायचं होतं. त्यानंतर मग सूर्यपूजा, गरुडपूजा, द्वारपालपूजा व्हायच्या. सेवक तरी किती वेळ विस्मित होऊन उभे रहाणार ? लागले बिचारे कामाला."

"मग ?" एकस्वराने सर्वांनी विचारले.

"त्यानंतर रोज अशाच काही ना काही चमत्कारिक गोष्टी व्हायला लागल्या. शेवटीं महाद्वार व जयविजयद्वार छोटे उपाध्याय स्वत: आपल्या हातांनी बंद करू लागले. तरीही सकाळी दार उघडलं की कधी शेवंतीची माळ तर कधी दवणा नागेश्वराच्या माळा पडलेल्या सापडायच्या. शेवटी छोटचा उपाध्यायांनी निर्जळी उपास केला. मंदिरात पडून राहिले. रात्री महाप्रभूने स्वप्नात दर्शन दिलं न् म्हणाले..."

मेकापने गाल आत ओढून जोरात दम मारला. गोष्ट तशीच अर्धवट राहिली. इकडे श्रोत्यांची चुळबूळ वाढू लागली. कुणीतरी विचारणार की स्वप्नात काय झालं एवढ्यात दुसऱ्यांनी 'हरिबोल'ने सगळा आसमंत दणाणून टाकला.

सावकाश नाकातोंडातून धूर सोडत मेकाप बोलू लागला, "छोटचा उपाध्यायांच्या स्वप्नात येऊन जगन्नाथप्रभूंनी सांगितलं की माझा सेवक असलेल्या खोर्धा राजाला तुम्ही रत्नसिंहासनापर्यंत नाही ना येऊ दिलंत ? त्यांना तुम्ही अस्पृश्य मानता. ठीक आहे. मीही रत्नसिंहासनावर बसत नाही आता. दाराबाहेरच्या घुमटीत येऊन राहतो. म्हणजे खोर्धा राजा माझं दर्शन घेऊ शकेल."

जेमतेम मेकापचे हे भाषण संपलं असेल; लोकांनी 'हरिबोल'च्या जयजयकारांनी आणि हुलहुली ध्वनींनी दिशा दणाणून सोडल्या. पहली विश्वालला काही समजत होतं, काही ऐकू येत नव्हतं. पण 'हरिबोल'च्या प्रत्येक गर्जनेबरोबर तो कपाळाला हात जोडून नमस्कार करत असे.

इथे कुणी तत्त्वज्ञानी किंवा योगी नाही. हे सगळे बिचारे प्रापंचिक आहेत. त्यामुळे जगन्नाथ खरा कोण, त्याचे मूळ रूप काय याची त्यांना कल्पनाही नाही. किंवा त्याची ते उठाठेवही करत नाहीत. यातल्या निम्म्याहून अधिकांनी जगन्नाथाचं दर्शनही घेतलेलं नाही. जाताना प्रत्येक नाक्यावर जिझिया कर भरावा लागतो म्हणे ! एवढा पैसा आहे कुणाकडे ? शिवाय प्रपंचाची चिंता ! ती कुठली कुणाला सोडायला बसली. आता अडचणी संकटं कुणाला येत नाहीत ? त्यासाठी नवस बोलायला फेडायला महादेव किंवा देवी आहेच. त्याहूनही मोठं काही उपस्थित झालंच तर धवललिंग आहे. किरकोळ बाबीसाठी आपली ग्रामदेवी आहेच. एक काळी साडी, एखादं कोंबडं – बकरं असं काही दिलं की रोगराईचा उपद्रव होत नाही. पण जगन्नाथाला कोण कसला नवस बोलणार ? त्याच्या चरणावर डोकं ठेवून इहलोकीची यात्रा संपवावी व जन्म–मरणाच्या फेऱ्यातून कायमची सुटका व्हावी या एका इच्छेशिवाय इतर काही ऐहिक मागणं मागायचं कोणाच्या मनातही नसे. तरीही जगन्नाथ त्यांच्या कोणीतरी जिव्हाळ्याचा होता. लांब होता तरीही जवळ. दुर्लभ असूनही अनुगत.

आता हाच जगन्नाथ भक्तासाठी आपलं त्रिभुवनाचं सर्वोच्च रत्नजडित आसन सोडून सिंहद्वारापाशी येऊन राहिलाय. भक्ताची वाट बघत स्वतःच भक्त बनलाय. हीच एक गोष्ट मंगलपूर गावच्या प्रत्येकाला श्रद्धेचा उमाळा आणत होती.

' हरिबोल ' संपल्यावर ओटीवर बसून पान लावता लावता नाथ मिश्रने संदिग्ध स्वरात विचारले,

" राजा तर मुसलमान झाला. हं ? तो कसला राजसेवक ? बक्सी वेणु भ्रमरवर मारला गेला म्हणतात. म्लेंच्छ राजासाठी जगन्नाथ पतितपावन कशाला झालेत ?"

हीच शंका बऱ्याच श्रद्धाळू भक्तांच्याही मनात होती. खरं म्हणजे नाथ मिश्रने ती बोलून दाखवल्यावर तेही म्हणाले. " हो, हो तेच आम्ही म्हणतो."

मेकाप उत्तरला, " अरे म्हणूनच तो सावळा म्हणाला की मी पतितपावन होतो. माझ्या भक्ताचा उद्धार मी नाही करणार तर कोण करील ?"

निरुत्तर होऊन नाथ मिश्र गप्प बसला.

पण ज्यासाठी खुद्द जगन्नाथ पतितपावन बनले तो खोर्धा राजा रामचंद्रदेव केवढा महान भक्त असेल ? प्रत्येकाच्या अंतःकरणात हाच विचार आला अन् सगळ्यांनी एककंठाने जयजयकार केला,

" जय जगन्नाथ की जय, जय खोर्धा राजा रामचंद्रदेवकी जय."

ज्या कारणासाठी केवड्या, वेळूच्या जंगलांनी वेढलेल्या, नदीनाल्यांनी घेरलेल्या मंगलपूर गावात राजा रामचंद्रदेवाचा जयजयकार होत होता, त्याच कारणासाठी

ओडिसाच्या कोनाकोपऱ्यातूनही जयध्वनी उठत होता. हळूहळू त्यामुळे जनसामान्यांत एक नवी जागृती होऊ लागली.

ज्यावर जगन्नाथाची कृपा होते तो कोणत्याही जातकुळीचा, वंशधर्माचा का असेना, ओडिसाचे सत्तापीठ सिंहासन त्याचे होते. कारण हे सिंहासन स्पर्धा, ईर्ष्या, क्षमता या कोणत्याच गुणावर अवलंबून नाही; तर जगन्नाथाची सेवा व कृपा यावर आहे. म्हणून तर "खोर्धा राजा रामचंद्रदेव धर्मत्याग करून मुसलमान बनलेत." या प्रचाराने व रामचंद्रदेवाच्या कृतीने पाइक, दुर्गनायक व इतर उडिया जनता यांनी रामचंद्रदेवाचे नेतृत्व झुगारून दिले होते. या परिस्थितीमुळेच कटकमध्ये नायब–नाजिम तकीखाँ सुखात बसला होता. हलके हलके ओडिसाची जनता व रामचंद्रदेव यांच्यात भली मोठी दरी निर्माण होणार आहे हे त्याला माहीत होतं. खोर्धा सिंहासनावर डोळा ठेवून बसणाऱ्यांच्या आशांनाही पालवी फुटायला लागली होती. पण तेवढ्यात खुद्द जगन्नाथच पतितपावन झाले व या त्यांच्या कृत्याने राजा रामचंद्रदेवाला एक वेगळीच प्रतिष्ठा मिळवून दिली. त्याचे अनुयायीही वाढायला लागले.

## 2

अक्षय तृतीया होऊन गेली. स्नान–पौर्णिमेनंतर बाणपूर नीलाद्रिप्रसादगडात पुरी-सारखाच जगन्नाथाच्या अणसर विधीचा प्रारंभ होतो. त्यानंतर आषाढ शुक्ल द्वितीयेला रथयात्रा साधारणपणे अक्षय तृतीयेपासून ते श्रीगुंडिचा–बाहुडा यात्रेपर्यंत नीलाद्रि-प्रसादगड उत्सव सोहळ्यात गढलेला असतो. तसं पाहिलं तर बाणपूरचे राजे शाक्त पण तरीही नीलाद्रिप्रसादगडात रथयात्रा सर्व पारंपारिक विधीनिशी व धामधुमीने साजरी केली जाते. पण यावर्षी फौजदार हाशिमखाँच्या सेनेची तयारी बाणपुरात चालली आहे. गड जणू चक्रवातात सापडलाय.

लोकांत मोंगलांच्या हल्ल्याची घबराट पसरलीय. म्हणून ते दारांना कुलूप ठोकून जंगलात परागंदा झालेत. ज्यांच्या दारांना कड्या नव्हत्या व म्हणून कुलुपं घालता येत नव्हती तेही कसं ना कसं दार बंद करून गेलेत. गेली शे–शंभर वर्षं हेच चाललंय, राजा मानसिंहाने जगन्नाथ प्रसाद गुंफेतल्या एका दुर्भेद्य, जीर्ण गडाचा आश्रय केला आहे. खोर्ध्याची महाराणी ललिता महादेई सुद्धा आपले सेवकजन घेऊन वीरजाई–विलासगडाला निघून गेली आहे. मानसिंहाला असा विश्वास वाटत होता की हाशिमखाँने

जर भालेरी दुर्गावर हल्ला करण्याचे साहस केलेच तर बाणपूरच्या कंद पाइकांच्या पहाडी प्रतिकारापुढे त्याला पळता भुई थोडी होईल. कारण पूर्वीही असंच झालं आहे.

हाशिमखाँलाही हे माहीत आहे म्हणून तो त्या आत्मघातकी फंदात पडला नाही. त्याने नीलाद्रिप्रसादगडात काही काळ छावणी ठेवली. थोडीशी इकडे तिकडे लुटालूट केली; गडावर राजा गोविंद मानसिंहाच्या वेळेपासूनचं जगन्नाथ मंदिर उध्वस्त केलं, काही फौज तिथं ठेवली व तो दक्षिणेला बंकाडच्या बाजूस निघून गेला, तरीही लोकांच्या मनातून मोंगलांच्या हल्ल्याची भीती गेली नव्हती. म्हणून ते परतलेच नव्हते. राजाही आला नव्हता.

गावचे रस्ते निर्जन होते. संकटांचा अंत कुठे दिसून येतच नव्हता. आदल्या रात्रीं वादळ वारे व पाऊस आला होता. रस्त्याच्या कडेची मोठमोठी झाडे उखडून पडली होती. त्यात करंजाची, आंब्यांची झाडे होती. घरांच्या गच्च्या, पामोळचांसाठी बनवलेली खिडक्यांच्या डोक्यावरची छपरे कोसळून पडली होती. पावसाच्या वर्षावाने घराच्या भिंती ढासळल्या होत्या; आणि त्यांच्या मातीचे ढिगारे बनले होते. जगन्नाथ मंदिरावरचे नीलचक्र तुटून अशाच एका ढिगाऱ्यावर पडले होते.

सकाळी तुफान व मेघ नव्हते. पावसाने धुतलं गेलेलं स्वच्छ आकाश व शांत झालेली धरती होती. आदल्या रात्रीच्या दुर्योगातून वाचलेली ही नवी पृथ्वी सूर्याला जणू प्रणाम करत होती.

गडातल्या सडकांवरून काही मोंगल सैनिक घोड्यावरून बर्च्या हलवत निष्काळजीपणाने जात होते. खोर्ध्याची महाराणी ललिता महादेई व युवराज भागीरथीकुमार यांना कैद करण्याचा हुकूम देऊन हाशिमखाँ तेथून गेला होता. कारण खोर्धा राजा रामचंद्रदेवांच्या नेतृत्वाखाली पुन्हा एकदा मोंगलांविरुद्ध कपटकारस्थान रचले जात आहे हे सिद्ध झालं होतं; व वेणु भ्रमरवराने ललिता महादेईच्या नावे लिहिलेलं पत्र पकडलं गेलं होतं त्यावरून त्या कारस्थानात महाराणीचा व युवराजाचा हात होता हेही निश्चित झालं होतं. पण पुष्कळ तपास करूनही मोंगल सैनिकांना महाराणीचा वा युवराजाचा ठावठिकाणा लागत नव्हता.

हाशिमखाँचं सैन्य जेव्हा बाणपूरच्या जंगलात ललिता महादेईला शोधत होतं तेव्हा भुकेजलेल्या व चिडलेल्या वाघीणीच्या मन:स्थितीत ती वीरजाईच्या मंदिरात बगळामुखी मंत्र जपत बसली होती. वीरजाईचे हे मंदिर भालेरीच्या पायथ्याशी असलेल्या वीरजाईप्रसाद गडात होते.

ललिता महादेई महाराज गोविंद मानसिंहाची कन्या होती खरी, पण तिची आई ब्राह्मण होती. बाणपूरच्या राजवंशात ब्राह्मणकन्येशी लग्न करण्याची प्रथा होती. असं म्हणतात, कोणे एके काळी बाणपूर राज्याचे संस्थापक कुणी एक युवराज कोणा एका

राजाकडून पराभूत होऊन आश्रयाच्या शोधात इकडे तिकडे भटकत होते. त्यावेळी देवीपूजक कंधराज बलभद्र रणाने आपल्या वीरजाईप्रसाद गडात त्याला आश्रय दिला. हळूहळू युवराजही वीरजाई देवीचे उपासक बनले. पण त्यात त्यांचा एक कावा होता. त्यांचे लक्ष देवीच्या चरणांपेक्षा वीरजाईच्या राजसिंहासनावर खिळलं होतं.

कंधांच्या नियमाप्रमाणे दरवर्षी पौर्णिमेला वीरजाईला नरबळी देण्याची प्रथा होती; ते पृथ्वीला 'थडापानु' म्हणत व तिला नरबळी दिला नाही तर धान्य पिकणार नाही व सगळीकडे दुष्काळ पडेल, महामारी फैलावेल अशी त्यांची समजूत होती. कारण सर्वात श्रेष्ठ नरबळी! वसुंधरा धान्य उगवून, अरण्याने छाया देऊन, निर्झरांत थंड गोड पाणी देऊन मानवाला सुखी करते. मग माणसाने ते उपकार स्मरायला नकोत? मरणातूनच तर महाजीवनाचा प्रारंभ होतो. म्हणून दरवर्षी शेतकीच्या कामाला आरंभ करण्याअगोदर कंध नरबळीचा उत्सव करत असत. बलभद्र रणा हा कंधा राजा. तेव्हा दरवर्षी पौष पौर्णिमेला वीरजाई मंदिरात नरबळी किंवा मेरिआबळी देण्याचे त्याचे परमपवित्र राष्ट्रकार्य होते. याही वेळी बलभद्र रणाने मालप्रदेशातून बळीसाठी एक अनाथ मुलगा पकडून आणला होता व त्याला मंदिरात एका खांबाला जखडून ठेवलं होतं. त्याची नानाविधींनी युक्त पूजाही व्हायची होती. पौष पौर्णिमेच्या आधी सात दिवस हे त्यांचे सणाचे दिवस. नाच, शिकार, दारू, मैथुन यांची लयलूट चालली होती. ती संधी साधुन युवराज यदुराज मानसिंहाने त्या मुलाची गुपचुप सुटका केली व त्याला बाणपूरच्या हद्दीबाहेर पोचवून दिले. दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हा बळी देण्याच्या समारंभासाठी ढोल वाजवत, नाचत कंध आले तेव्हा मंदिरात बळीचा कुठे मागमूस नव्हता.

मेरिआ नाहीसा झाला हे ध्यानात येताच त्यांचे नाचगाणे, शिंगतुताऱ्या, ढोल, डोक्यावर बांधलेली मोरपिसं सगळंच जणू विस्मयचकित झाल्याप्रमाणे थांबले. जमावाच्या मनात महामारी, दुष्काळ, मृत्यू यासारख्या अमंगल शंका थैमान घालू लागल्या. म्हणजे 'थडापानु'चंच हे कपट की काय? पण मेरिआ दिल्याशिवाय गत्यंतर नाही. नाहीतर संपूर्ण कंध भूमी उजाड होऊन जाईल यात कुणालाच शंका नव्हती. पण बळी कुठला द्यायचा?

युवराज मानसिंह याच क्षणाची वाट पहात होते.

कंधांचे प्रमुख नायक चिंचेच्या झाडाखाली असलेल्या शेंदूरचर्चित वीरजाईपाशी बसून विचार करीत होते की आता बलिदानाचं काय करायचं? तिथे येऊन युवराजाने सल्ला दिला की बळी पळून गेला असेल तर? बलभद्रला पकडा व द्या बळी. त्याच्याच हलगर्जीपणामूळे तर हा अनर्थ ओढवला. त्याच्यामुळे सगळ्यांनी काय म्हणून रसातळाला जायचं?

तसल्या त्या घाईगर्दीच्या वेळी, भांबावल्या मनस्थितीत कंधांना तो सल्ला मानवला. झुंडीने ते बलभद्राच्या घरी गेले व त्याला खेचून आणून त्यांनी यूपाला बांधले. कंधांच्या विधीनुसार मेरिआवर कुऱ्हाडीचा पहिला घाव 'दिगाल' किंवा त्यांचा राजा घालतो. त्या नव्या नात्याने युवराज मानसिंहाने आपल्या आश्रयदात्यावर फरशीचा पहिला वार केला. बलभद्र रणा तेव्हा पायापासून छातीपर्यंत करकचून बांधला गेला होता तेव्हा प्रतिकाराचा प्रश्नच नव्हता; अर्थात् तसा त्याने प्रयत्नही केला नाही. मरण असं अचानक समोर ठाकल्यामुळे त्याचा चेहरा निस्तेज झाला होता पण त्यावर भीतीचा लवलेश नव्हता. भर बाराच्या कहृरातही अरण्यात जसा गाढ गारवा असतो तशी शांती असह्य वेदना भोगतानाही त्याच्या मुखावर होती. त्याचे ओठ हळूहळू रक्तहीन होत चालले होते व त्याचा मंत्रपाठ चालू असावा. मानसिंहाच्या घावामुळे त्याचा उजना हात अर्धा तुटला होता व त्यातून रक्ताचा लोट वाहात होता. मांसखंड लोंबत होतं. खाली जमिनीवर रक्ताचा सडा पडून लाल रंगाचा चिखल झाला होता. बळीला हळूहळू मारण्याची प्रथा होती. जोवर त्याच्या अंगात धुगधुगी आहे तोवर त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात येतात. ते अतिशय पवित्र मानले जातात. त्यांना शेतात पुरतात कारण मग म्हणे पीक चांगलं येतं. गावाच्या सीमेवर गाडलं तर इडापीडा टळते. बलभद्राच्या शरीराचे लचके तोडण्यासाठी यूपाच्या चारी बाजूला उन्मत कंधांची हीऽ गर्दी उसळली होती. तुकडे तुकडे करून मांस काढून घेतल्यावर थोड्याच वेळात बलभद्र रणाचा फक्त सापळा उरला. असा सापळा कंध जनता ढोल वाजवून नाचत गात जमिनीत पुरून टाकते. बलभद्रच्या सापळ्यावरचं मुख मात्र जस्सं न् तस्सं होतं. कारण मेरिआच्या मुखावर अजिबात वार करायचा नसतो. आता मेरिआच्या तोंडावर क्षमेचं स्मित विलसत होतं.

अशा रीतीने कारस्थान करून युवराज मानसिंहाने तिथे एक गड बांधला व तो कंधांचा राजा बनला. पण स्वत:चा आश्रयदाता व बंधुसमान असलेल्या बलभद्राच्या देहावर उभारलेल्या त्या गडात अनेक चमत्कार होऊ लागले. म्हणून मानसिंहाने ब्राह्मणांचा सल्ला घेतला व राजधानी बंकाडला नेली. नंतर तो नीलाद्रिप्रसादला आला, जिथे वीरजाईचं स्थान होतं व जिथे बलभद्र मेरिआ झाला होता तिथेच, बाणपूरच्या पहिल्या गडाची – बिरजाविलासची स्थापना झाली होती. पण कालांतराने त्याचे भग्नावशेष राहिले.

मरणाच्या पूर्वी बलभद्र रणाने यदुवंशाला शाप दिला होता वंशक्षयाचा. त्यातून सुटका व्हावी म्हणून व वंशरक्षणासाठी यदुराजाने एका ब्राह्मणकन्येशी विवाह केला होता. तेव्हापासून यदुवंशाच्या प्रत्येक राजाला एका ब्राह्मणकन्येशी विवाह करावा लागे. बाणपूरचे राजे ब्राह्मणकन्येशी विवाह करीत त्यामुळे क्षत्रिय राजे बाणपूरच्या

राजकुमारींशी लग्न लावायला उत्सुक नसत. शिवाय अशी वदंता होती की, बाणपूरचे राजे जातीने माळी होते व भावाला मारून त्यांनी गादी बळकावली होती. काळापहाडाच्या ओडिसावरील आक्रमणावेळी यदुराज मानसिंहाने आपल्या कंध पाइकांना घेऊन तैलंग मुकुंददेवाला मदत केली व त्याचे पारितोषिक म्हणून त्याला मानसिंह हरिचंदन अशी पदवी मिळाली होती. पण ते क्षत्रिय नव्हते. त्यामुळे इतर क्षत्रिय राजे बाणपूरच्या राजकुमारींशी पाणिग्रहण करायला नाखूष असायचे. अर्थात् कितीतरी राजकुमारी आमरण अविवाहित रहात असत.

गोविंद मानसिंह हरिचंदनची कन्या ललिता महादेईही कदाचित् अशीच आमरण अविवाहित राहिली असती. पण तिच्या लावण्याची कीर्ती सगळीकडे पसरलेली होती; ती ऐकून खोर्धा राजा गोपीनाथदेवाने आपल्या छोटया बंधूसाठी केशवरायसाठी तिला मागणी घातली.

बलभद्र रणाच्या शापामुळे म्हणा किंवा इतर काही कारणामुळे असेल बाणपूरचा एकही राजा दीर्घायुषी नव्हता. पण गोविंद मानसिंह हरिचंदन त्याला अपवाद निघाला. त्याने त्या शापाला धाब्यावर बसवून, दैवी प्रकोपाला धिःकारून ऐंशी वर्षे राज्य केलं. ज्यावेळी त्यांच्या कन्येला खोर्ध्याची मागणी आली त्यावेळी त्यांचे वय सत्तर–एक वर्षांचे होते. गुबगुबीत शरीर वयोभारामुळे थोडं झुकलं होतं, पण कपाळावर सुरकुत्यांचं जाळं नव्हतं की चेहऱ्यावरही वयाचं चिन्ह नव्हतं. खांद्यापर्यंत लोंबणारे केस व गालमिश्या शुभ्र झाल्या होत्या. मात्र जाडजूड भुवयांखालच्या डोळयांत अजून तारुण्याची रग झळाळत होती. कपाळावर शेंदराचा टिळा होता. केसाळ छातीवर रुद्राक्षाच्या माळा रुळत होत्या.

खोर्ध्याची आपल्या कन्येसाठी आलेली मागणी व तीही गोपीनाथदेवांच्या छोटया भावासाठी केशवरायसाठी ऐकून गोविंद मानसिंहांना विलक्षण राग आला. स्वतःचा अपमानच वाटला त्यांना तो! कुणी ऐकलं होतं केशवरायचं नाव? खोर्ध्याहून मागणीचे श्रीफळ घेऊन आलेल्या ब्राह्मणाकडून त्यांनी ते हिसकावून घेतलं आणि आपटून त्याचे तुकडे तुकडे केले; रागाने ओरडून म्हणाले, "तू ब्राह्मण म्हणून अवध्य आहेस; नाहीतर आता या इथंच तुला बळी दिलं असतं."

अर्थात या अपमानाचा बदला घेण्यासाठी केशवराय खोर्ध्याच्या पाइकांना घेऊन बाणपुरावर चालून गेला. गोविंद मानसिंह देखील कुहुडीगडाच्या चंडेश्वर महादेवापाशी छावणी टाकून तयारीत होते.

एके दिवशी सकाळी उठताच गोविंद मानसिंहाने पाहिलं की शय्येशेजारी एक तलवार रोवलेली आहे व तिच्या मुठीला एक चिठ्ठी बांधलेली आहे. त्यात लिहिलं

होतं – " मी आपल्याला ठार करायला आलो होतो पण गाढ निद्रेत आपण असहाय्य दिसत होता म्हणून मी तसाच परत जातो आहे. पण एक विसरू नका – कुमारी कन्येला घरात ठेवणे म्हणजे कोवळ्या कळीला फुफाट्यात लोटणे आहे. ते पाप आपण करू नये. " पत्राखाली सही नव्हती पण गोविंद मानसिंहांना समजायला वेळ नाही लागला की हे पत्रलेखन केशवरायचंच आहे. त्यांनी सेना ताबडतोब मागे घेतली व ललिता महादेईचा विवाह केशवरायशी करून दिला. ज्या दिवशी शंखांच्या पवित्र ध्वनीसमवेत ललिता महादेईने खोर्ध्याच्या भीतरगड प्रासादाकडे प्रस्थान केले त्या दिवशी तिला वाटत होतं की अनोळखी राजकुमाराबरोबर एक अनंत युगाची बंदिनीच आपल्या रूपाने परीकथेतल्या देशाकडे उडत चालली आहे. तिचं सर्वांग रोमांचांनी थरथरत होतं. पित्याचं घर सोडण्याच्या दु:खाने नव्हे पण पुढे असलेल्या जन्मजन्मांतरीच्या प्रवासाच्या कल्पनेने आलेले ते रोमांच होते. तिच्या आयत नेत्रांत अश्रू तरळत होते.

गोपीनाथदेवानंतर केशवराय रामचंद्रदेव या नावाने प्रख्यात झाला व खोर्ध्याच्या सिंहासनावर त्याला अभिषेकही झाला.

ललिता महादेई खोर्ध्याची महाराणी झाली खरी पण तिचे डोळे उघडायला वेळ नाही लागला. नंतर तर बारवाटी दुर्गात रामचंद्रदेव मुसलमानच झाला व त्याने यवनी रजियाचे पाणिग्रहण केले. धर्मत्याग करून तो पतित झाला. ही हकीगत कळताच ललिता महादेईने स्वत:च्या हातांनी आपले कुंकू पुसले, बांगड्या वाढवल्या आणि वैधव्य धारण करून ती बापाघरी परतली. ईर्ष्येचं दुसरं नाव स्त्री हेच खरं! यवनीच्या दयेवर महाराणी ललिता महादेई जगणार ही कल्पनाच तिच्या मानी मनाला सहन करवत नव्हती. ज्या आयत नेत्रसंपुटात आनंदाश्रू घेऊन तिने खोर्ध्यात प्रवेश केला होता तिथून आता त्याच आपल्या आयत नेत्रसंपुटात सूडाचा अग्नी धगधगवत ती निघून गेली. तिची कर्पूरगौर कांती ईर्षेमुळे लालसर ताम्रवर्ण झाली.

तंत्रशक्तीचा उपयोग करून रामचंद्रदेवाला पांगळा करण्याचा तिचा खटाटोप होता. म्हणून व्रतस्थ राहून ती वीरजाईच्या समोर कुशासनावर बसून प्रत्यही दहा हजार बगळामुखी बीजमंत्राचा जप करत होती..." रामचंद्रदेवस्य बुद्धि नाशय नाशय, जिव्हा किलय किलय ऱ्हीं फट् स्वाहा!"

पण आज रुद्राक्षमाळा जपत ध्यानमग्न बसलेल्या ललित महादेईच्या अंतश्चक्षूसमोर देवीची मूर्ती येत नव्हती तर अनंत चिंता येत होत्या. मधूनच रामचंद्रदेवाचे विषण्ण डोळे दिसत होते. पुरीहून आलेल्या हेराने बातमी आणली होती की श्री जगन्नाथ

पतितपावन झालेत आणि त्यांनी महाराज रामचंद्रदेवांना दर्शन दिले. चारी दिशांना लोक त्यांचा जयजयकार करताहेत. रामचंद्रदेव धर्मच्युत झाल्यावर मंदिराच्या पुजाऱ्यांनी एकादशीच्या रात्री महाप्रदीपावेळी त्यांचे नाव पुकारणे बंद केले होते व केवळ 'हरिबोल'चा ध्वनी होत असे. आता पुन्हा ते "खोर्धा राजा महाराज रामचंद्रदेव तुला शरण आहेत. त्यांना शंखचक्राचे अभय दे" असं म्हणू लागले आहेत.

म्हणजे रामचंद्रदेव उडिया जनतेत, सामंत व दुर्गपतींमध्ये पुन:प्रतिष्ठित होताहेत. पण ही एवढीच खबर ललिता महादेईसाठी चिंतेला कारण नव्हती. पण या वर्षी रथयात्रेच्या वेळी महाराज रामचंद्रदेव छेरापहऱ्याचा म्हणजे रथयात्रेच्या वेळी रथांवर चंदन शिंपडून सोन्याच्या केरसुणीने केर काढण्याचा विधी व अन्य राजविधी करणार कारण मुक्तिमंडपाच्या साधू व शास्त्र्यांनी, पंडितांनी त्याला अनुमती दिली आहे. रथारूढ जगन्नाथाकडे एरवीही स्पृश्यास्पृश्य विचार नाही; त्यातून तो रामचंद्रदेवाच्या भक्तीने प्रसन्न झाला आहे. शिवाय ज्याच्यासाठी त्याने पतितपावन रूप धारण केले आहे त्यालाच लांब ठेवायचे हे कितपत योग्य आहे? या सवालाचे उत्तर कुणीही देऊ शकले नव्हते. कुणी असंही म्हणत की प्रायश्चित्तादाखल उभयमुखी रामचंद्रपूर गाव दान करून रामचंद्रदेव पुन्हा हिंदू झालेत. तसं जर असेल तर भागीरथीकुमाराला सिंहासनलाभ होणे कधीही शक्य नाही.

बक्सी वेणु भ्रमरवर जर जिवंत असते तर मात्र त्यांनी रामचंद्रदेवाला तेव्हाच पदच्युत केले असते. महाराणी ललितादेवीने ज्या दिवशी सौभाग्यचिन्हे टाकून स्वत:ला वैधव्य आल्याचे घोषित केले होते त्याचवेळी बक्सीला वचन दिले होते की रामचंद्रदेवाचे धडविरहित मस्तक पहाताक्षणीच हातात पूजाथाळी घेऊन स्वत: बक्सीला नमस्कार करील.

ललिता महादेईने आपले कुरळे केस मागे सारून वीरजाईच्या मुखाकडे काकुळतीची नजर लावली. पण शेंदूर माखलेल्या तिच्या मूर्तीवर प्रसन्नतेची कोणतीही निशाणी नव्हती.

आसनावर रुद्राक्षमाळा ठेवून ती अस्वस्थ मनाने बाहेर निघून गेली.

तिला वाटलं होतं या वर्षी भागीरथीकुमार रथयात्रेच्या वेळी छेरापहरादि राजविधी करील, म्हणून मोठे उपाध्याय गौरी राजगुरूंना विश्वासात घेऊन तिने सर्व व्यवस्था करून ठेवली होती. खोर्ध्याच्या सिंहासनावर हक्क सांगण्याची ही पहिली व प्रमुख पायरी होती. एकदा भागीरथीकुमारने छेरापहरा केला असता की लोकांच्या समोर तोच खोर्ध्याचा सध्याचा राजा हे निश्चित झालं असतं. पण आता सगळंच उलटंपालटं झालं होतं. आता तिच्या मताने भागीरथीकुमारने पाइकांना घेऊन पुरीला जाणंच योग्य होतं.

भागीरथीकुमारलाही सिंहासनाचा विलक्षण मोह होता पण त्यासाठी लागणारे धैर्य, मानसिक गुण नव्हते. स्वत:च्या आईसारखाच तो शिडशिडीत पण पीळदार व सुंदर होता. पण त्याचे डोळे मात्र रामचंद्रदेवासारखे विषण्ण उदास होते. त्यांच्या एकंदर शरीरप्रकृतीशी ते विसंगत वाटायचे. ललिता महादेई जेवढी त्याला कठोर शिस्त लावायचा प्रयत्न करायची तेवढा तो शिकार, संगीत नृत्यादी विलासांत मग्न रहायचा.

मंदिराबाहेर सगळीकडे शुकशुकाट होता. खाली लतावेलींनी आच्छादलेली उपत्यका होती. वरच्या विशाल वृक्षांची छाया तीवर आळसावून लोळत होती. कडक उन्हामुळे पक्षीही गुपचुप होते. एका झाडावरून एका कबुतराचा करुण आवाज व दुसरीकडून त्याला क्लान्त प्रत्युत्तर तेवढे येत होते. मंदिरात कामानंद ब्रह्मचारी अनुनासिक स्वरात मंत्रोच्चारण करत होते. तो स्वर त्या निर्जन दुपारीची नि:संगता अधिकच एकाकी करत होता.

भागीरथीकुमारला शोधत ललिता महादेई जीर्णांगण, ओवऱ्यांचे भग्न स्तूप, व पश्चिमेचे सगळे प्रासाद ओलांडून नागचाफ्याच्या वनाच्या सुकलेल्या पुष्करिणी-जवळच्या मंडपाजवळ आली. मध्याह्नीची शांतता भंग करणारा पखवाजाचा आवाज तिथला पश्चिम तट पार करताच तिच्या कानावर आला.

तिला वाटलं होतं तेच चाललं होतं. मंडपात बसून भागीरथीकुमार पखवाज वाजवत होते. एका ' गोटिपुअ ' नर्तकाने स्त्रीवेष धारण केला होता. व डाव्या पायावर नितंबभार टेकवून आणि उजवा पाय नृत्यमुद्रेत पुढे घेऊन तो नृत्याच्या पावित्र्यात उभा होता. दुसरा ' गोटिपुअ ' चाळ बांधून पखवाजाचे ' ता धिमि धिमि ता दत् ता धी ता नों किटितक ' बोल पायातून काढत होता.

पखवाजात भागीरथीकुमार अगदी तन्मय होऊन गेला होता.

एका फुललेल्या नागचाफ्याखाली उभी राहून ललिता महादेई हे सगळं बघत होती. ज्याखाली पाषाण मूर्तीवत् उभी राहून ती समोरचं निर्लज्ज दृश्य पहात होती त्याच झाडाच्या एका फांदीवर एक काळा नाग सुवासाने गुंगून पडला होता. आता तो हळूहळू दुसऱ्या फांदीकडे सरकत निघाला तेव्हा झालेल्या पानांच्या सळसळीने दचकून तिने वर पाहिले व नाग पाहून किंकाळी मारली,

" कुमार ! "

तिथून धावत ती मंडपापाशी आली.

त्यावेळी तशा अवस्थेत आपण मातेला पाहू अशी कल्पनाही कुमारने केली नव्हती.

अपराध्याप्रमाणे मस्तक झुकवून भागीरथीकुमार उभा राहिला. त्याला काही म्हणायचेही नव्हते अन् ललिता महादेईही तशी अपेक्षा ठेवून नव्हती. पण भागीरथी-कुमाराच्या त्या मौनातही एक संयम होता. विनाधिकार महाराणीने यावं याबद्दलचा राग होता. त्याच्या मस्तकावरून केसांची एक बट खाली झुकली होती. हे दृश्य मायलेकरांना दोघांनाही नवीन नव्हतं.

पण आज महाराणीचा स्वर अतीव गंभीर होता. सुस्कारे सोडत ती म्हणाली—

"मला ठाऊक आहे तुझ्या नसात ते खोर्ध्याचं विषारी रक्त खेळतं आहे. पण या ब्राह्मणीचाही संयम व साधनेचा वाटा त्यात आहे ना? असाच दिसायचा का, तो?"

हा प्रश्न या आधीही शेकडो वेळा कुमाराने ऐकला असेल. महाराणीनेही उत्तराची अपेक्षा ठेवलीच नव्हती. हंस जसा पंखांच्या फडफडीने पाणी झटकतो तसे खांदे उडवून मान खाली घालून कुमाराने निमूटपणे आईची सर्व भर्त्सना ऐकून घेतली.

पण नेहमीप्रमाणे नाटक इथेच संपले नाही. महाराणी म्हणाली,

"खोर्धा राजा यावेळी स्वत: छेरापहरा करणार आहेत. त्यासाठी पुरीत तयाऱ्याही चालू झाल्या. तुम्ही लगेच चंपागडाकडे निघा. तिथून पाइकांना घेऊन अंधारीगडाकडून चिलिकेच्या मार्गे पुरीला चला. पण एवढी काळजी घ्या की खोर्ध्याच्या कुणाला पत्ता लागू नये. पुरीला पोचलात की गोविंद बाजपेयी जसं सांगतील तसं वागा. समजलं? नाहीतर खोर्ध्याचं राजसिंहासन स्वप्नातही दिसणार नाही. खूप समजून असा."

तातडीने महाराणी आली तशीच वीरजाईच्या मंदिराकडे परतली. तिला सारखं वाटत होतं की नागचाफ्यावरचा तो काळा नाग आपला पाठलाग करतोय. वारंवार तिच्या अंगावर भीतीने काटा उभा रहात होता.

# सात

## 1

कटक लालबागेच्या दिवाण–ए–खास मध्ये तकीखाँची गुप्त सल्लामसलत चालू होती. खलबत खरोखरच गुप्त व महत्त्वाचे होते. महत्त्वाच्या खास व्यक्तींनी भरलेल्या सभागृहाबाहेर पहारेकऱ्यांची संख्या दुपटीने वाढविली होती तशीच ती किल्याच्या प्रवेशद्वारापाशी, नौबतखान्यापाशी दुप्पट होती. ही सारी व्यवस्था करणाऱ्या कोतवालाला त्याचे प्रयोजन माहीतही नव्हते. त्याला किल्लेदाराने जसे सांगितले तसे त्याने केले एवढेच. खुद्द वजीर बहादूर मुस्तफा अलीखाँचा तसा हुकूम होता म्हणतात. किल्लेदार व शिपाई यांना या बैठकीत होणाऱ्या कामाचा मागमूसही नव्हता, मग ते सहभागी होण्याची बात दूरच ! पण नायब–नाजिमच्या भेटीला आलेले रिकामटेकडे दरबारी, जमीनदार आपला मोठेपणा मिरवण्यासाठी इकडे तिकडे हिंडत होते, ते मध्येच बैठकखान्याच्या निळ्या पड्यापर्यंत जाऊन येत, सुस्कारे सोडत, आणि मेंदीने रंगलेली दाढी व तोंड अत्तर माखलेल्या रुमालाने पुसत चालते होत.

बैठकखान्यात तकीखाँ मसनदीवर डावे कोपर टेकून हनुवटी हाताच्या मांसल तळव्यात रोवून बसल्या बसल्या घोरत होता. तिथे त्याचे तीन वजीर, मुस्तफा अलीखाँ, सेनापती दीन महम्मद आणि अत्यंत विश्वासातले हिंदू जहागीरदार अमीनचंद आपापल्या जागी गुपचुप एकमेकांना पहात बसले होते. नक्की कशाला बोलावले त्याचा प्रत्येकजण आपापल्या परीने विचार करत होता.

कशावर चर्चा करण्यासाठी त्यांना बोलावलं होतं, कोणत्या कामासाठी माहांगा परगण्याला खास दूत पाठवून अमीनचंदला बोलवून घेतला; कुणालाच काही ठाऊक नव्हते. तकीखाँची झोप कधी पुरी होते याचीच सर्वजण उत्कंठेने प्रतीक्षा करत होते व पाषाणमूर्तीप्रमाणे निश्चल बसून होते. मधून मधून तकीखाँचे घोरणे कमी होई; वाघाच्या पंज्यासारखा त्याचा हात मिशावरून फिरे त्या त्या वेळी मागचे मोरचेल वारणारे खिदमतगार तर ताठ उभे रहातच पण आपापल्या आसनावर बाकी लोकही सावरून बसत.

आपल्याला असं अचानक का बोलावलं याचा अंदाज अमीनचंदलाही करता येत नव्हता. त्याला फक्त अनिष्टाची चाहूल लागल्यागत वाटत होतं, म्हणून तो मनातल्या मनात विष्णुसहस्रनाम जपत होता.

पण त्याला जिज्ञासा स्वस्थ बसू देईना. तोंडावर पंजा पालथा ठेवून दबक्या स्वरात त्याने वजीराला विचारले,

"जनाब, या बंद्याची अचानक आठवण का झाली असावी याची काही कल्पना आहे का ?"

वजीर स्वतःच हा प्रश्न स्वतःला विचारत होता. तो कसला उत्तर देतो ? पण गंभीरपणे, डोळे किलकिले करून अशा रीतीने त्याने अमीनचंदकडे पाहिले की तो समजला बात खरंच गंभीर आहे.

पूर्वीच्या काळी सुजाखाँच्या दूरदृष्टीने ज्या काही हिंदू लोकांना जमीन जहागीर देऊन खूष ठेवले होते त्यांत अमीनचंद अग्रगण्य होता. तो उत्तर हिंदुस्थानचा रहिवासी पेहेलवान होता व तलवार चालवण्यात मोंगल सैन्यात त्याच्यासारखा कुणी नव्हता. याच गुणावर तकीखाँबरोबर तो मुर्शिदाबादेला आला होता. त्यावेळी कररहित खंड उपभोगणारे जमीनदार चढेल झाले होते. व त्यांना कह्यात आणायसाठी त्यांच्या जागी मोंगलप्रेमी जहागीरदारांना बसवण्याचे उद्योग चालू होते. अशाच जमीनदारांपैकी एक अमीनचंद होता. त्याला विरूपा नदीच्या दक्षिणेकडील विस्तीर्ण माहांगा परगण्याची जमीनदारी मिळाली होती. अनेक लढायांत त्याने तकीखाँच्या उजव्या हाताचे काम केले होते. याखेरीज, कटकच्या रणधुरंधर जमीनदारांना मोंगलानुकूल बनवण्यात तो यशस्वी झाला होता. हे सगळं जरी असलं तरी अचानक तकीखाँकडून खास जासूद बोलवायला आल्यामुळे तो गडबडून गेला होता. अस्वस्थ झाला होता.

पण यावेळी काही ओडिसाची राजनैतिक अवस्था संकटात नव्हती. हाफिज कादरखाँ उर्फ रामचंद्रदेवही मधून मधून कटकेला येऊन आपल्या निष्ठेची ग्वाही देत होते. धर्मवेडाला बळी पडून विनाकारण जगन्नाथाचा नाश करण्याची काही तकीखाँची इच्छा नव्हती. तसं पहाता, जगन्नाथ जसा आसेतुहिमाचल पसरलेल्या हिंदूंचा मोक्षदाता होता तसा मोंगलांसाठी अर्थप्राप्तीचे साधन होता. सुजाखाँच्या काळी जगन्नाथाच्या यात्रेच्या वेळी जिझिया कर दरवर्षी पाच लाख व्हायचा. तकीखाँ सात लाख गोळा करत होता. हा झाला सरकारी हिशेब. शिवाय जगन्नाथ सडकेवर चौक्या घालून बसलेले सहकारी कर्मचारी आपला हिस्सा यात्रेकरूंकडून वसूल करत तो वेगळाच ! गुदस्ता खोर्धा आणि कटकेत लढाई झाली अन् यात्रेकरूंची संख्या कमी झाली. अर्थात् जिझिया कराची रक्कमही कमी भरली. मुर्शिदाबादेहून तकीखाँला

याबद्दल तंबी मिळाली. त्यामुळे मोंगलांच्या करशक्तीचा आधार असलेल्या जगन्नाथाला संपूर्ण नष्ट न करता आपल्या द्वेषाची भरपाई कशी करायची याचा विचार आता तकीखाँ करत होता.

अन्य मोंगल सेनापतींप्रमाणे तकीखाँनेही ऐकलं होतं की जगन्नाथाचे 'आत्मतत्त्व' म्हणजे एक अनमोल इंद्रनील आहे. वस्तुत: पूर्वी गंगेपासून गोदेपर्यंत पसरलेले विशाल उत्कल साम्राज्य जगन्नाथाच्या मालकीचे होते. तेव्हा शाहजहाँबाद दिल्ली–निवासी मोंगल सम्राटापेक्षा, मुर्शिदाबादच्या नबाबापेक्षा आणि दक्षिणच्या निजाम–उल्–मुल्कापेक्षाही तो वैभवशाली होता यात शंकाच नव्हती.

याच संपत्तीला लुटण्याकरता काळापहाडपासून प्रत्येकाने चढाया केल्या होत्या. जहांगीराच्या वेळी हिंदू सेनापती केशवदासाने मंदिर बंद करून काही तोळे सोनं व काही रत्नांची लूट केली होती. हाशिमखाँ, मकरामखाँ, एकरामखाँ वगैरे सेनापतींनीही हल्ले करून करून काही लूट केली होती. तरीही मंदिरात जे काही होतं त्यातून बंग बिहार, ओडिसा एकदम खरीदता आलं असतं. तकीखाँच्या मनातही याची लूट करायचं होतं. दुसरं काही नाही.

पण भूतकाळाने तकीखाँला एक धडा शिकवला होता. तो हा की मंदिरावर हल्ला करून व देवतेचा विध्वंस करून मतलब साधणे कठीण ! त्याऐवजी छळ, थोडी चलाखी, फितुरी असले उपाय योजले तर काही जमले तर जमले. याच हेतूने त्याने खोर्धा राजाला हाफिज कादर बनवले होते. या हाफिज कादरचे बाहुले करून स्वत: जगन्नाथाची संपत्ती हडप करायची असा त्याचा डाव होता. एका दगडात दोन पक्षी आपोआपच मारून झाले असते. धर्मत्यागानंतर रामचंद्रदेवाकडे अठरा राजे तिरस्कारानेच बघतील व त्याचे नेतृत्व अमान्य करतील आणि उत्कलची सर्वसामान्य जनताही त्याच्याबद्दल आदरभावना ठेवणार नाही अशी तकीखाँची अटकळ होती. असं झालं की खोर्ध्याच्या राजशक्तीची कंबर मोडायला कितीसा उशीर ? ती आपोआपच मोंगलांना मिळणार.

पण तकीखाँच्या या स्वप्नावर खुद्द जगन्नाथानेच बोळा फिरवला. तो स्वत:च पतितपावन झाला.

तकीखाँ झोपला होता की विचार करत होता हे समजणं कठीण होतं. असा आणखी किती वेळ गेला असता कोण जाणे ! पण तेवढ्यात एक माशी कुठूनशी आली व तकीखाँच्या नाकावर फिरून फिरून बसू लागली. काय त्याच जागेचं तिला एवढं प्रेम होतं कोण जाणे ! मागं उभा राहून पंखा करणारा गुलाम ती माशी उडवून लावायचा प्रयत्न करीत होता. खुद्द तकीखाँ हात चोळून तिला उडवून लावत होता. तरी पण

ती सारखी त्याच जागी नाकावर येऊन बसत होती. अमीनचंद त्यावेळी आपल्या विष्णुसहस्रनामात गुंग होते. सेनापती डुलक्या खात होते. एकटे वजीर मुस्तफा अलीखाँ माशीच्या त्या लीला बघत कौतुकाने गालात हसत होते. त्यांचे एरव्ही कठोर असणारे मुखमंडल क्षणभर कौतुकमिश्रित कोमल रेषांनी भरून गेले होते.

तकीखाँने अचानक पाय आपटले व तो ओरडला, "कम्बख्त, तलवार आणा माझी."

या त्याच्या तलवार मागण्याच्या पद्धतीने अमीनचंदच काय पण वजीर, सेनापती सगळेच घाबरून गेले. खिदमतगाराने पंखा जोरजोरात हलवला; त्यामुळे माशी तिथून हलली व वजीराच्या डाव्या गालावर बसली.

ते पाहून तकीखाँला विलक्षण हसू आलं.

मसनदीच्या आधाराने बसून तकीखाँने एक जांभई दिली; व दोनेकवेळा तो "इन्शाल्ला" पुटपुटला.

हुक्केवाल्याने सुवर्णजडित हुक्का समोर आणून ठेवला. डोळे किलकिले करून त्याने हुक्का ओढायला सुरुवात केली. अंबरी तंबाखूच्या सुवासाने बैठकखाना भरून गेला.

डोळे उघडून तकीखाँने फर्मावले,

"कोण आहे रे तिकडे ? हेरांच्या प्रमुखाला हजर करा."

दोघेजण त्याला बोलवायला बाहेर निघून गेले.

हेर–प्रमुख बाहेर बसून आतल्या बैठकीच्या खलबतांचा अंदाज बांधण्याचा प्रयत्न करत होता.

राज्यातल्या सगळ्या गुप्त हालचालींची बित्तंबातमी ठेवण्याचे काम हेरखात्याचे असते. दिल्ली, शहाजाहाँबाद, मुर्शिदाबाद वगैरे प्रत्येक ठिकाणी हेरखात्याची यंत्रणा काम करत असतेच. सुभ्यात चालणाऱ्या यच्चयावत् घटनेची माहिती करामत अलीखाँला होती. पण आत काय चाललेय हे कळत नसल्यामुळे तो अतिशय बेचैन होता.

आतल्या बोलावण्याची वाट बघत तो बसला होता. पण जेव्हा आमंत्रण आलं तेव्हा सरकारी सेवेत काळ्याची पांढरी झालेली, छातीपर्यंत रुळणारी दाढी कुरवाळताना मनातल्या मनात 'तोबा तोबा' म्हणू लागला. सुरवारीत किडमिडे दिसणारे पाय सावरत, भल्या मोठ्या दोंदावर हात फिरवत तो आत गेला.

नायब नाजिम बहादुराला कुर्निसात केल्यावर तकीखाँने त्याला हुक्क्याच्या नळीनेच बसण्याचा हुकूम दिला. शेरवानीचे टोक सांभाळून तो अलगद गादीच्या खुर्चीवर टेकला.

आता तकीखाँने हुक्क्याची नळी फेकून दिली. सरळ बसत म्हणाले,

" खबर सांगा. "

लगेच हनुवटी हाताच्या मुटक्यावर टेकली, डोळे मिटले व बघता बघता घोरायला सुरुवात केली.

करामतअलीखाँचा यामुळे मुळीच उत्साहभंग झाला नाही. त्याने ओडिसाच्या सर्व बातम्या सांगायला सुरुवात केली, " हुजूर, खावंद मी आपले व मुर्शिदाबाद तख्ताचे मालिक सुजाखाँ यांचे अन्न खातो. मी जो काही आहे आपलीच मेहेरबानी आहे. "

तकीखाँच्या घोरण्याचा जोर वाढला होता. करामतअलीखाँचं बोलणं चालूच होतं,

" ओडिसाच्या कानाकोपऱ्याची खबर या सेवकाला आहे. "

अचानक घोरणं बंद झालं. तो सरळ बसला; आणि डोळे वटारून करामत अलीखाँकडे पाहू लागला. त्याची बोलतीच बंद झाली. कर्कश स्वरात तकीखाँने जरब दिली,

" आम्ही खबर विचारतो आहोत. "

करामतअली नीट वळणावर आला, " अठरा राजेरजवाडे पुन्हा खोर्ध्याकडे येऊ लागलेत. यावेळी सगळेजण रथयात्रेत सामील होतील. तयाऱ्या सुरू झाल्यात. खोर्धा राजा मुसलमान झाले होते तेव्हा ' छेरापहरा ' करू शकत नव्हते. "

हे ' छेरापहरा ' प्रकरण तकीखाँला कळलं नाही. तेव्हा अमीनचंद पुढे झाले, म्हणाले, " हा एक धार्मिक विधी असतो. श्री जगन्नाथ रथावर आरूढ झाले की खोर्धा राजा त्याचा सेवक या नात्याने रथाच्या चारी बाजूला सोन्याच्या झाडूने झाडून काढतो. "

उपहासाने तकीखाँ आपले थुलथुलीत शरीर हलवीत हसला. म्हणाला,

" मग तर तो झाडूवाला झाला. राजा कसला ? "

करामतअलीखाँ दाढी कुरवाळत म्हणाला, " तेच तर म्हणतो मी. "

पण अमीनचंदने आश्चर्याने विचारले, " याला पंड्यांनी कशी काय परवानगी दिली ? "

हेरप्रमुखाने सांगितले,

" माझ्या माहितीप्रमाणे मुक्तिमंडपात जी काफरांची सभा झाली त्यात हा निर्णय घेतला गेला. खोर्धा बादशहा हाफिज कादरसाठी खुद्द जगन्नाथ पतितपावन झालेत. म्हणून पंडितांनी ही परवानगी दिली. शिवाय रथयात्रेच्या दिवसांत काफरांच्या देवतेला कुणीही शिवलं तरी चालतं. मग खोर्ध्याच्या राजाला मनाई कशाला ? "

आपली मेंदीने लाल झालेली दाढी कुरवाळत याच बातमीवर वजीर विचार करत होते. जगन्नाथ पतितपावन झालेत व ही बातमी उत्कलच्या कोनाकोपऱ्यात व्यापारी

यात्रकरूंनी पोचवलीच असणार. म्हणजे खोर्धाच्या राजाबद्दल लोकांच्या मनात श्रद्धा पुन्हा एकदा जागणार. पण जगन्नाथ खरंच पतितपावन झालेत की यात काही कारस्थान आहे ? हेरप्रमुखाला याबाबत काहीच ठाऊक नव्हतं.

एक क्षणभर सबंध दिवाण–ए–खास स्तब्ध झाला. मग मसनदीवर लवंडल्या लवंडल्या तकीखाँनें हुकूम सोडला,

" रथयात्रेच्या वेळी तंटाबखेडा करणे ठीक होणार नाही. रथयात्रा संपली की अमीनचंदला पुरीचा नायब केलं जाईल व मंदिराबाबतचे खोर्धा राजाचे सगळे हक्क हिरावले जातील. मंदिरातली पूजा अर्चा अमीनचंदाच्या हुकुमाने होईल. "

मान हलवत वजीर उत्तरले,

" अकबर बादशहाच्या वेळेपासून जगन्नाथमंदिराची सनद खोर्धा राजाच्या नावाने आहे. खोर्ध्याची प्रजा अमीनचंदचा हुकूम मानायला तयार झाली नाही तर ?"

वजीराच्या या प्रश्नावर तकीखाँ रागाने फेफरं आल्यासारखा थरथर कापू लागला. तो ओरडला,

" खोर्धा राजाने आमचा हुकूम मानला नाही तर मग आम्ही खोर्ध्यावर हल्ला करू. राजाला कैदेत टाकू. "

पण वजीराचे एवढ्याने समाधान नव्हते झाले. त्याने भीत भीत म्हटले,

" खोर्धा राजाची काय बिशाद आहे ख़ावंदाची आज्ञा न मानण्याची ? पण मंदिराचे पुजारी... "

तकीखाँने मसनदीवर थप्पड मारत म्हटले, " तसं झालं तर मंदिर जमीनदोस्त होईल. "

मुस्तफा अलीखाँने बोलण्याचा रोख व स्वर वदलून टाकला. तो म्हणाला,

" हुजूर, तिथं जर एक मशीद उभारली तर छान होईल. पण दरवर्षी जिझियाचंच उत्पन्न सात–आठ लाख येतं. ते बंद झालं तर मुष्किल होईल. "

आपला गुबगुबीत चेहरा वेडावाकडा करत व ओठ चावत तकीखाँ उत्तरला, " जगन्नाथाच्या जवळ जी रत्नं आहेत त्यातून शहाजहाँबाददेखील खरेदी करता येईल. "

लालबाग किल्ल्यातली गुप्त सभा संपली. वजीर व हेरप्रमुखाला तिथेच सोडून सचिंत मनाने राजमार्गावर घोड्यावरून जाताना अमीनचंदाच्या कपाळावरून घामाच्या धारा वाहात होत्या. जगन्नाथ मंदिर मुठीत येण्याच्या वार्तेने तो एका बाजूने हर्षोत्फुल्ल झाला होता. पण वाटेतले खाचखळगे, धोकेही त्याला ठाऊक होते. त्यामुळे त्याचं मन द्विधा झालं होतं.

शहराचा राजरस्ता लोकांनी फुलून गेला होता. लोक पुरीला चालले होते. या रस्त्याने ते काठजोडी नदीघाटावरून गडिमुंड खाडीपर्यंत जातील व तिथून जगन्नाथ सडकेवर येतील. त्यातच ते कटकही बघतील. भिन्न भिन्न प्रांताचे भिन्न भिन्न पेहराव करून वेगवेगळया भाषा बोलत तो सप्तरंगी स्रोत वहात होता. प्रत्येक रस्ता फक्त एकाच मोठया रस्त्याला मिळत होता. तो म्हणजे पुरुषोत्तमक्षेत्राचा 'बडदांड' रस्ता. सुदर्शनचक्रांकित नीलगिरी शिखर अजून खूप लांब होते. पण त्याला डोळाभर बघून प्रणाम करायला नेत्र आसुसले होते. जगन्नाथ सडकेच्या पवित्र धुळीत लोळायला शरीर आतुर होते. अनेक कंठ भजन गात होते पण मोंगल लष्कर, हवालदार यांच्या भीतीमुळे ते चूप झाले होते. काठजोडी पार झाली की हा स्रोत पुन्हा मुखरित होईल. पश्चिमेचे यात्रेकरू 'भले विराजो जी' गातील; गौडीय वैष्णव "जगन्नाथ स्वामी नयन पथगामी भवतुमे" म्हणतील; उत्कलवासी मृदुंग नाद करीत 'जणाणे' म्हणतील आणि एक महान् मिश्रसंगीत निर्माण होईल. वाटेतले ताप संताप, अरण्य नद्या पार करण्याचे श्रम, मोंगलांचे जुलुम भय वगैरे सगळं तुच्छ मानून; मृत्यूलाही क:पदार्थ मानून ही मानवात्म्याची अपराजेय यात्रा अशीच पुढे जात रहाणार.

यात्रेकरू आता कटकेतून चालले होते. म्हणून ते गुपचूप होते. काठजोडीच्या दिशेने ते चालले होते. अमीनचंदही त्यांच्याचबरोबर आनंदाने घोडयावरून चालला होता.

बैठकखान्यातून वजीर, हेरप्रमुख, अमीनचंद वगैरे सगळे निघून गेले अन् अचानक पडद्याच्या आत तकीखाँला रजियाबेगम दिसली.

म्हणाला, "हं, बोल."

तिने चेहऱ्यावरून बुरखा दूर सारला, हरिणीसारखे आपले नेत्र तकीखाँवर रोखून ती म्हणाली,

"गाजीपीराला मी नवस बोलले होते. हुजूर जहाँपनाह, आपण खोर्ध्याच्या लढाई-तून सुखरूप आलात. नवस–फेडीसाठी मला गाजीपीराच्या दर्शनाला गेले पाहिजे. आपण त्याची तजवीज करून द्या ना. काल रात्री स्वप्नातही मला गाजीपीराने दर्शन दिलं."

वेडरपणे जे दुसऱ्यावर जुलूम जबरदस्ती करायला यत्किंचित् मागे घेत नाहीत तेही कुणाला तरी घाबरतात. खरं तर ती त्यांची विवेकशक्ती असते. मग ते भले त्याला पीर, फकीर, अल्ला, देव, ईश्वर अशी नावे देवोत. याच कारणासाठी तकीखाँला पीर, फकीर वगैरेंची भक्ती वाटण्याऐवजी भीती वाटायची.

आपल्या ढेरपोटावरून हात फिरवत तकीखाँ म्हणाला, "ठीक आहे. होऊन जाईल."

बुरख्याआड आपले काळेभोर डोळे व हसरे मुख दडवत रजिया तिथून पसार झाली व जनाना महालात निघून गेली.

तकीखाँचे घोरणे पुन्हा सुरू झाले.

# आठ

## 1

कुरूलोविशाच्या सिंहल–ब्रह्मपूर गावात दधिवामन जीऊचे मंदिर आहे. स्नानपूर्णिमेपासून तिथे अणसर विधींना प्रारंभ झाला होता. आता ते आषाढ अमावास्येपर्यंत चालू राहतील.

पण त्याच सुमारास सिंहल–ब्रह्मपूर गावात एक बातमी आली – कशी आली कुणास ठाऊक – की दिल्लीहून अमुरा पातशहा भली थोरली फौज घेऊन मंदिर पाडायला व मशीद बांधायला येतो आहे. नाथ मृदुलीने ही बातमी आपल्या मावशीच्या घरून म्हणजे शिशुपालगडाच्या कुशुकुंटा गावाहून आणली होती. तिथे म्हणे दलेईबागेहून कुणी पाहुणे आले होते. दलेईबाग म्हणजे कुशुकुंटा गावाहून अगदी जवळ काठजोडीच्या दक्षिण तटावरचे. कटकेत मिरच्या भाजल्या तर दलेईबागेत खाट उसळतो असा तिथला लौकिक. त्यांनी खबर आणली होती. पण नंतर रथीपुराहून दलेई खुंटियानं येऊन सांगितलं की अमुरा पातशहा काही नाही, पण खुद्द नायब–नाजिम तकीखाँ येतो आहे.

पुन्हा एकदा लोकांनी घरं बंद केली. ते जंगलात निघून गेले. काही धाडसी जंगलातून रस्त्यावर नजर ठेवून बसले कोण येतो आहे तो बघायला.

त्यादिवशी अणसर पंचमी होती.

आज श्रीजीऊला धूप दीप नैवेद्य व्हायचे.

गावाच्या बाहेर सावरीच्या झाडावर चढून जो आक्रमकाची वाट बघत होता त्याच्या दृष्टीला लांबून येणारे एक घोडेस्वारांचे पथक पडले. तो लागलीच खाली उतरला व कळकीच्या बेटात दडलेल्या गावकऱ्यांना खबर देऊन आला.

"ऐका हो, गावकऱ्यांनो, अमुरा पातशा येऊन ठेपला हो."

जणू काही सगळी बित्तंबातमी आपल्याला ठाऊकच आहे अशा थाटात तो म्हणत होता,

" येणारा तकीखाँ नाही हे नक्की. कारण तकीखाँकडे एवढे घोडेच नाही आहेत, मला ठाऊक आहे ना ! "

अखेरीस मागेपुढे शस्त्रसज्ज घोडेस्वारांनी वेढलेली पालखी त्यांच्या दृष्टिपथात आली व हळूहळू गंजेइसा पीराच्या दिशेने ती जाऊ लागली तेव्हा तर लोकांना मुळीच शंका राहिली नाही की अमुरा पातशाह आले. कारण नायबनाजिम घोड्यावरून आले असते. आता काय होणार म्हणून प्रत्येकजण श्वास रोखून बघत राहिला.

पण पालखीचे मखमली पडदे दूर सारून बुरख्याने आपादमस्तक वेढलेली व सावली-सारखी असणारी रजियाबेगम बाहेर आली व गंजेइसा पीरासमोर बसून दुवा मागू लागली तेव्हा हा काय प्रकार आहे ते कुणाच्या लक्षातच येईना. सगळे गोंधळून गेले.

दुवा प्रार्थना झाल्यावर रजियाबेगम उठली व ज्या रस्त्याने आली होती त्या रस्त्याने पालखीत बसून निघून गेली. तिच्याबरोबर लष्करी लवाजमाही क्षितिजापार दिसेनासा झाला. लोकांच्या जिवात जीव आला. ते बाहेर आले. पीरापाशी जमा झाले. उदबत्त्या जळून त्यांची राख पडली होती. पण वातावरणात अजून त्यांचा सुगंध रेंगाळत होता.

शेवटी एका पठाणाने कोडे उलगडले. खोर्धाच्या मुसलमानी महाराणीची – रजिया बेगमची एक हिऱ्याची अंगठी न्हाणीघरात हरवली होती. गंजेइसा पीराला नवस बोलल्यावर ती मिळाली. म्हणून नवस फेडायला ती इथे आली होती.

सर्वजण गंजेइसा पीराचा जयजयकार करू लागले.

## 2

रजियाबेगम कटकेला परतत होती. रथीपूरपर्यंत नाही पोचली तो आकाश काळ्याभोर ढगांनी ओथंबून आले व तुफानी वादळ कैदाशिणीसारखे केस सोडून नाचायला लागले. रजियाबेगमला नाइलाजाने रथीपुरात मुक्काम करावा लागला. खोर्ध्याहून पुरीला जात असताना महाराज रामचंद्रदेवही तिथे राहिले होते. हे अनपेक्षित मीलन दोघांनाही मधुर वाटलं तर नवल नाही. तुफानात घरटं हरवून बसलेल्या पक्ष्यांसारखी दोघा-जणांनी ती रात्र रथीपुरात काढली.

मखमली बिछान्यावर गुडघ्यावर गाल टेकून रजियाबेगम खिडकीबाहेरचा म्लान चंद्रमा एकटक बघत होती. तिच्या रहस्यमय वाटणाऱ्या मोठमोठ्या डोळ्यांना एकाग्र दृष्टीने बघत रामचंद्रदेवही बसले होते. रथारूढ जगन्नाथाचे एकवार दर्शन करण्याची

विनंती रजियाबेगम करत होती. पण ही प्रार्थना, काकुळती व्यर्थ होणार आहे हेही ती जाणून होती. तकीखाँने निघतेवेळी तिला सक्त ताकीद दिली होती की गंजेइसा पीराचं दर्शन झालं की सरळ कटकेला परत यायचं. रामचंद्रदेवांना देखील रथयात्रेच्या प्रसंगी आपली प्रतिष्ठा पुन:स्थापित करायची होती व अशा वेळी रजियाबेगमचे पुरीत नुसते असणेही दोषास्पद ठरले असते.

त्याच संमोहित क्षणी रजियाबेगमने रामचंद्रेवाना आणखीही माहिती देऊन जागरूक केले. रथयात्रेनंतर अमीनचंदाला जगन्नाथ मंदिराचे सगळे हक्क तकीखाँने दिलेत. त्याचसाठी पिपिलीला मोंगल सेना एवढ्या जास्त संख्येने वाढते आहे. रथयात्रा बघण्याच्या बहाण्याने अमीनचंदही फौज घेऊन पुरीला येईल. एव्हांना तो निघालाही असेल.

रजियाकडून या सगळ्या बातम्या ऐकून रामचंद्रदेवाला वाटले की क्षणापूर्वी आकाशात जमा झालेले घन बादल आपल्याच स्वप्नाकाशात जमा झालेत व ते झाकळून गेले आहे.

सकाळी आभाळ स्वच्छ झाले होते. आदल्या दिवशी कडक उन्हात पोळणारी, रुद्र रूप धारण करणारी लाल माती रात्रीच्या पावसाने स्निग्ध बनली होती. रजिया आपल्याबरोबरचे घोडेस्वार, सैनिक घेऊन कटकच्या रस्त्याने निघाली. रामचंद्रदेवही घोड्यावर स्वार होऊन पुरीच्या बाजूला वळले. सकाळच्या धुक्यात जशी दूरची झाडी अस्पष्ट दिसते तशी रजियाची पालखी गगुआ नदीच्या वळणावर हळूहळू दिसेनाशी झाली. अगदी शेवटच्या शिपायाचे शिरस्त्राणदेखील अदृश्य झाले.

रामचंद्रदेवाने एक सुस्कारा सोडला, लगाम व्यवस्थित धरला आणि पुरीच्या रस्त्याने त्याचा घोडा दौडू लागला.

सकाळची, पावसाने सुगंधित झालेली हवा आणि अत्तरचंदनाचा वास दरवळवणारा रजियाचा प्रेममय स्पर्श नुसत्याच शरीराला झाला होता की मनालाही.....रामचंद्रदेव विचार करत होते. पण भावनेत मन रमवायला सवड नव्हती. चिंतित मनाने रामचंद्रदेव जवळपास घोटाळणाऱ्या संकटाची चाहूल घेत होते.

या वर्षी एक तर मोंगलांच्या हल्ल्याचं भय नव्हतं व जगन्नाथही पतितपावन झाले होते; पुरीच्या रस्त्यावर यात्रेकरूंची ही ऽ ऽ गर्दी झाली होती. त्यात सर्व तऱ्हेचे लोक होते. साष्टांग दंडवत घालणारे, पायी चालणारे, घोडे उंट बैलगाड्यातून बसून येणारे. ते नुसतेच येत नव्हते. गातही होते आपापल्या भाषेतली भजनं. "जगन्नाथ स्वामी नयनपथगामी भवतुमे", "भले विराजों जी जगन्नाथपुरी में", या सारख्या छत्तीसगडी गीतांबरोबर "चकाडोला आजि थका लागिलाणि" वगैरे ओडिआ गाण्यांच्या स्वरांनी

रस्ता निनादत होता. आकाशाच्या महाशून्य वेदिकेवर असंख्य प्राणांची महा ऽ आरती आपली दीपशिखा उंचावत होती, विलीन होत होती.

रस्त्याच्या थोडं खाली, झाडीला लागून पायवाट जात होती. त्यावर पायी चालणाऱ्या लोकांनी रांग धरली होती. घोड्याच्या टापेखाली किंवा बैलगाडीच्या चाकाखाली चिरडण्याचे त्यांना भय होते ना ! त्यातल्या बऱ्याच जणांचे पाय चालून चालून सुजले होते. कित्येक जणांच्या पायांना फोड झाले होते. व्रण झाले होते. त्यावर त्यांनी चिंध्या लपेटल्या होत्या आणि तसेच ते चालत होते. चालता चालता थकून जे रस्त्याच्या कडेला झोपले होते ते रात्री पावसाने पार भिजले आणि चुरगाळलेल्या कागदाचे बोळे वाटत होते. कुणाकुणाला ताप भरला होता तर कुणाला कॉलरा ! कोणी पाणी मागत होते तर कुणी कण्हत होते. बरोबरचे पुढे गेले होते. डोक्यावरचं आकाश अपरिचित, माणसं अपरिचित, झळाळणाऱ्या आकाशात घिरट्या घालणारी गिधाडे घारी...पण अशा या पवित्र भूमीवर जीवनातली अंतिम शय्या होण्यापरिस महद्भाग्य ते कोणतं ? पण पूर्वजन्मीचं संचित कधी कधी –– कधी कधी काय बरेच वेळा – आड येतं. मग या मार्गावरची धूळही पुरते. मग ही भिजलेली मातीच श्रीचंदनासारखी हळूहळू कपाळाला फासून ते मृत्यु–शीतल हात निस्त्राण होऊन जमिनीवर गळतात. यातून जो वाचला तो जिवंत स्मशानाच्या त्या शवशय्येवरून उठून क्लान्त शरीराने खुरडत खुरडत पुढचा रस्ता आक्रमतो.

"जगन्नाथा, तूच रे बाबा ! एक काळरात्र टळली !" वेदना, विषाद, यातनांनी सजलेली, मृत्युंजयी आशा व विश्वास यांची ही अशी विचित्र यात्रा रामचंद्रदेवाने केव्हाच पाहिली नव्हती.

मानव संकटाच्या निव्वळ कल्पनेनं काही घाबरून पळत नाही. तो वन्य प्राणी नव्हे. संकटं त्याचे शरीर नष्ट करतात. पण त्याचा आत्मा अजेय आहे.

रामचंद्रदेवांच्या मनात एवढा वेळचे दाटलेले भय व आशंकेचे जळमट दूर झाले. जीवनाचे रौद्रदर्शन घेऊन त्यांचे मन निर्भय झाले.

शे–शंभर मोंगल घोडेस्वार कटकेहून पुरीला चालले होते. त्यांना न्याहाळण्यासाठी रामचंद्रदेव एका झाडाच्या आड लपले.

रस्त्याने चालणारी एक युवती तेव्हा आपल्या सोबतिणीच्या घोळक्यापासून बरीच लांब राहिली होती. घोडेस्वारांना पहाताच ती घाबरून रस्त्याच्या कडेला होणार तोच एका घोडेस्वाराने तिचा पदर धरला. ती बिचारी पडता पडता कशीबशी सावरली... घोडेस्वाराच्या लालस डोळ्याकडे बघताच तिने एक किंकाळी ठोकली. त्यामुळे तर

त्याच्या हृदयातला अश्लील आनंद अधिकच उचंबळून आला. तिचे ऊर उघडे पडले होते व घोडेस्वाराची नजर तिथे डसून बसली होती. शिकाऱ्याच्या तावडीतल्या हरिणीच्या डोळ्यांसारखे तिचे डोळे भयभीत झाले होते. असहाय याचना त्यात होती. रामचंद्रदेव त्याच्यावर तुटून पडण्याच्या तयारीत होते एवढ्यात मागून मेघगर्जनेप्रमाणे आवाज आला, " खबरदार ! "

घोडेस्वारांनी वळून पाहिलं. काळ्या घोड्यावर स्वार होऊन स्वतः अमीनचंद मागे उभे होते. नाइलाजाने त्याने युवतीला सोडून दिले. सोबतिणींच्या आश्रयाला पोचण्यासाठी ती तिथून धावत सुटली. सगळे घोडेस्वार निघून जाइतो अमीनचंद तिथेच थांबले.

हळूहळू पायवाटेवरून जाणारे यात्रेकरू गेले. धुळीचा खकाणा उसळवत घोडेस्वारही दिसेनासे झाले. अमीनचंदांनी लगाम सैल सोडला, टाच मारली. घोडा दौडू लागला. झाडाच्या छायेतून रामचंद्रदेव बाहेर आले. अमीनचंदांनी बघण्याअगोदरच त्यांनी त्यांच्या घोड्याची आठोळी पकडली व थांबवले.

अचानक रामचंद्रदेवांना पाहून अमीनचंदांना आश्चर्य वाटले व कुत्सित स्वरात त्यांनी म्हटले, "सलाम आलेकूम् !

रामचंद्रदेवांनी प्रत्युत्तर केले,

" जय जगन्नाथ ".

त्याच कुत्सित स्वरात अमीनचंदांनी विचारले, " एकटेच कुठे निघालात नबाबसाहेब ? "

लगाम कसून घोड्यावर बसलेले रामचंद्रदेव काळ्या पाषाणाच्या सुघड मूर्तीसारखे दिसत होते. मुखश्रीवरच्या रेषा कठोर होत्या. डोळे राखेखाली दडलेल्या निखाऱ्यासमान. ते म्हणाले, " मी पुरीला चाललोय."

अमीनचंद म्हणाले, " रथयात्रेसाठी ? "

रामचंद्रदेव शांतपणे उत्तरले,

" त्यादिवशी खोर्ध्याच्या राजाला जगन्नाथाचा सेवक म्हणून विशिष्ट कार्ये नेमून दिलेली असतात. आपण हिंदू आहात तेव्हा आपल्याला माहीत असेलच."

" पण नबाबसाहेब, आपण म्लेंच्छ झालात. पतित आहात." अमीनचंद म्हणाले.

रामचंद्रदेवाचे मुखमंडल अधिकच कठोर झाले. तशाच कठोर स्वरात ते उत्तरले,

" जगन्नाथापाशी हिंदू–मुसलमान असा भेद नाही. सालबेगसारखा मुसलमानही त्याचा श्रेष्ठ भक्त आहे. जहांगिराच्या वेळी केशवदासासारखे हिंदूही जगन्नाथाचा

विध्वंस करायला उठले होते. त्यांना इहपरलोकी शापितच आयुष्य कंठायला लागलं ती गोष्ट वेगळी. यातून काय बोध घ्यायचा ? सांगा ! आहे काय जगन्नाथाजवळ काही भेद ? पण राजेसाहेब, आपण कुणीकडे ?"

या प्रश्नाला तावडतोब कोणतंच उत्तर अमीनचंदांनी दिलं नाही. आपल्या भरदार गलमिशांवरून हात फिरवत ते खोचक स्वरात उत्तरले, "मोंगलांच्याच हुकुमतीत नांदणाऱ्या या प्रदेशात हिंडायफिरायला मोंगलांच्या अधिकाऱ्यांना खोर्धा राजाच्या परवान्याची आवश्यकता आहे काय ? मीही पुरीलाच चाललोय रथयात्रेसाठी."

लागलीच रामचंद्रदेवांनी विचाले,

"मग हे सैनिक अंगरक्षक म्हणून आपल्याबरोबर चाललेत तर ?"

पुढे सरकण्याचा वृथा प्रयत्न करत अमीनचंद म्हणाले,

"बरोबर आहे आपला कयास. योग्य वेळ आली की बाकीही सर्व समजून येईल."

पण रामचंद्रदेवांनी अमीनचंदांच्या घोड्याचा लगाम सोडला नाही. ते म्हणाले,

"राजेसाहेब, अकबराच्या वेळेपासून अशी हमी मिळाली आहे की जगन्नाथाची ही सडक यात्रेकरूंसाठी सदा सुरक्षित राहील. बंगाल बिहार व उत्कलच्या या तिन्ही सुभ्यांचे सुभेदार असलेल्या उदार–मनस्क सुजाखाँने त्यासाठी जागोजाग चौक्याही बसवल्या होत्या. थोड्याच वेळापूर्वी आपल्या फौजेपैकी एकजण एका यात्रेकरिणीची छेड काढत होता. हीच का ती हमी ? जिझिया देऊनच्या देऊन पुन्हा बिचारे यात्रेकरू जगन्नाथदर्शनापासून वंचित ते वंचित रहातातच. दुःखाची गोष्ट अशी की आपल्या-सारख्या धार्मिक हिंदूंच्या डोळ्यांदेखत असे अत्याचार घडतात, तरीही आपण गप्पच असता. आमचंच दुर्भाग्य दुसरं काय ?"

स्वतःच्या हिंदुत्वावरचा आक्षेप जाणवून अमीनचंद उसळून म्हणाले,

"यःकश्चित् देहरक्षणासाठी आपण तर धर्म त्यागलात. आता हिंदूंच्या दुःस्थिती-बद्दल कशाला माथेफोड करता आहात ?"

रामचंद्रदेवांच्या ओठावर हलकेसे वेदनामिश्रित हसू झळकून गेले. ते म्हणाले,

"मुसलमान यात्रेकरूंना असा त्रास झाला असता तरी मी अशीच तक्रार केली असती. संकीर्ण धर्मधारणेच्या पार आहे जगन्नाथ. त्याच्या दर्शनाला जाणारे यात्री हेच मुळी एका तीर्थासमान आहेत. त्यांच्यावरची जुलूम जबरदस्ती अल्लाहतालालाही सहन होणार नाही."

अमीनचंदांचे डोळे क्रोधाने धगधगले. कमरेच्या तलवारीवर हात ठेवून ते म्हणाले, "मला जाब विचारताहात आपण ?"

तत्काळ त्यांच्या घोड्याचा लगाम रामचंद्रदेवांनी सोडून दिला. म्हणाले, "छ, छे, आपण किंवा आपल्यासारखे काय जाब देणार याचा ? दिलाच तर खुद्द नायबनाजिम तकीखाँ देतील. राजा अमीनचंद, आपल्या दृष्टीने तर मी धर्मच्युत आहे. पण एक गोष्ट सांगू काय ? हिंदुस्थानात हिंदूच हिंदूधर्माचे शत्रू आहेत. म्हणून तर फक्त स्वार्थ साधणे हाच एक धर्म उरला आहे अन् तो मात्र प्राणपणाने प्रत्येकजण पाळतो आहे. जावं आपण. आपण व मी; हिंदू न् मुसलमान एकाच नावेचे उतारू आहोत. मला कोणताही जाब देण्याची जरूर नाही. द्यायचाच असला तर स्वतःच्या सदसद्विवेक-बुद्धीला द्या, इतिहासाला द्या."

मूक धगधगत्या क्रोधाने रामचंद्रदेवांकडे पाहून, घोडा सोडवून अमीनचंद निघून गेले. पण त्यांच्या डोळ्यात इशारा होता,

'हाफिज कादर, भविष्यात डोकावून बघितलं नाहीत तुम्ही. जाब तुम्ही द्यायचाय. तयार रहा त्यासाठी.'

काही पावलावर एक मोठे वडाचे झाड पारंब्या पसरून उभे होते. तिथवर पोचल्या-वर अमीनचंदांनी मागे वळून पाहिले. रामचंद्रदेव प्रस्तरमूर्तीवत् तसेच तिथे उभे होते. त्यांनी म्यानातून तलवार उपसली व एकाच वारात बऱ्याच पारंब्या कापून टाकल्या.

रामचंद्रदेवांच्या जवळच रस्त्याच्या बाजूला केवड्याच्या झाडांखाली एक प्रेत पडलं होतं. काही गिधाडांना त्यांचा वास लागला होता व ती वर घिरट्या घालत होती. काही त्याच्या सभोवार बसली होती. घोड्यावरून उतरून रामचंद्रदेवांनी तलवारीच्या फटक्याने त्यातल्या कित्येकांची मुंडकी छाटली. त्यांची उरलेली मस्तकहीन धडं प्रेतावर नाचू लागली. बाकी उडून गेली. गिधाडांच्या रक्तानी ते थंडगार प्रेत लालभडक झालं. झुडुपात दडून एक कोल्हा त्या रक्तरंजित प्रेताकडे लालचावून बघत होता.

रामचंद्रदेवांच्या मस्तकात खून शिरला. त्यांनी एक अट्टहास्य केलं. त्यामुळे घाबरून कोल्हा पळून गेला.

एखाद्या तुटून पडलेल्या उल्केप्रमाणे रामचंद्रदेवांनी घोडा फेकला व अमीनचंदाला ओलांडून ते पुरीच्या दिशेने मार्गस्थ झाले.

## 3

अमीनचंदांनी पाहिलं हातात फक्त दोनच दिवस आहेत.

आज अणसर द्वादशी झाली. उद्या नवयौवन दर्शन. त्यानंतर आषाढ शुक्ल द्वितीयला रथयात्रा.

अमीनचंद सत्ता हाती घेऊन पुरुषोत्तमक्षेत्रात आले तेव्हापासून याच प्रयत्नात होते की रामचंद्रदेवांना छेरापहेरासारखी धर्मकृत्ये करता येऊ नयेत. कारण त्यांच्या मनात साधार भीती होती की एकदा का रूढीनुसार चालत आलेली धर्मकृत्यं रामचंद्रदेवांना करू दिली तर त्यांची जनमानसातली राजप्रतिमा दृढ होऊन जाईल. पाइक, दुर्गपती, सामंत वगैरे पुन्हा त्यांचे नेतृत्व मानतील. ओडिसाची प्रजा पुन्हा त्यांच्या भजनी लागेल. खोर्धा राजा जेव्हा राजसेवकाची कार्ये करतील तेव्हा त्यांच्याबरोबर रहाण्यासाठी अठरा प्रदेशांचे राजे आले होते. मोंगलांच्या ताब्यातल्या प्रांतांचेही जमीनदार, हरिपूर, मयूरभंज वगैरे भंजराजेही ससैन्य पोचले होते. कारण पारंपारिक विधीप्रमाणे त्यांनी खोर्धा राजावर छत्रचामरे ढाळायची असतात.

या धार्मिक विधींनी उत्कलच्या सर्व राजपुरुषांना एकत्र बांधून टाकलं होतं. हीच मोडण्यासाठी तकीखाँने हरप्रयत्न केले होते; पण जोरदार नदीच्या प्रवाहात वाळूचे बंधारे वाहून जावेत तसे ते निष्फळ झाले होते. तकीखाँने अमीनचंदाला अधिकार देऊन पुरीला पाठवलं होतं. काही ना काही खुसपट काढून धर्मच्युत रामचंद्रदेवाला धार्मिक कार्य करण्यापासून परावृत्त करण्यात यश मिळालं व स्वत: अमीनचंद जर छेरापहेरादी करू शकला तर केवळ तकीखाँचाच हेतू साध्य होईल असं नाही तर दिल्लीपासून मुर्शिदाबादेपर्यंत अमीनचंदाच्या नावाचा जयजयकार होईल. कटकच्या दरबारात अमीनचंदाचे वजन कल्पनातीत वाढेल.

पण जगन्नाथ पतितपावन बनले. त्या आधारावर मुक्तिमंडपाच्या कर्मठ ब्राह्मणांनी आणि समस्त भारतातल्या शास्त्री–पंडितांनी राजाला छेरापहेरा करायला अनुमती दिली. अमीनचंदाची आशा व त्यावर उभारलेला इमला जमीनदोस्त झाला.

म्हणून तर पुरीला पोचल्या दिवसापासून अमीनचंद मोठे पुरोहित गौरी राजगुरूंशी सल्लामसलत करत होते. रामचंद्रदेवांचा काटा काढायचा उपाय शोधत होते. चिलिकेच्या किनाऱ्यावरचा अंधारी परगणा त्यांनी राजगुरूंना देऊ केला होता. पण मुक्तिमंडपाने जो निर्णय दिला तो कसा बदलायचा? शिवाय थोरले उपाध्यायपण आणि त्याची वृत्ती राजाच्या कृपेवरच अवलंबून असते. म्हणून तर अंधारी परगण्याची लालूच असूनही राजगुरू अजून तरी काही करू शकले नव्हते. पण अमीनचंदांनी हातपाय गाळले नव्हते. त्यांनी इतरही सेवकांचे साहाय्य घेतले व ते प्रयत्नांच्या खटपटीला लागले होते.

अणसर द्वादशीच्या दिवशी दइता, पति महापात्र, स्वाई महापात्र, तलिछो महापात्र,

तढाऊ पट्टनायक, देऊल करण वगैरे मंदिराच्या सेवकांना राजा वस्त्रे देतो. हाच रथयात्रेच्या विधींचा श्रीगणेशा. त्या वेळी जर या सेवकांनी म्लेंच्छ राजाने दिलेली वस्त्रे घेणे नाकारले तर मग मुक्तिमंडपाचा निर्णय निरर्थक होईल. यातले दइता व पति महापात्र तर जगन्नाथाचे आदिसेवक आहेत. स्नानपौर्णिमेपासून ते रथयात्रेपर्यंतचे सगळे विधी हेच पार पाडतात. यांच्यावर मुक्तिमंडपाचे वजन नसते. ते जर त्यावेळी अडून बसले तर कुणाचे काही चालणार नाही. त्यांनी तसं करावं म्हणून अमीनचंदने पति महापात्र षेंढ सुआरला हाताशी धरले होते. त्याला थोडीशी बक्षिशीही विसार म्हणून मिळाली होती.

अणसर द्वादशीच्या मंडपाचा नैवेद्य होऊन चुकला होता. यानंतर दक्षिणेच्या द्वारातून चांदीच्या थाळ्यातून 'पाटडोर' घेऊन सेवक 'श्रीनवर'साठी बाहेर निघणार. षेंढ सुआरने वचन दिलंय श्रीनवरच्यावेळी जेव्हा राजा वस्त्रदान करील तेव्हा तो भांडण वादविवाद सुरू करील. आता ती वेळ आली आहे. म्हणून तर अमीनचंद मंदिरात त्याला शोधत इकडे तिकडे भटकत होते.

स्नानमंडपात (भाजणा मंडपात) एक म्हातारी यात्रेकरू बाई व तिच्याबरोबरच्या काही विधवा उभ्या होत्या; आणि पंड्यांचे दोन गट त्यांना घेरून एकमेकांशी भांडत होते. तिथे प्रत्येक गुरुवारी लक्ष्मीचे स्नान होते. इथेच रुक्मिणीचा विवाहही होतो. सहस्र कुंभाभिषेकही इथेच होतो. म्हणून यात्रेकरूंच्याकडून आलेल्या दक्षिणेचे वाटपही इथेच होते. लक्ष्मीच्या स्नानपूजेत मिळणारी कवडी महाजन घेतात व पूजेत जे काही असतं ते पंड्यांचं ! रुक्मिणी–विवाहाच्या वेळी जे पैसे मिळतात ते महाजन व पंडे वाटून घेतात. सहस्र कुंभाभिषेकाच्या वेळचं जे काही असतं ते पति महापात्रांचं असतं. हे सारे विधी व नियम केव्हापासूनचे आहेत. पण तरीही दक्षिणेवरून इथे अहर्निश भांडणं झगडे चालू असतात. विशेषत: रथयात्रेच्या वेळी तर बळी तो कान पिळी असा प्रकार होत असे.

त्याचवेळी काही यात्रेकरू बायकांना दोन पंड्ये स्नानमंडप दाखवत होते. सांगत होते की येथे नवस बोलल्याने सर्व इच्छा पूर्ण होतात. लक्ष्मीदेवीच्या स्नानासाठी (मार्जनासाठी) दिलेल्या दक्षिणेने साक्षात् जगन्नाथ संतुष्ट होतात...वगैरे वगैरे. असं हे त्या मंडपाचं महत्त्व ऐकून यात्रेकरिणीनेही आपली दक्षिणा थोडीशी वाढवली. एरव्हीही तिने तांब्याचे एखादे नाणे किंवा कवडी ठेवलीच असती. पण त्या बायकांच्या सांपत्तिक स्थितीबाबतचा पंड्यांचा अंदाज वेगळाच होता. त्यांनी जी दक्षिणा ठेवली ती पहाताच त्यांचे पित्त खवळले, आणि महाजन मंडळाच्या दाम सुआरने त्या बाईचा दंड पकडला आणि भांगेच्या अमली स्वरात तो म्हणाला,

"अग ए बाई, हे काय ठेवलंस ? आं ? काय लक्ष्मीला भिक्षा घातलीस का तिच्यावर उपकार करतीस ? कमीत कमी एक चांदीचा जहांगिरी रुपया तरी ठेव. ठेव, ठेव."

आपल्या शरीराला झालेला तो अनोळखी पुरुषी स्पर्श बघून यात्रेकरू बाई शहारून मागे हटली. तिच्या त्या घाबरगुंडीने दाम सुआर व देवळाचा इतर नोकरवर्ग खी खी करून हसू लागला; त्यातल्या ज्या तरण्याताठ्या होत्या त्यांच्याकडून दक्षिणा वसूल करण्यात काहीजण रसिकतेची परमावधी दाखवू लागले. त्या यात्रेकरूंच्याकडे पैसे नव्हते असे नाही पण पंड्यांनी विचार केला की त्यांचे पैसे सगळे इथेच दक्षिणेत संपले तर पुढच्या दक्षिणेचे प्रमाण अर्थातच कमी होणार. साधारणपणे, दक्षिणेची वाटणी महाजनमंडळाच्या दाम सुआर व बलिआ पूजा पंडा यांच्यात होते. दोघेही मल्लांसारखे दिसतात. आणि त्यांच्या काया म्हणजे जणू लोखंडी मूर्तीच ! बलिपंडा आपल्या ढेरपोटावर कनवट आवळून अंगरखा सावरून दाम सुआरचे हात पकडून ओरडला,

"माझ्या यात्रेकरूंना शिवणारा तू कोण रे नालायक ?"

हे आह्वान ऐकून दाम सुआर धनुष्यासारखा एकदम सज्ज झाला. त्याने शेंडीची गाठ मारली, बाईचा दंड अधिकच मजबूतपणे पकडला व दुप्पट जोरात आवाज लावला, "साल्या, तू कोण विचारणारा ? या यात्रेकरूंशी तुझं काय काम ? आं ?"

त्याचे हे चढाऊ पवित्रे बघून बिचाऱ्या यात्रेकरू बायका घाबरल्या. अमीनचंद काही अंतरावरून हा क्लेशदायक वाटणारा प्रकार बघत होते. त्यांच्या मनावर तकीखाँचा प्रभाव होता व मुसलमानांकडून जगन्नाथपीठावर आक्रमण व्हावं अशा खटपटीतच ते होते हेही खरं होतं. त्यात त्यांचा स्वार्थही होता. पण जगन्नाथाच्या दर्शनाला आलेल्या यात्रेकरूंचे जगन्नाथाच्याच सेवकांनी असे हाल करावेत हे बघून त्यांनाही राग आला.

एवढ्यात आणखी एक गोष्ट घडली. यात्रेकरू बायांच्या तोंडची बोली त्यांनी ऐकली. म्हणजे या त्यांच्याच मुलखातल्या बाया ! रागाने ओरडत ते पुढे धावले.

त्यांच्या तोंडचे "चला हटा" असे रागीट शब्द अगदी आकस्मिकपणे कानावर आदळल्यामूळे मघा रागाने तांडव घालणारे ते वीर दबकले आणि त्या बायकाही य:पलायते करून कल्पवटाखाली उभ्या असलेल्या त्यांच्या सोबतिणींच्या घोळक्यात गेल्या.

आपल्या अगदी आटोक्यात असलेली यात्रेकरू बायकांची शिकार काढून नेल्यामुळे दाम सुआर एकदम भडकला व अमीनचंदवर खेकसला, "तुम्ही या देवळात कशाला आलात ? इथे काय पठाणांचे न् नायब–नाजिमांचे पाय चाटायचेत ? मोठे आले लाल डोळे करून केव दाखवायला ! हे कृष्णबळिरामचं जागृत स्थान आहे, समजलात ?"

त्याच्या या स्फोटाने अमीनचंदही हादरून गेले. दाम सुआरचे कसलेले शरीर बघून तेही हे आह्वान स्वीकारायला कचरले.

दोन पंड्यांच्या क्षुद्र भांडणात तकीखाँचे नायब असलेल्या अमीनचंदांना पडलेलं पाहून सगळ्यांना आश्चर्य वाटत होतंच. अमीनचंदांना मनसबदारी मिळाली होती व शिवाय पुरुषोत्तमक्षेत्राची देखभाल करण्यासाठी त्यांना तकीखाँने खास पाठवलं होतं. पंड्यांकरवी झालेला अपमान त्यांना अर्थातच असह्य झाला. त्यांनी कमरेला खोचलेला सुरा काढला व ते दाम सुआरवर चालून गेले.

पण दाम सुआर त्याने डगमगणारा नव्हता. शिवाय भांगेची तार चांगली सप्तमात गेली होती. आखाड्यात लोळून शरीर कमवलेलं होतं. तोही अमीनचंदच्या दिशेने दोन पावले पुढे सरकला व ओरडला,

"अरे जा रे, विंचू कसा उतरायचा माहीत नाही न् चालला काळ्या नागाला डिवचायला. हा काय नायबनाजिमाचा दरबार आहे तो मला धाक दाखवतोस ? हे त्या महाप्रतापी जगन्नाथाचं श्रीवत्स खंडशाला मंदिर आहे. हलकटा, माझ्यावर डोळे वटारून काही होणार नाही. हिंमत असेल तर चल उतर आखाड्यात. एकदा होऊनच जाऊ दे."

कंबर कसून दाम सुआर असा काळभैरवासारखा थयथयाट करू लागला तेव्हा आजूबाजूचे नोकर, पंड्ये एकमेकात बोलू लागले,

"हा मेला पठाणाच्या उष्ट्या तुकड्यावर जगणारा मोठा आला पुरुषोत्तमक्षेत्राचा प्रमुख बनायला ? गुरूचा मुलगा गुरू न् भाटाचा मुलगा भाटच व्हायचा. ठरलेलंच आहे ते."

अजून दोन्ही पक्षांचं वाग्युद्ध जोरात चालू होतं, एवढ्यात गलबला ऐकून हातातली सोन्याची छडी फिरवत महाउपाध्याय गौरी राजगुरु तिथे आले. अमीनचंदांना भांडणाच्या मध्यभागी बघून त्यांनी लागलीच त्यांचा दंड पकडला आणि म्हणाले, "राजेसाहेब, आपण इथं काय करताहात ? या नोकर लोकांची जर अशी कुरापत काढलीत तर आपल्याच कार्याची हानी होईल. समजलं ना ?"

महाउपाध्यायांना पाहून तलिछो महापात्रने त्रासिक स्वरात म्हटले, "चला, चला तुम्ही. तिकडे ते द्वादशीचे विधी खोळंबलेयत. अरे ए प्रतिहारी भोली बडु, अरे आज काही काम होणार आहे की नाही ? श्रीनवरसाठी थाळी केव्हा जायची ? आं ?"

महाउपाध्यायांना तिथे पाहून बाकीचे नोकर इकडे तिकडे पांगले. मंदिराच्या आवारात उत्सवादि प्रसंगी असे प्रकारे नित्याचे होते.

अमीनचंदांनी गुळमुळीत स्वरात तिथे येण्याचे कारण दिले,

"मी इथे षेंढ सुआरला शोधत शोधत आलो होतो."

राजगुरु हलकेच त्याच्या कानात म्हणाले, "यावेळी तो 'मेरदा रोष' मध्ये किंवा 'सरघरात' झोपला असेल. या बाजूने चला."

दक्षिणेच्या तटाला लागूनच मेरदा रोष होते. अमीनचंद त्या बाजूने चालू लागले. पाठीमागून हाक मारून राजगुरूंनी सांगितले,

"त्याला लवकर पाठवा. देवासमोर थाळचा ठेवायची वेळ झाली आहे."

दक्षिणेच्या अंगणात मेरदा रोष, सरघर वगैरे काही खोल्या आहेत. वर्षभर त्या अशाच रिकाम्या पडलेल्या असतात. मंदिराचे रांधपघर जेव्हा रंगवायला काढतात तेव्हा या खोल्यांचे पाकशाळेत रूपांतर होते. उपाध्यायांना थोडं बहुत काही देऊन षेंढ सुआरने या खोल्या स्वत:च्या वापरासाठी ठेवल्या आहेत. कोणी खास यात्रेकरू किंवा यजमान आले तर त्यांना उतरायची व्यवस्था इथे केली जाते. तशी ही घरंच आहेत. आत गुहेसारखा अंधार आहे. दक्षिण तटावर एक शेंदूर थापलेली हनुमानाची मूर्ती आहे. त्याची रोज पूजा झालीच पाहिजे असा काही दंडक नाही. कधी कधी सुआरांचे हनुमानप्रेम उचंबळून येते; तेव्हा मग सुआर स्नान करून त्याची पूजा करतात. एरव्ही, आपलं भांग घोटल्यावर त्याला नैवेद्याच्या रूपात जी काय दाखविली जाईल तेवढयावरच संतुष्ट होऊन हनुमान आपले रक्षकाचे काम चोख बजावतात.

षेंढ सुआर डोक्यावरच्या केसांच्या गाठीत नागचाफ्याच्या फुलांची माळ बांधून भांगेच्या नशेत चूर होऊन झावळांच्या चटईवर पडला होता. बाहेर व्हरांडयात भांग घोटण्यांचा पाटा वरवंटा पडला होता. एक उष्टी थाळी व आमटीचे रिकामे परळ होते. त्यावर माशा भणभणत होत्या. मधूनच काही तिथून उठून षेंढ सुआरच्या गालावर बसत होत्या. त्याच्या गालावरून लाळेचे ओघळ दोहो बाजूंनी वहात होते.

महाउपाध्यायाने आरडाओरडा केल्यामुळे बंडावर्तावर देवासमोर नैवेद्य ठेवण्या-वेळचा गालीचा म्हणजेच पाहाडा घालावयास सुरुवात झाली होती. घंटा वाजत होत्या. त्या घणघण आवाजाने षेंढ सुआरचे जड झालेले डोळे हळूहळू उघडत होते. मनात अगदी अस्पष्ट असे विचारांचे बुडबुडे उठत फुटत होते, 'आज काही आपलं काम नाही', 'फक्त अमीनचंदांनी सोपवलेलं काम तेवढं आपण करायचं आहे' वगैरे. म्हणून तर द्वादशीच्या थाळचा ठेवण्याच्या विधीची प्रतीक्षा करत असताना भांगेच्या जादूने त्याच्या पापण्या हलकेच मिटल्या.

घंटेच्या आवाजाने जेव्हा त्याची झोप उघडली तेव्हा हवा ढगाळ होती, मनावर भांगेचा परिणाम होता; अर्थात् दिवसाचा कोणता प्रहर, काय याचा काही पत्ता

लागणं कठिण जात होतं. इतकंच काय, आपण आता नक्की कुठं आहोत – स्वर्गात, पाताळात की आपलं इहलोकातच याचाही ठावठिकाणा त्याला समजेना. समोरची शेंदूरचर्चित हनुमानाची मूर्ती पाहून आपण अजून इहलोकात आहोत याची खात्री त्याला पटली. एवढी जबरदस्त नशा चढायला तसंच कारणही होतं. पैज लावण्याच्या त्याच्या सवयीने आज भांगेत धोत्र्याच्या काही काही बिया, गांजाच्या तीन चार कळयादेखील घोटल्या होत्या; आणि उगीच आपले दोनचार थेंब नागाच्या विषाचे ! पण मिश्रण काय झकास बनले होते ! ! मात्र विमान खाली उतरायला जरा त्रास होत होता. त्याची झोप उघडली कशीबशी पण नशा अद्याप उतरली नव्हती. उठून बसायचा निकराचा प्रयत्न तो करत होता. पण सालं डोकं भलतंच जडशीळ झालं होतं; आता ते सावरून कसं उठायचं हा एक प्रश्नच होता. त्याला महाप्रचंड जांभया आल्या. थोडंसं हलकं वाटायला लागलं. त्याचवेळी अमीनचंद 'मेरदा रोष 'च्या सोप्यात येऊन दारातून डोकावत विचारत होते,

" षेंढ सुआर आहे काय आत ?"

चटईवर पडल्या पडल्या सुआर ओरडला,

" आला कुणी प्रेमळ यजमान ! साला अगदी नावाने हाका मारतोय. सुआर एका जगन्नाथाशिवाय कुणाच्या मिठाच्या चिमटीचा मिंधा नाही; समजलास ? असशील यजमान म्हणून काय मला विकत घेतलंयस ?

अमीनचंदांना त्याचे हे स्वगत काही कळले काही पण त्यांनी त्याचा आवाज ओळखला आणि ते आत आले. त्यांना पहाताच सुआरचा गोंधळ उडाला, त्याचे चित्त ताळयावर आले. नशा खाडकन् उतरली.

रागीट स्वरात अमीनचंद म्हणाले, " छान ! तू इथं घोरत पड. तिकडे राजप्रसादासाठी थाळचा पोचल्यादेखील. आता कसलं काम होतंय ?"

तो उठून उभा राहिला. अमीनचंदांना आश्वासन देत म्हणाला,

" छे छे असं कोण म्हणतं ? कोण कुठं नाहीसं होतं आहे महाराज ? जगन्नाथ काही स्वत: उठून कुठं जाऊ शकत नाही. त्याला हातपायच नाहीत. तुम्ही न् मी तरी कुठं जातो आहोत ? एका जागी नुसतं उभं राहून पाय हलवतो आहोत. महाराज, हे बघा, थोडं धीरानं घ्या. हा मी निघतो. सगळं व्यवस्थित होईल."

त्याने पैरण घातली. उपरणं कमरेला बांधलं; आणि तो दरवाज्याच्या दिशेने निघाला. एवढयात कसलीशी आठवण होऊन तो मागं वळला. अमीनचंदपाशी येऊन म्हणाला,

" आज अणसर द्वादशी. पण सकाळधरनं एक तांब्याचा पैसा दृष्टीला पडला असेल तर शपथ. एक अशर्फी तरी द्या महाराज."

एका अशर्फीनं काम व्हायचं नाही हे अमीनचंद जाणून होते. पण बडबडण्यात वेळ घालवूनही उपयोग तव्हता. अशर्फी दिली नाही तर षेंढ सुआर एक पाऊल उचलणार नाही याची त्यांना पूर्ण खात्री होती. आतापर्यंत राजप्रसादात प्रसादी थाळचा पोचल्याही असतील. नायब नाजिम तकीखाँच्या दरबारातही असंच होत असतं. कुणा गरजू जमीनदाराला जहागीरदाराला जेव्हा दरबारात आपली कैफियत मांडायची असते तेव्हा ऐन मोक्याला मध्येच अडून बसून तेही आपला हिस्सा काढून घेत असत. तेव्हा षेंढ सुआरला अशर्फी द्यायला त्यांनी वेळ लावला नाही. ती कनवटीला लावत एखाद्या माजलेल्या वळूप्रमाणे षेंढ सुआर दक्षिण द्वारेच्या लंडावर्ताकडे निघाला.

त्यावेळी प्रसादासाठी खास बिछायत वगैरे तयार झाली होती. सगळे दइता पति अणसर–पीठावर थाळचा घेऊन येण्यासाठी सज्ज होते. कमरेत झुकत वाकत पुन्हा सरळ होत, पिंगा घालत घंटा वाजवणारे आपलं काम करत होते. शिंग वाजत होतं. तसं बघण्याजोगं काही नसूनही चारी बाजूला माणसांची ही थप्पी लागली होती.

इथे येताच षेंढ सुआरला आणखी एक अशर्फी द्यावी लागली. आता त्याच्यावर सोपवलेल्या कामाबद्दल निःशंक होऊन अमीनचंद त्या गर्दीत मिसळले.

चांगडा मेकाप भंडारघरातून तीन चांदीच्या थाळचा घेऊन आला आणि त्या सजवून त्याने बिछायतीवर ठेवल्या. दइता त्यांवर पट्टवस्त्र सजवू लागले. त्यावेळी दोउकरण दैतारी पट्टनायक रुष्ट स्वरात म्हणाले,

" अरे फक्त तीनच थाळचा काय ठेवल्यात ? चार ठेवायचा हुकूम होता ना ?"

पण चांगडा मेकापला हे मान्य नव्हते. तो म्हणाला, " दरवर्षी तर तीनच थाळचा असतात. एक महाराजांची, एक महाराणींची व तिसरी युवराजांची! गेल्या वर्षी बक्सी वेणू भ्रमरवरची एकच थाळी होती. याचवेळी चवथी थाळी कुणासाठी ?"

दोउकरणाकडे याचं उत्तर नव्हतं म्हणून तो म्हणाला,

" पायावर पाणी घाल म्हटलं तर तेवढंच करावं. तोरडचा किती तोळ्याच्या हे विचारायची गरज काय ? भंडारघरातून आणखी एक थाळी आणा जा."

चांगडा मेकाप निघून गेला.

त्याचवेळी धापा टाकत षेंढ सुआर तिथं पोचला आणि कर्कश स्वरात विचारू लागला,

" ही जास्तीची थाळी काय महाराजांच्या यवनी रखेलीची की काय ? दरवर्षी तर तीनच थाळचा असतात. आज चौथीचं काय काम ?"

ज्या तऱ्हेनं षेंढ सुआरने ही गोष्ट मांडली त्यामुळे तिथे असलेल्या सगळ्या सेवकांना हसू आलं. त्यामुळे सुआरला जोर चढला. आणखी फुशारून तो म्हणाला,

" आग लागो तुम्हाला न् तुमच्या त्या हातांना ! मेल्यांनो, राजाने धर्मत्याग केला. तो झाला मुसलमान. आणि तुम्ही त्या यवनीची थाळीदेखील मांडायला निघालात. वा, वा ! मुसलमान राजाने स्पर्श केलेले कपडे घालून रथयात्रा सुरू करणार ! काय म्हणावं रे तुम्हाला ?"

या सगळ्याचा रोख हा असा असेल याची कुणाला कल्पनाच नव्हती. जो तो एकमेकांचं तोंड बघायला लागला. तेवढ्यात सुआरला त्या गर्दीत उभे असलेले अमीनचंद दिसले. आणखी आवाज चढवून तो म्हणू लागला,

"यावर्षी राजप्रासादात थाळ्या नाही जायच्या. राजाने तर धर्म सोडलाच आहे. यावर्षी ' छेरापहेरा ' तो कसा करील ? रथाला शिवावं लागेल ना !"

गोष्ट इथवर आली तशी दोउकरणने पृच्छा केली, "मग राजाने करायच्या विधींचं काय ? ते कोण करील ?"

षेंढ सुआरने उत्तर दिले,

"राजा अमीनचंद करतील. नाहीतरी श्रीक्षेत्राचे नायब बनून आलेच आहेत ते. गतवर्षी वेणु भ्रमरवरने नव्हते का राजविधी केले ? या वर्षी राजा अमीनचंद करतील."

राजा अमीनचंदाचे नाव ऐकताच तिथे असलेले काही राजसेवक फणकारून उठले. काही वेळापूर्वीच अमीनचंदाने त्यांचा अपमान केला होता तेही एक प्रमुख कारण होतंच. ते आपसात म्हणू लागले,

"स्वत: श्रीप्रभू पतितपावन झालेत त्याचं काहीच नाही. मुक्तिमंडपाच्या ब्रह्मचाऱ्यांचा निर्णयही महत्त्वाचा नाही; आणि हा पठाणांचे जोडे चाटणारा म्हणे छेरापहेरा करणार ! हं !!"

एकंदर परिस्थिती बघून छोटे उपाध्याय विष्णु महापात्र अणसर पीठाकडे प्रसाद-थाळ्या पाठवायला सांगणार होते. त्यातच चांगडा मेकापने नैवेद्याची आणखी एक थाळी आणून ठेवली. घंटा आणि शिंगांचा आवाज एवढा मोठा होत होता की षेंढ सुआर व इतर सेवक यांच्यातली बाचाबाची ऐकूच येत नव्हती. दइत थाळ्या घेऊन जात होते आणि अणसर पीठाकडे परत आणत होते.

तलिछो महापात्रने पधानाला हाक मारून म्हटले, "अरे जरा लवकर लवकर आवरा. आज सगळ्यालाच उशीर झालाय."

जेव्हा जेव्हा दइत थाळचा खांद्यावर घ्यायचे तेव्हा तेव्हा शिंगं आसपासचं वातावरण दणाणून सोडायची. सगळेजण उच्च स्वरात म्हणू लागले, "श्री जगन्नाथ आपली मायापाखर घालून खोर्धा राजाचं रक्षण करा." तशी सगळ्या यात्रेकरूंनी जयजयकार केला.

शंख शिंगं घंटांचा आवाज, यात्रेकरूंचा जयजयकार यांनी मंदिराचं आवार दुमदुमून गेलं. दइता पति, स्वाई महापात्र, देउकरण, तलिछो महापात्र इत्यादि सगळे सेवक प्रसादाच्या थाळचा घेऊन राजप्रासादाकडे मिरवणुकीने निघाले.

संध्याकाळच्या लांब सावल्या व राजप्रासादाकडे निघालेली ती गजबजती मिरवणूक यात दोघेजण निराश होऊन ठोकळचासारखे उभे होते मोठे उपाध्याय गौरी राजगुरू व राजा अमीनचंद. षेंढ सुआरला इकडचेही सुखदु:ख नव्हते, की तिकडचे सोयरसुतक होते. आपला वाटा मिळवण्यासाठी मिरवणुकीच्या मागोमाग तोही चालता झाला.

## 5

आषाढ शुक्ल द्वितीया—

आज रथयात्रेचा दिवस. नीलाचल गजबजून गेला होता. बलगंडिपासून सिंहद्वारापर्यंतचा रस्ता लोकांनी खचून गेला होता. सगळेजण टाचा उंचावून, माना वर करकरून पहात होते की रथापर्यंत मूर्तींची मिरवणूक कधी येते. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत ते द्वारकेपासून बंगालपर्यंत सगळा भारत आपापली वेषभूषा, अलंकार यांनी मंडित सिंहद्वारापाशी ताटकळत होता. अनेक भाषांचा कोलाहल माजला होता. अनेक वर्णांचे जणू संमेलनच भरले होते. सगळचांनाच काही परमार्थाची ओढ व ईश्वरभक्ती खेचत नाही. यात्रेत दिसणारे लावण्य व गजगामिनी युवती पहाण्यासाठी बरेच रसिकही आलेले असतात. स्तनप्रदेशावर हळदीची उटी माखलेल्या तरुणी सोबतिणींच्यापासून थोडचा अलग पडल्या की हे रसिकवर त्यांच्या आगेमागे घुटमळत. कधी धीटपणे स्पर्शसुखही अनुभवत. बिचाऱ्या तरुणी ! त्यांचे अंगांग रोमांचांनी डवरून जाई. मात्र त्यांचे नेत्र नुसते दटावत असत. त्यात क्रोध नसे.

अशाच एका 'पावन' झालेल्या रसिकाला त्याचा मित्र म्हणाला,

"काय राव, रथावरच्या जगन्नाथाचं दर्शन होण्यापूर्वीच फळही मिळालं की तुम्हाला !"

रसिक उत्तरला,

" फळ मिळालं रे ! पण सिंहद्वाराची चंदनसाखळी उघडली नाही ना अजून ? पूजा व्हायचीय. " आणि दोघंही हसले.

या थट्टेचा प्रमुख विषय असलेल्या त्या युवतीचे तोंड वरच्या उन्हाने नव्हे तर या थट्टेनेच गोरेमोरे झाले.

गौड प्रदेशातून आलेले वैष्णव मधुराभक्तीत बुडलेले. काकुळतीला येऊन कृष्णाला शोधणाऱ्या गौळणींप्रमाणे ते गात होते, " कहाँ तुहूं ब्रजेन्द्रकुमार. "

उत्कलच्या वैष्णवांना भक्तीची ही तऱ्हा हीन वाटायची. ते मृदंग वाजवीत, कपाळाला आठ्या घालून म्हणत होते,

" जय जय अणाकार नीलाद्री बिहारी है. "

रस्त्याच्या दोन्ही बाजूला दुकाने थाटून बसलेले दुकानदार गिऱ्हाईकांचे लक्ष वेधून घेण्याची पराकाष्ठा करत होते. त्या एवढ्या थोरल्या गर्दीत, उन्हाच्या कहरात कुणी रुग्ण, थकलेला यात्रेकरू मटकन् खाली बसत असे व इथेच डोळे मिटले तर देहाचे सार्थक होईल अशी आशा करत असे. साधू व तरुणी, शृंगार आणि मृत्यू, भक्ती व उन्मत्तपणा, तुच्छता व नेमस्तपणा – संपूर्ण जीवन सर्वांगानी इथे फुलले होते व एका अनाकलनीय निश्चिततेसाठी एक प्रतीक्षा त्याच्या पोटात होती. बंद सिंहद्वारावर सर्वांची दृष्टी लागून राहिली होती. ते कधी उघडेल, ठाकुरांची मिरवणूक रथांच्या दिशेने कधी येऊ लागेल याची सर्वजण चातकासारखी वाट बघत होते. भर दुपारी आकाशात देखील ढग व उन्ह यांच्यात हीच शर्यत लागली होती की रथयात्रा पहायला पुढे कोण होतो ?

मध्यान्ह व्हायला आली होती. दरवर्षी हावेळपर्यंत ' छेरापहेरा ' म्हणजे राजाने केरसुणीने रथ झाडण्याचा विधी सुरू होतो.

पण या वर्षी काय झाले होते कोण जाणे, देवमूर्तींची रथापर्यंतची मिरवणूकच अजून आली नव्हती. पण कारण जाणून घेण्यासाठी भक्तांपैकी कुणीही आतुर नव्हता झाला. ज्यांचा एकादशीचा उपास होता व दर्शन झाल्यावर सुटणार होता तेही याची फिकीर करत नव्हते. फक्त प्रत्येकाची दृष्टी सिंहद्वारावर खिळली होती. ते कधी उघडेल व महाराजाधिराज श्री जगन्नाथ कधी दर्शन देतील याची प्रत्येकजण वाट बघत होता. शतकानुशतके धुळीत, गहन अरण्यात पडून रामचंद्रांच्या पावलांची प्रतीक्षा करणाऱ्या अहल्येची सहनशक्ती व ही सहनशक्ती यात अंतर नव्हते.

सिंहद्वाराच्या सन्मुख पताका, व फूलमाळांनी सजवलेले तीन रथ बलभद्र, सुभद्रा व

जगन्नाथाची प्रतीक्षा करत होते. त्यांची सजावट बघण्यासाठी चारी बाजूंनी हळूहळू गर्दी वाढतच होती. अनंत काळ वाट बघून मग फलप्राप्ती झाल्यावर जसा आनंद होतो तशा आनंदात तल्लीन झाल्यागत रथावरचे ध्वज वाऱ्याच्या झुळुकांनी डोलत होते. रथावरच्या शिड्यांवरून मुंग्यांसारखे लोक चढत उतरत होते.

त्याचवेळी जनसमुदायातून 'मणिमा' 'मणिमा' असे घोष ऐकू येऊ लागले. पांढऱ्याशुभ्र शेकडो पताका सागरलहरींप्रमाणे आंदोलित झाल्या. जयजयकार व हरिबोलचा गजर गगन भेदून गेला.

या वर्षी मंगलपूर गावच्या पहली विश्वालने शेताघराला एकटं सोडून येण्याचं धाडस दाखवलं. घरापरिवारासकट तो रथयात्रेला आला होता.

एंठू मंदिराकडे गेल्याला खूप वेळ झाला होता. कोण जाणे एवढा वेळ काय करतो आहे ! गर्दी तर एवढी होती की माशीचेदेखील छप्पन्न तुकडे व्हावेत. विश्वालने दुरूनच पाहिले की घामाझोकळ होऊन तो येत होता. धापा टाकत, एका हातात 'बेग बाइद' बाजा घेऊन. त्याच्या दोन्ही हातांत चांदीची कडी होती, कानात सोन्याच्या बाळ्या, भरदार छातीवर कंठी रुळत होती व त्यात एक ताईत अडकवला होता. शेंडीची त्याने मारली होती गाठ आणि बुक्का नाकावर ओघळून आला होता.

त्याला बघताच छोट्या भावाने नरीने – विचारले, "एंठू भैय्या, देव रथावर यायला वेळ का लागतोय रे ?"

सर्वज्ञ असल्याच्या सुरात एंठूने उत्तर दिले,

"अरे त्याआधी खूप विधी असतात. ते करून झाले की मग देव रथावर यायचे. आता खिचडी नैवद्य झालाय. त्यानंतर पंडे, पति महापात्र आणि मुदिरथ मंगलारोपणासाठी गेलेत. मग येतील देव रथावर. फार वेळ नाही काही. थोडा धीर धर."

मेकाप म्हणाला, "नेहमी हा वेळपर्यंत खिचडी नैवद्य वैगरे सर्व उरकून जातं. आता खिचडी नैवद्य लागलाय म्हणजे अजून खूप वेळ आहे."

रुसक्या स्वरात नरि म्हणाला,

"एंठू भय्या, तू एकटा एकटा जाऊन बघून आलास. मला मात्र नेलं नाहीस ना बरोबर ?"

खांद्यावरच्या रुमालानं घाम पुसता पुसता एंठू म्हणाला,

"अरे अणसर दाराजवळ एवढी गर्दी आहे म्हणतोस, अन् तिथं हीऽ भांडणं पेटलीयत. माझ्यासारख्याला परतायला रस्ता मिळेना तिथं तुझं काय होणार ? सांग."

अणसर दाराजवळ भांडणं चाललीयत हे ऐकून मेकापची जिज्ञासा जागृत झाली.

चंचीतून पान काढता काढता त्याने विचारले, " काय, काय झालं रे तिथं ? मला नाही जाता आलं. मेल्यांनो, तुमच्यासाठी थांबावं लागलं ना इथं ?"

पण एंठू तिथवर मुळी पोचलाच नव्हता तर काय सांगणार ? सुभद्रेच्या देवीदलन रथापाशी आराम करता करता जे ऐकलं त्याच आधारावर तो सांगत होता, " ठाकुर रथावर येण्यापूर्वी बारा नैवद्य लावले जातात. तर काय झालं, सुआर बडू आपला प्रसाद घेऊन आले. त्यावरून पंडे व सुआर यांच्यात भांडण लागलं न् एका पंड्यानं जो म्हणता गुद्दा मारला की बडु सुआरचे पुढचे दोन दात पडले आणि हे ऽऽ रक्त वाहू लागलं. आता मंदिरात रक्त पडलं म्हणजे मंदिर अपवित्र झालं की नाही ! प्रसादही विटाळला. मग प्रथम मंदिर शुद्ध केलं. प्रसाद पुन्हा केला. मंगलारोपण झालं न् मी तिथनं आलो."

विश्वालची मुलं आश्चर्याने म्हणाली,

" खरं ?"

त्याचवेळी उंटावर स्वार झालेले, विभूती फासलेले नागा संन्याशी चिमटे वाजवीत सिंहद्वाराकडे चालले होते. त्यांचा प्रमुख महंत गांजाने लाल झालेले डोळे गरगरावीत 'जय जगन्नाथ ' चा घोष करत होता. लोकंही तो उचलून धरत होती. नागांना बघण्यासाठी ही झिम्मड उडाली होती. त्यात विश्वाल कोलमडतच होते. पण कसं तरी त्यांनी स्वत:ला सावरलं. त्यांचा मोठा मुलगा जगबंधू वैतागानं म्हणाला,

" गर्दीत जाऊ नका म्हणून मी केव्हांचा सांगतोय. पण या बायका म्हणजे..."

त्याला आश्वासनभरल्या स्वरात ऐंठू म्हणाला,

" अरे या गर्दीत धक्काबुक्की करावी, वेताचा छडीमार खावा, पायदळी तुडवल जावं तेव्हा कुठे मोक्षाची वाट खुली होते, समजलास ?" कोपरं मारून गर्दीची फळी फोडायचा प्रयत्न करीत तो म्हणाला, " या, या माझ्यामागून. रथाच्या जवळ नाही पोचलं तर ठाकुर रथावर येतील ती पहंडी कशी बघायला मिळेल ? मी तिथवर नेतो, या."

पण पुढं जाणं अशक्य होतं. शिंग, तुतारी वाजवत एक पालखी बलिगंडाकडून सिंहद्वाराकडे चालली होती. ती होती राजाअमीनचंदांची. पण लोकांना वाटलं ' छेरापहेरा '-च्यां विधीसाठी राजा रामचंद्रदेवच आलेत. त्यांनी त्यांचा जयजयकार चालवला. ' खोर्धा राजा रामचंद्र देवकी जय ', ' मणिमा ', ' शरण पंजर महाबाहु ' इत्यादी आरोळ्यांनी बडदांड निनादून गेला. त्यांना बघायला दाटी झाली. पण थोड्याच वेळात कळून चुकलं की हे खोर्धा राजा नव्हेत तर तकीखाँचे नायब अमीनचंद होते. जमलेली गर्दी पांगली आणि पुन्हा प्रत्येकजण सिंहद्वाराच्या दिशेनं सरकू लागला.

मंदिरातून शिंगांचा आवाज ऐकू येत होता. म्हणजे देवतांची प्रतिष्ठापना झाली, आता देवळाचे दरवाजे उघडतील. ठाकुर रथापर्यंत येतील. लोक होते तिथं स्तब्ध उभे राहिले. उत्कंठा अगदी शिगेला पोचली.

अजून सिंहद्वार बंदच होतं. त्याच्या पहिल्या पायरीपासून ते सडकेपर्यंत यात्रेकरूंची खेचाखेच झाली होती. एकादशीचा उपवास करणारेही त्यातच घुसले होते. विशेषत: अरुण स्तंभापाशी तर तीळ ठेवायला जागा नव्हती. कारण ती जागा सगळ्यात मोक्याची. दार उघडताच दर्शन होते.

आत 'सात पाहाच' 'वर तिन्ही देवमूर्तींना केतकीच्या फुलांचे मुकुट घालून सजवणं चाललं होतं. याला 'टाहिआ लागि' म्हणतात. सिंहद्वार उघडायला आता फारसा वेळ नव्हता. जगन्नाथाच्या जयजयकाराने, 'मणिमा', 'मणिमा'च्या स्वराने रथयात्रेचा मार्ग गुंजायला लागला होता. दार उघडायला जसा वेळ लागत होता तसतसा 'मणिमा महाबाहू'चा गजर वाढत होता.

साजशृंगार करून तिन्ही देवमूर्ती जेव्हा आपापल्या 'सात पाहाच'वरून खाली उतरल्या; आतला शंख, घंटा, शिंग, तुतारी वगैरे वाद्यांचा गजर जोरात सुरू झाला.

अनंत काळच्या प्रतीक्षेनंतर महाकाळचे दरवाजे उघडावेत तशा थाटात अखेर सिंहद्वार उघडलं. घंटा वाजवणारे 'सात पाहाच' ते 'घोषडा'पर्यंत रांगेने उभे होते आणि खालीवर झुकत वाकत, पिंगा घालत तन्मयतेने घंटा वाजवीत होते. मृदंग, शंख, तूरि वाजू लागले होते.

दोन दइतांनी सगळ्यात आधी सुदर्शन–जगन्नाथाला उचलून सुभद्रेच्या जवळच्या रथावर ठेवले. नंतर आले मस्तकावर विशाल केतकी मुकुट असलेले बलभद्र. त्यांचा शृंगार प्रेक्षणीय होता. त्यांचे दोन्ही बाजूचे बाहू पकडायला प्रत्येक बाजूला सोळा सोळा दइत लागले होते. उगीच नाही त्यांना महाबाहू म्हणत. मागून, दोघांनी त्यांची मस्तकाची दोरी 'सिंदूरी गंतापाग' कसून ओढून धरली होती. केतकीचा भला थोरला गुच्छ त्यांच्या शिरोभागी झुलत होता. देवमूर्तींच्या आसनापासून ते रथापर्यंत उशा व गिरद्या घातल्या होत्या. कारण प्रथेनुसार त्यांना फरफटत आणल्यासारखं आणायचं असतं. बड्या ठाकुरांना तसं आणता आणता दइत घामाघूम झाले होते. बलभद्राच्या मस्तकावरचा केतकीगुच्छ खालीवर नाचत होता. दइत मधून मधून त्यांना खाली ठेवत होते.

त्याच वेळी लावण्यवती देवदासींनी रथापुढं नृत्य सुरू केलं. त्यांचे कुरळे केस भुरुभुरु उडत होते, कानातली झुंबरं ठेक्यात डुलत होती. बलभद्र आपल्या रथावर अजून बसायचेच होते एवढ्यात दइतांनी घाईघाईने सुभद्रेला तिच्या देवीदलन रथावर नेऊन

बसवलेदेखील. एखाद्या लाजऱ्या नववधूप्रमाणे सुभद्रा बलरामापुढून केव्हा आपल्या रथावर गेली कुणाला कळलंच नाही. एकदाचे 'बडे ठाकुर' कसेबसे रथावर आरूढ झाले होते व दइता जरा श्वास घेत होते. म्हणून रथयात्रेला थोडा वेळ लागत होता. बड्या ठाकुरांना आता फक्त त्यांच्या आसनावर बसवणे शिल्लक होते.

आता श्रीजगन्नाथाची रथयात्रा सुरू व्हावयाची. यात्रेकरूत रथापर्यंत पोचण्यासाठी धक्काबुक्की चालू झाली होती. कोण खाली पडला, कोण तुडवला गेला, कुणाला वर उठणं अशक्य झालंय इकडे लक्ष द्यायला कुणाला फुरसत नव्हती. मणिमा, महाबाहू, चकाडोला, शरणपंजर, पतितपावन अशा अनेक नावांनी त्याला आळवत जनसागर उचंबळत होता. श्रीजगन्नाथाला जेव्हा उशागिरद्यांवरून फरफटत आणत होते तेव्हा गहिवरून यात्रेकरू आपल्याशी म्हणत होते,

"ही सगळी तुझी इच्छा! हा त्रास तू घेतोस, फरफट ओढाओढ सहन करतोस, आमच्या शिव्याही खातोस. आम्ही कसले तुला सिंहासनावर बसवतो? तुझी इच्छा!"

भूतकाळात केव्हातरी म्हणतात जगन्नाथ सुनपुरात भूमिगत झाले होते. तिथून त्याचा पत्ता लावून कोणा एका इंद्रद्युम्न राजाने अशाच रीतीने त्यांना फरफटत आणले होते. व त्यांची प्रतिष्ठापना केली होती. ही रथापर्यंतची ठाकुरांची 'गुंडिचा पहंडी' यात्रा त्याच ऐतिहासिक घटनेची आठवण आहे की काय कोण जाणे! हे वाद करणारे तत्त्वज्ञ व इतिहासज्ञ जे कुणी असतील ते असोत; अनंत अडचणी सोसून इथे धूलि-धूसरित बडदांडवर जमा झालेल्या भक्तजनांना जगन्नाथाच्या या फरफटण्याच्या सोहळ्यात शाश्वत महान सौंदर्याचा उदय झालेला दिसत होता. कुठून कुठून कस-कसल्या अडचणी सोसून हा जनसंमर्द एकत्र झाला होता; आणि त्यांच्या नेत्रांचे पारण फिटत होते जगन्नाथाच्या दर्शनाने! हा जगन्नाथ आहे तरी कोण? जैन, बौद्ध, वैष्णव पंचरात्रिक की तांत्रिक? पण ही जिज्ञासा या भोळ्या भक्तांना नव्हती. सदाच मृत्युसन्मुख असलेल्या जीवनाच्या धूळभरल्या रस्त्यावर त्या जगदीश्वराची यात्रा बघण्याची त्यांची जन्मजन्मांतरीची इच्छा होती. त्यांचे संपूर्ण जीवन या प्रतीक्षामृताने भरले होते. प्रत्यक्ष मरण, महामारी, दूरचे अंतर या सर्वांना तुच्छ मानून ते इथे एकत्र आले होते. जगन्नाथाने आपले रत्नसिंहासन सोडून दिले आहे व तो पतितपावन झाला आहे; त्यामुळे तर प्रत्येकाला वाटत होते की त्याचा प्रत्यक्ष स्पर्शच आपण अनुभवतो आहोत. त्याला समजून घेणे मात्र कठीण होते.

त्याला एकदा तरी स्पर्श करता यावा म्हणून जनसागर उतावळा झाला होता. त्यातच जगन्नाथाच्या मुकुटावरची केवड्याची पानं गळत होती; आणि त्यातली एखादी काटकी मिळवण्यासाठी लोक झगडत होते. प्रभू पतितपावन आहेत.

अंगाखांद्यावरचंही सर्व काही देऊन टाकतो. तसे न करील तर पतितांचा उद्धार तो कसा करील ?

त्या विराट गर्दीत राजा अमीनचंदांची सगळी अहंमन्यता गळून पडली होती. ते ज्या पालखीतून आले होते ती जगन्नाथापुढे जाऊ शकली नव्हती. पालखी तिथंच सोडून गर्दीत धक्के खात ते कसेतरी रथापर्यंत आले होते.

तिथे उभे राहून त्यांना मिरवणूक दिसत नव्हती तर उडिया जातीची विराट एकता, भव्यतर शक्ती, मोठेपणा दिसत होता. हे जगन्नाथच उत्कलचे सम्राट आहेत. उत्कलचा मानवराजा त्याचा एक सेवक. मोंगल सम्राट अकबरदेखील इथे येऊन नतमस्तक होऊन गेला तोडरमल व मानसिंहांनी देखील इथे मस्तक झुकवले. नायब–नाजिम तकीखाँचे सेवक अमीनचंद तर कोणत्या झाडाचा पाला ?

अशा विचारात चूर होऊन अमीनचंद तिथे उभे होते व त्यांना बाजूला सारून यात्रेकरू दवणा, केवडा गोळा करायला धावत होते. अमीनचंदांच्या आसपास उभे असलेले अंगरक्षक आपले ‘ हटो ’, ‘ हटो ’ म्हणत होते. पण ते निरर्थकच होते. तिथे कोण कुणाचे ऐकतो ? त्यांनी बिचाऱ्यांनी धक्के खाता खाता स्वत:ला कसंबसं वाचवलं आणि राजा अमीनचंदांनाही बाहेर ओढलं.

जगन्नाथ सर्वात शेवटी रथावर आले. शिडीवरून ओढत दड्त त्याला रथावर बसवत होते.

देवमूर्तींच्या रथापर्यंतच्या या मिरवणुकीला ‘ पहंडी ’ म्हणतात. पहंडी संपली. श्री जगन्नाथ रथावर आरूढ झाल्यावर आसपासचा इतका वेळ शांत उभा असलेला जनसमुदाय ‘ मणिमा ’ ‘ महाबाहू ’ ‘ जय जगन्नाथ ’ वगैरे घोष करू लागला. खंजिरी, झांजा वाजू लागल्या; व कीर्तन, अभंग सुरू झाले. फेरीवाले आपापल्या मालाची उठावणी उच्च स्वरात करू लागले. डमरू, पिपाण्या, बेंडबाजे वाजवत विकू लागले. दूर गावाचे मित्र, आप्तेष्ट एकमेकांना भेटून विचारपूस करू लागले. बायकांना माहेरच्या मैत्रिणी, बाळपणच्या सख्या भेटल्यामुळे त्याही गप्पाष्टकात, सर्वांची खुशाली विचारण्यात रंगल्या. त्यांच्या अधरावरचे नीरव स्मित, डोळ्यातली थुईथुई नाचणारी आनंदाची कारंजी हीही शब्दातीत भाषा होती.

देवमूर्तींना रथावर चढवल्यानंतर चांगडा मेकापचे काम संपले होते. दक्षिणेच्या दाराकडून महाजन, राम कृष्ण व मदनमोहन यांना पालखीतून आणत होते. त्यांची मिरवणूक पहायला व शंखशिंगादी वाद्यांचा आवाज ऐकून लोक तिथं गोळा होऊ लागले होते.

यानंतर नेहमीच्या विधीनुसार लेंका व पाईक वाद्ये वाजवत सोनाराकडून मोती लावलेल्या बिद्या घेऊन आले. तिन्ही रथांना त्या अर्पण करण्याचा विधी झाला. यानंतर छेरापहेरा व्हायचा की कालबेठिआ रथ ओढायला लागतील.

जगन्नाथापासून आज्ञेची पत्रिका व प्रसादमाळ घेऊन छोटे उपाध्याय केव्हाच रामचंद्रदेवाच्या राजप्रासादाकडे गेले होते. बलिसाही प्रासाद तर जराजीर्ण झाला होताच; पण त्यात पाऊल टेवायला धर्मत्याग केल्यापासून रामचंद्रदेव अपात्र ठरले होते. म्हणून त्यांच्यासाठी देवळाच्या मोठ्या रस्त्यावर मधुपुराच्या जवळ एक तात्पुरता प्रासाद निर्माण केला होता. देवाकडून आज्ञामाळ पोचली की राजा रामचंद्रदेव छेरापहेरा करायला येतील. नेहमी आज्ञामाळ घेऊन मोठे उपाध्याय जातात. पण आज ते कुठं गेले होते कुणास ठाऊक ! म्हणून मग छोटे उपाध्यायच गेले झालं.

साम दाम दंड भेद कशाचाही वापर करून कसंही राजा रामचंद्रदेवांना छेरापहेरा करू द्यायचा नाही याच एका हेतूने अमीनचंद आले होते. पण पुरामध्ये वाळूचा बांध वाहून जावा तसे त्यांचे कूटनीतिकौशल्य कुठच्याकुठं गेले.

थाटामाटात, दिमाखात राजा रामचंद्रदेव आता छेरापहेरा पार पाडतील; व हे दृश्य राजा अमीनचंद गर्दीचे धक्के खात एखाद्या सर्वसाधारण माणसासारखे बघत उभे राहतील. या अपमानास्पद परिस्थितीबद्दलच अमीनचंद विचार करत होते.

सूर्य मावळतीला कलायला लागला होता. नेहमी एव्हांना रथ बलंगडीपर्यंत पोचून तिथली पूजाही होऊन गेली असती. पण यावर्षी पहंडीलाच वेळ लागला; साहजिकच छेरापहेराही अजून झाला नाही. बलंगडीला रथ पोचेतो बहुधा चांगलीच संध्याकाळ होणार. रथ ओढायला यात्रेकरू उतावळे झाले होते. आकाशातले ढग दक्षिणेकडून नदीत सरकणाऱ्या नावांप्रमाणे मंद गतीने पश्चिमेला सरकत होते. भर दुपारच्या उन्हानंतर वाहणारे वारे कर्पूरचंदनाच्या उटीप्रमाणे शीतल भासत होते.

दूरवर वाजत असलेल्या विविध वाद्यांचे मधुर स्वर ऐकू येत होते.

अचानक हजारो कंठातून शब्द आले, " महाराज येताहेत महाराज ! "

पालखीतून राजा रामचंद्रदेव येत होते. अठरा परगण्यांचे राजे पालखीच्या पुढे चालत होते. मागे व पालखीच्या दोन्ही बाजूला इतर आपापल्या मनाप्रमाणे चामर, छत्र, पताकादि घेऊन चालले होते. मोंगल प्रदेशातील काही जमीनदारही या शोभा-यात्रेत सामील झाले होते. वास्तविक ते यात सामील झाल्याने तकीखाँचा रोष ओढवून घेणार होते. पण त्याची तमा न बाळगता ते ' खोर्धा महाराज राजा रामचंद्र देव की जय ' असा जयजयकार करीत चालले होते.

या देखाव्याने राजा अमीनचंदांचा आधीच डळमळणारा आत्मविश्वास ढासळला.

हा आपला छेरापहेराचा नुसताच धार्मिक विधी वाटत नव्हता. संपूर्ण अपराजेय उत्कल इथे जगन्नाथाचे निमित्त करून एकत्र झालेला होता. ही जणू त्याच्या राजनैतिक एकतेची जययात्रा होती. या एकीला छिन्नभिन्न करण्याच्या प्रयत्नात मानसिंहासारख्या दुर्दम्य सेनापतीचीही दमछाक झाली होती. अमीनचंद तर किस झाडकी पत्ती.

रामचंद्रदेवाची पालखी तोवर बलरामाच्या रथाजवळ जाऊन पोचली होती. जेव्हा राजा रामचंद्रदेव आपल्या लव्याजम्यासहित अठरा राज्यांचे सामंत राजे, मोगल शासनाखालील कित्येक जमीनदार व तढाउकरण, देउलकरण, राजगुरु सान परीछा इत्यादी मंदिराच्या प्रमुख सेवकांसहित रथाची शिडी चढत होते तेव्हा जनसमुदायाने जयजयकार करायला सुरुवात केली, " जय, गजपति चलंति विष्णुमहाराज रामचंद्रदेव की जय." त्या कोलाहलात एखाद्या वेड्याप्रमाणे अमीनचंद मोठे उपाध्याय गौरी राजगुरू कोठे आहेत ते शोधत होते. पण ते तिथं नव्हतेच.

अजून सूर्य मावळायला अवकाश होता. पण दक्षिणेकडून जे ढग सतत येत होते त्यामुळे अंधःकार पसरला होता. वाऱ्याच्या झुळुकांनी रथावर अंथरलेली मखमल व मलमलीची वस्त्रे हलत होती. पताका फडफडत होत्या. गर्दीचा कोलाहल, वाद्यांचा घोष यांबरोबर ढगांचे गडगडणेही मिसळून गेले होते.

देवीदलन व तालध्वज रथांचा छेरापहेरा करून राजा रामचंद्रदेव व सामंतगण आता नंदिघोष रथाकडे चालले होते. राजांच्या शरीरावर एक असाधारण दीप्ती झळकत होती.

यावेळी कुणाच्याही मनात ते विधर्मी आहेत ही गोष्ट आली नाही. त्यांच्या हातून होणाऱ्या प्रत्येक धर्मविधीबरोबर, पुरोहिताकडून त्यांनी प्रसादपुष्प स्वीकार करून नम्रपणे नतमस्तक होऊन पुष्पांजली अर्पण करण्याबरोबर ' मणिमा, महाबाहू, चलंति विष्णु ' इत्यादी जयजयकाराने मेघाच्छन्न आकाशही कोंदून जात होते. आकाशात ढगांची दाटी झालेली बघून कालबेठियांनी बलभद्र व सुभद्रेच्या रथापासची शिडी बाजूला केली होती. त्यांच्या सारथ्यांच्या काष्ठप्रतिमांना ते सजवत होते. रथ आज बलगंडीपर्यंत तरी जाईल की नाही याची शंकाच वाटत होती. जगन्नाथाच्या रथाचा छेरापहेरा संपेस्तो कदाचित् संध्याकाळ टळून जायची. पण रथयात्रेच्या दिवशी रथ चालले नाहीत तर ते अशुभ मानले जाते. म्हणून एक हात का होईना रथ पुढे सरकलेच पाहिजेत. म्हणून रामचंद्रदेव घाईघाईने जगन्नाथाच्या रथावरचा छेरापहेरा करत होते. घट धरणारा व भंडार मेकाप जेव्हा चांदीच्या घटातून चंदनाचे सडे घालत होते व जाईजुईची फुलं उधळत होते तेव्हा चंदन व पाणी वाऱ्याने लांबवर उडत होतं. हळूहळू वाऱ्याचा जोर वाढायला लागला. पण त्याबरोबरच जयजयकारही वाढत होता.

रथाच्या चारी बाजूला सोनेरी चंदनाचा सडा घालून रामचंद्रदेव जेव्हा शिडी उतरले तेव्हा बोराएवढे थेंब पडायला सुरुवात झाली होती. ह्यानंतर फक्त रथ ओढणेच शिल्लक होते. बाकी बघण्याजोगे काही नव्हते. तेव्हा यात्रेकरू आडोशाला पळू लागले. रथाआड रस्त्यावर ढगांमुळे संध्याकाळ अधिकच गहिरी होत होती. पाऊस, ढगांचे गडगडणे आणि वाद्यध्वनी यांचा एकच कोलाहल माजला होता.

भिजत भिजत रामचंद्रदेवांनी साष्टांग दंडवत घातला. शिडी आधीच काढून घेतली होती. आता रामचंद्रदेव सारथ्याची सजावट पहात होते.

श्रीगुंडिचा यात्रेदिवशी जर रथ अजिबात चाललेच नाहीत तर ते अशुभ मानले जाईल व लोक म्हणतील की यवन राजाकडून करवलेला छेरापहेरा जगन्नाथाला पसंत पडला नाही. शत्रू तर हेच म्हणेल व याचे भांडवल करील. कित्येक हजार यात्रेकरू दुसऱ्या दिवशी रथ चालेतोवर उपवास सोडू सकणार नाहीत. जी प्रतिष्ठा राजा रामचंद्रदेवांनी पुन्हा प्राप्त केली होती ती धुळीला मिळाली असती. म्हणून मुदिरथाबरोबर येऊन छोटे उपाध्याय जेव्हा म्हणाले, "हुकूम द्यावा की आज रथ चालणार नाहीत. रथयात्रेचा आरंभ उद्या होईल." तेव्हा रामचंद्रदेव उत्तरले, "छे, छे ! आज एक हात का होईना, रथ चालतीलच."

जगन्नाथाच्या रथाची शिडी तोवर बाजूला केली होती. सारथी व घोटक तयार होते. बलभद्रच्या रथाचे कालबेठिआ कंबर कसून हांहूं करत दोऱ्या खेचायला सज्ज झाले. वाद्याच्या कल्लोळामुळे मेघगर्जना ऐकू येईनाशी झाली.

"जय ! जगन्नाथ की जय ! गजपति रामचंद्रदेव की जय !" जयध्वनी, पाऊस व मेघगर्जना यांच्या भडिमारात रथयात्रा सुरू झाली.

ती केवळ जगन्नाथाची रथयात्रा नव्हती. अपराजेय उत्कलची जययात्रा होती.

कमरेत काठी बसलेल्या कुत्र्यासारखे अमीनचंद तिथून निघाले व मार्कंडेय साहीच्या घराच्या दिशेने चालले.

# नऊ

## 1

दक्षिणेच्या कंदानदीच्या खाडीपासून ते उत्तरेला माणिकपाटणापर्यंत चिलिका व समुद्रामधला तंडाकिनारचा वाळूचा पट्टा मेल्या अजगरागत लांबच लांब पसरला होता. किनाऱ्यावर एखाद दुसरे झुडुप, एखादे बांबूचे किंवा ताडाचे झाड वाऱ्याने मुंडी हलवते आहे झाले. याच वाळूच्या पट्ट्यावरून, म्हणतात, कधीतरी एकदा उत्कलच्या राजा पुरुषोत्तमदेवाच्या मानरक्षणासाठी श्रीजगन्नाथ व बलभद्र काळ्या व पांढऱ्या घोड्यांवर बसून भरधाव गेले होते – कांचीविजय करायला.

सरदेईने आपल्या मुठीत वाळू घेतली व कपाळाला लावली. त्या ओल्या वाळूच्या कापरासारख्या सुखद स्पर्शाने सरदेईचे थकलेले मन व शरीर टवटवीत झाले.

सरदेईच्या डोळ्यांसमोर पूर्वीचे दृश्य जसे न् तसे उभे राहिले. तेच ते सासरचे मालकुदा गाव, तीच ती टळटळीत दुपार आणि खोर्धा राजाची ती व्याकुळ मूर्ती – पाण्याची याचना करणारी. तिने डाव्या दंडावरची बर्चीने झालेल्या जखमेची खूण पाहिली. दुःखमिश्रित आनंदाची ती आठवण होती.

निर्जन वाळूच्या पट्ट्यावर समुद्रावरून वाहणारी हवाही थकलेलीशी वाटत होती. थव्याथव्याने उडणारे हंस, बगळे, पाणकावळे, सारस कधी चिलिकेच्या निळ्या पाण्यावर बसत होते तर कधी उडून जात होते. अेरा पक्ष्यांचा एक कळप चोची खाली करून समाधिस्थ साधूंसारखा बसला होता. मधून मधून येणारी सुस्ती घालवण्यासाठी ते आपले रंगीत पंख हलवत होते.

थोड्याच दिवसापूर्वी याच भागातून दक्षिणेकडचे यात्रेकरू मुंग्यांसारखे रांगा धरून गेले होते. त्यातलाच एक जण इथल्याच एकांतात ताडाच्या झाडाखाली महामारीने मेला होता. गिधाडांनी त्याचे प्रेत टोचून बोचून खाल्ले होते. राहिलेल्या सापळ्यावर वाळूचे ढीग जमले होते. आणि तो अर्धाअधिक झाकून गेला होता. आणखी एकदोनच

दिवसात तो दिसेनासा होईल. त्याच्यावर असलेलं ते झाडच फक्त त्याच्यासाठी रडत राहील. काही दिवसांनी तिथे गवत उगवेल, झुडुपं उगवतील.

शब्दात न पकडता येण्याजोगा एकटेपणा व दूर असलेला पण अटळ असलेला मृत्यू–त्याच्या भीतीने सरदेईचे मन व्याकुळ होऊन उठले. टळटळीत दुपारी एखाद्या झाडाच्या फांदीवर एकटयाच बसलेल्या कपोतीप्रमाणे तिने हाक दिली : " जगुनि, अरे जगुनि ".

समुद्राकडून आलेल्या वाऱ्याने ही हाक झेलली व चिलिकेच्या अर्ध–नील अर्ध–धूसर पृष्ठभागावर दूर फेकून दिली.

सकाळीच जगुनि होडी घेऊन चिलिकेवर गेलाय. आता दुपार होऊन गेली. वल्हवी आले नाहीत. सराईमध्येही कुणी यात्रेकरू नाहीत. पुरीहून बाहुडा यात्रा बघून येणारे यात्रेकरू इथूनच नावेत बसून चिलिकेच्या अंतर्भागात वसलेले मउसा–ब्रह्मपूर द्वीप पहायला जातात. मागे कधी मोंगलांच्या हल्ल्याच्या भयाने जगन्नाथ पुरी सोडून इथे लपून बसले होते. जिथे त्यांची पूजाअर्चा व्हायची ते भर जंगलातले स्थान आजही पूजनीय होते. त्यासाठी रसकुदा गावात आजही पुष्कळ पंडयांची कुटुंबे रहात होती. त्यांना वृत्ती होत्या. खोर्धा राजाने त्यांच्यासाठी अंधारी परगण्यात अग्रहार दिले होते. बाहुडा बघून येणाऱ्या यात्रेकरूंनी काही काळ हा वाळूचा पट्टा गजबजून जातो. सराया जरा श्रीमंत बनतात. तेव्हा एवढे काम असते की म्हणतात तसं मरायलाही फुरसद नसते. पण आता म्हणजे शुकशुकाट असलेल्या समुद्रकिनाऱ्यावर एकटीच टिटवी ओरडत जावी तसं एकटं एकटं वाटत आहे.

सरदेईने स्वत:लाच प्रश्न केला, कसं हे आयुष्य ? अनेक आशा, घटनांचे गाठोडे ! इथे आसपास फुलणाऱ्या अनाम लालपिवळया फुलांसारखी एखादीच सुखद स्मृती...... थोडा सुवास थोडे काटे ! जर फुलं एकत्र केली तर त्यांच्या पाकळया झडून जातील.

सरदेईचे मन व्याकुळ झाले. मनात आलं किती पापी आहे ती ! दूरवरून लोक येतात ठाकुराचे दर्शन घेऊन मोक्ष मिळवायला. ती मात्र इतक्या जवळ आहे पण काही उपयोग नाही. हा समोरचा जो सातपडा घाटाजवळचा करंज बाग आहे तियून पायी पायी पुरी अर्ध्या दिवसाच्या रस्त्यावर आहे. त्या दिवशी जगुनि म्हणतही होता की,

" चल सरदेई, तुला रसकुदा घाटावर नावेत बसवतो आणि हरचंडी नदीच्या रस्त्याने नरेंद्र पोखरीपर्यंत पोचवून देतो."

मोंगलांच्या हल्ल्याचे भय असले की जगन्नाथ याच वाटेने चिलिकेला येतात.

पण ती नसेल तर हा प्रपंच कसा चालणार ? म्हणून तर मनात असूनही अजूनही सरदेई पुरीला जाऊ शकली नव्हती, कोण जाणे कधी जाता येईल की नाही ते !

समाजाच्या दृष्टीने ती भ्रष्ट झाली आहे. एका यवनाने तिचा उपभोग घेतला आहे. म्हणून तर बालुगाव सोडावे लागले. तिला काय अधिकार राह्यलाय रत्नवेदीपाशी उभं राहून जगन्नाथाचे दर्शन घेण्याचा ?

सरदेईने पुन्हा हाक घातली,

" जगुनि, अरे ए जगुनि."

तिची हाक ऐकताच झोपी गेलेला वारा जणू जागा झाला व तिची हाक चिलिकेवर दूर घेऊन गेला.

हाकेच्या अंतरावर रसकुदा गाव आहे. गावात काही ब्राह्मण, कंड्रा, नोलिये, खंडायत आहेत. केंबळचांच्या घरांचे रसकुदा नागचाफे व कळकांच्या गर्दीत झोपी गेले होते.

गावाबाहेर ' कांचन ढवा घर ' आहे. वाळूच्या पट्ट्याच्या बाजूबाजूने अशी खूप घरं आहेत. दक्षिणेकडून येणारे यात्रेकरू, व्यापारी, नावाडी इथेच उतरतात. कंचनबाई नावाची एक नाचगाणं करणारी होती; तिने आपल्या कमाईतून ही घरं बांधली होती. जगन्नाथाच्या यात्रेकरूंची सोय करण्यासाठी रिकामी पडलेली ही घरं आता समुद्री डाकू, फिरंगी यांचे अड्डे बनली तर नवल नाही. थोडया अंतरावर असलेलं असलंच एक घर अर्धेअधिक वाकून पुरल गेलं होतं, त्यावर शेवाळ जमलं होतं; वाऱ्यापावसानं झोडपलं गेलेलं ते घर भूत–महालासारखं वाटत होतं. बालुगावाहून येऊन सरदेईने आपली सराई याच घरात वसवली आहे. हळूहळू या घराचे ' कंचनबाई ढवा ' नाव जाऊन ' रसकुदा सराई ' व्हायला लागले आहे.

घराच्या मावळतच्या सोप्यावर बसून थकलेल्या मनाने, शून्य दृष्टीने सरदेई चिलिकेच्या बाजूला पहात होती.

जलसारस, कादंब, चक्रवाक वगैरे घंटशिळेकडे उडत होते. क्वचित् कोणी सारस घराकडे मध्येच परतत होता. काहीसे शोधत होता व फिरून चिलिकेच्या किंवा समुद्राच्या दिशेने उडून जात होता.

घाटाच्या बाजूला एक नाव येताना दिसली तशी सरदेईने पुन्हा हाक घातली,

" जगुनि......अरे जगुनि."

पण डोक्यावर ताडाची छत्री धरून रसकुदा गावचा ब्राह्मण पुजारी नाव वल्हवत येत होता. आज मउसा–ब्रह्मपूर गावच्या देवस्थानाची पूजा करायची पाळी त्याची होती.

सरदेई फिरून एकवार विचारात गढून गेली.

आभाळात ढग दाटले होते. पण त्यात शीतळाई नव्हती. ढग धूसर, धूमिल होते. त्यातूनही सूर्याचे सोनेरी किरण फुटून पडत होते व शीतल आग वर्षत होते.

आकाश जेव्हा मोकळं असतं तेव्हा चिलिकेच्या पलीकडचे डोंगर स्पष्ट दिसतात. काळाच्या अथांग सागरापलीकडच्या अस्पष्ट स्मृती असाव्यात तसे. त्याच बाजूला बालुगाव आहे. सरदेईच्या अर्थहीन जीवनाचे चार आंबटगोड दिवस तिथे गेले होते. तिच्या मनात आलं, "परमेश्वरा सगळा जन्म मी एखाद्या वाळक्या पानासारखी इकडे तिकडे उडत फिरावं असं तुझ्या मनात आहे का ?" तिच्या डोळ्यात पाणी जमलं.

बालुगावची ती एक लज्जाजनक आठवण सरदेई मनातून पुसून टाकायचा प्रयत्न करायची, पण चिलिकेच्या वारंवार येणाऱ्या लाटांसारखी ती यायचीच न् तिच्या काळजाचा संताप करायची. जो जो त्या आठवणीला दूर लोटावे तो तो भुकेजल्या सारसाप्रमाणे पंख नाचवत ती पुन्हा येत असे.

बालुगावच्या त्या सराईच्या सोप्यात कैक वेळा सरदेई पाय पसरून आळसात बसून रहात असे, जणू काही कुणाची वाट पहात असे. सराईपासून एक पायवाट रघुनाथ-पूरच्या सडकेला जाऊन मिळाली आहे तिथेच तिठ्यावर हांडिभंगा वड आहे. जवळच आड आहे. आडाजवळ एक ताडाचे झाड. त्या जागेपाशी व अवतीभोवती सरदेईने अनेक कल्पनांची जाळी विणली आहेत. एकटी असली की ते आठवत बसते. मधूनच ती जगुनिला हाक मारते, "जगुनि, अरे ए ऽ ऽ जगुनि."

सराईत कुणी पथिक आला की तिच्या कल्पना थांबत असत. कमर लचकवीत घागर घेऊन ती कित्येकदा आडाचे पाणी आणायला जात असे. सराईतला कुणी तरुण वा प्रौढ पथिकही मग उगीचच तहान लागलीशी वाटून तिच्या पाठोपाठ वडाच्या झाडापर्यंत जात असे. जेव्हा ती वळून त्या आतुर पथिकाकडे पाही तेव्हा त्या कटाक्षात त्याला बहुधा सलज्ज आमंत्रण असल्यागत भासे. सरदेईने पाणी भरून घागर उचलली की तिच्या मांड्या, नितंब, हात आणि वक्ष यांतून ते आमंत्रण व्यक्त व्हायचे. तो पाणी पिण्यासाठी किंवा असाच पुढं होणार तोच त्याचा रसभंग करण्यासाठी ती हाक घाली,

"जगुनि ऽ ऽ रे जगुनि". नक्की जगुनि तेव्हा कुठं असायचा कोणास ठाऊक, पण कधी केवड्यामागून तर कधी सडकेवरून जंगलात यायचा किंवा लांबून ओरडायचा,

"मला बोलावतेस काय गे ?"

अचानक जगुनीला पाहून पथिकाचा नि:संशय स्वप्नभंग होत असे. तहानही नाहीशी व्हायची.

सरदेईच्या सराईत जे नेहमी येत जात असत त्यांना हे ठाऊक होते. सरदेईचा विरोध नव्हता पण निर्लज्ज होकारही नव्हता. म्हणून ते विनोदाने म्हणत असत की सरदेईच्या मागे लागणे आणि एखाद्या भुंग्याने वाऱ्यावर उडणाऱ्या कमळामागे लागणे एकच आहे. कमळाच्या कापणाऱ्या पाकळ्यांत भ्रमराला विरोध केलेला नसतो; असलंच तर लज्जाजनित भय असतं. अर्थात् परिणाम एकच होतो. बिचारा भ्रमर तृषितच राहतो. अजून कोणीही रसिक सरदेईला जिंकू शकला नव्हता.

कधी कधी रात्री अचानक जाग आल्याक्षणी सरदेई आपल्याशीच विचार करी' ओळखदेख नसलेल्या अतिथीशी तिला काहीच कर्तव्य नाही; म्हणूनच एक तऱ्हेची भीती आहे. पण अशाच एखाद्या अपरिचिताने तिच्यावर बळजोरी करून तिची लज्जासंकोचादि प्रावरणे फेडली असती तर काय तिने विरोध केला असता ? बहुधा नाही. त्या तशा मधुर क्षणी तिने जगुनिचं नाव घेऊन रसभंग नसता केला; किंवा त्या अपरिचिताची उत्कंठा वाढवण्यासाठी......कुणास ठाऊक ! सरदेई एका मधुर साहसाची चव नित्य चाखत असे खरी.

त्या दिवशी एक मोंगल सैनिक चिकाकोलहून कटलेला जाताना अटळ भविष्यागत सराईत राहिला होता. शांत दुपार होती. वारादेखील आळसावून नवपल्लवित पळसावर व सावरीच्या झाडांवर झोपला होता. भूतकाळाच्या स्मृतीप्रमाणे हांडिभंगा वडाची सुकी पाने झरत होती. त्या दिवशी घरात एक थेंब पाणी नव्हतं. पण आडाशी जायला सरदेईचं मनच घेत नव्हतं. त्या सैनिकाला बघून एका भयाने तिचं मन भरून गेलं होतं.

त्या दिवशी नेहमीप्रमाणे पाणी आणायला जाताना ना तर तिचे पाय मध्येच अडखळले, ना तर तिने मागे वळून पाहिले. पण अचानक मागून घोड्यावरून येणाऱ्या त्या सैनिकाकडे पाहून तिचा थरकाप झाला. जगुनीच्या नावाने त्या दिवशी तिने टाहो फोडला. सैनिकाचे बुभुक्षित डोळे तीरासारखे तिला जागीच खिळवत होते. शराहत हरिणीसारखी ती ओरडू लागली; तसतशी सैनिकाची लालसाही वाढू लागली.

जसा तो जवळ आला तशी सरदेई त्याची वाट सोडून पदर माथ्यावरून पुढे ओढून एका बाजूला उभी राहिली. एव्हांना जगुनी पोचायला हवा होता पण...विधिलिखित वेगळंच होतं. पुढचे दोन पाय हवेत उंचावत काळा घोडा अचानक तिच्याजवळ थांबला. लगाम एकाएकी खेचला गेल्याकारणाने रागात तो खिकाळला. लगाम तुकडे तुकडे करण्यानेच त्याचा राग कदाचित् शांत झाला असता.

सरदेईने पुन्हा एकवार जगुनिच्या नावाने हाक ठोकली. पण तो कुठे नव्हताच.

सैनिकाला आपल्या अगदी जवळ पाहून सरदेई पाषाणवत् झाली. तो चिकाकोलच्या

फौजदाराचा शिपाई होता, हे तिला माहीत होतं. या लोकांना सात खून माफ असतात. यांच्यापासून बचाव करणं सोपं नाही. उगीचच याला सराईमध्ये जागा दिली......पण नाहीतर काय करणार होती ती ?

त्याच्याकडे बघण्याचे धैर्यही सरदेईत नव्हते. पदर आणखी पुढे ओढण्याच्या प्रयत्नात हातची घागर सुटून चूर झाली.

तिची असहाय स्थिती बघून सैनिकाला हसू आले. त्याने म्यानातून तलवार काढली व तिच्या टोकाने सरदेईचा घुंघट उडवून लावला. लाल साडीच्या पदराआडचा तिचा चेहरा कोमेजल्या कमळासारखा दिसत होता. पूर्वी अपरिचित अतिथीला पाहून तिचे डोळे प्रसन्नतेने चमकत पण आज भयाने ते थंडीने काकडलेल्या पद्मपुष्पांसारखे मिटले होते. कपाळावर मोत्यासारखे घामाचे थेंब चमकत होते.

तिच्या त्या करुण, लाजेने अर्धमेल्या मूर्तीने सैनिकाची वासना खवळली असावी. त्याने घोडयावरून झुकून सरदेईच्या कमरेला विळखा घालून तिला सावजागत अल्लद उचलले व जवळच्या जंगलात तो तिच्यासह दिसेनासा झाला. त्याच वेळी जगुनीच्या धनुष्यातून सुटलेला तीर निष्फळ क्रोधाने थरथर कापत सावरीच्या झाडात शिरला.

ती आठवण आजही सरदेईला आपलं शरीर चिखलाने लडबलेलं आहेसं वाटायला लावते. त्या विषज्वालेने तिचं मन पोळून निघतं. जेवढी जेवढी त्या आठवणीला ती दूर लोटते तेवढी ती जवळ येते; त्या उजाड वाळूच्या पट्टयावर फिरून फिरून येणाऱ्या जलसारसांप्रमाणे.

अरण्यात एका जागी एका शालवृक्षावर एक सफेद फुलांची वेल लहडली होती व तिथे एक कुंज बनला होता. असहाय सरदेईचे शरीर कवेत घेऊन तो तिथं येऊन टपकला. ती सारखी वक्ष:स्थळांना आपल्या बाहूंनी झाकायचा निष्फळ प्रयत्न करत होती. ते बघून सैनिक अधिकच हसू लागला. अर्धमृत सरदेई कापत तिथंच पडली.

त्यावेळी विरोध करण्याचं बळच सरदेईत उरलं नव्हतं. सैनिकही तिच्या अनावृत्त शरीराला कवटाळून थोडयाच वेळात चीत होऊन पडला. एका असहाय स्त्रीचे अपहरण करून तिला आणता आणताच त्याची वासना उत्तेजित होऊन विझलीही होती. सरदेईने जरा जरी प्रतिकार केला असता, चिडलेल्या वाघिणीप्रमाणे त्याला चावण्या बोचकारण्याचा प्रयत्न केला असता तरी तो अधिकच पेटला असता. पण सरदेईचे असहाय आत्मसमर्पण त्याला लुळे करून गेले. ती तेव्हा बेशुद्धच होती.

भुईवर पडलेल्या तिच्या निर्वसन देहाला एक लाथ मारून तो घोडा सोडवून निघून गेला.

खूप वेळाने जेव्हा तिला शुद्ध आली तेव्हा संध्याकाळ झाली होती. वाऱ्याच्या

झुळुकांनी पाचोळ्याचा आवाज होत होता. भ्रमिष्ट स्थितीत सरदेई वस्त्र ठाकठीक न करताच सराईत आली. जगुनीला बोलवायचा धीरही तिला झाला नाही. सराईत जगुनी नाही ते बघूनच तिला एकपरी बरे वाटले.

पण दुसऱ्याच दिवशी ही बातमी वणव्यासारखी पसरली की पठाण सैनिकाकडून सरदेई विटाळली गेली. बालूगावचे इतर सराई–मालक आतापर्यंत माशा मारत फिरत होते. त्यांनी या बातमीचे चांगलेच भांडवल केले. ते म्हणू लागले की हिच्या हातचे कोण जेवील ? नरकात पडायला होईल ना ? तिला तोंड बाहेर काढणे कठीण झाले. पूर्वी ज्यांना ती वश झाली नव्हती तेही यात सामील झाले. हांडिभंगा वड आणि आडापर्यंतच्या पायवाटेवरून चालणे कठीण झाले. घरांची दारं बंद झाली. ती विटाळली गेली म्हणून हळूहळू सराईत यात्रेकरू येईनासे झाले.

एके दिवशी जगुनि म्हणाला,

" चल सरदेई, इथून जाऊ या. "

पण कुठं जायचं ? तेही सरदेईला विचारता येईना.

अखेर एके दिवशी बालूगावातला आपला संसार आवरून व आपला भ्रष्ट देह घेऊन सरदेई जगुनिबरोबर आली.

काही दिवसानंतर या निर्जन वाळूच्या भागात तिने आपली एक सराई उघडली. तिचा लांच्छित इतिहास या भागात माहीत नव्हता. इकडे पुष्कळ सराया होत्या. त्यात एक तिचीही.

पक्ष्यांचा एक थवा पंख फडफडावीत चिलिकातटावर उतरला.

एक नाव घाटाकडे येत होती. जगुनि होता त्यात; आणि त्याच्या डोक्यावर काही पक्षी गिरक्या घेत उडत होते.

जगुनीच्या नावेत आणखी दोघेजण होते. कुणास ठाऊक कोण होते ते ! या इकडचे रहिवाशी तर दिसत नव्हते. रसकुदा गावाकडे ते निघून गेले. किनाऱ्यावरच्या एरा पक्ष्यांनी त्यांच्या चाहुलीने फक्त पंख फडफडावले; ते उडाले मात्र नाहीत. सवयीनुसार सरदेईने हाक मारली, " जगुनी, रे जगुनी. "

पण उत्तर न देता, खांद्यावर जाळं टाकून, हातात मासे लोंबवत कसल्याशा चिंतेत मस्तक झुकवून जगुनि येत होता.

त्याला पहाताच सरदेईनं विचारलं, " कुठं गेला होतास रे ? वाट बघता बघता सांजावलं बघ. "

त्याने उत्तर दिलं नाही. मासे खाली ठेवले. त्यांना पहाताच ती चमकली; म्हणाली, "अरे हे कुंडल मासे. चिलीकेत हे मरायला लागले म्हणजे दुष्काळ पडणारच बघ."

काही न बोलता जगुनि फिरून चिलिकेच्या बाजूला निघाला तशी सरदेई म्हणाली, "अरे, कुठं निघालास पुन्हा? सकाळपासून खाणं नाही पिणं नाही."

पण पश्चिमेकडून येणाऱ्या तुफानी वाऱ्याने सरदेईचे हे शब्द समुद्राकडे नेले.

जगुनि उत्तरला, "आता माझ्याबरोबर जे दोघेजण होते ना नावेत, त्यांनी सबंध दिवस गुरवाई ते बरुणकुदा, बरुणकुदाहून मउसा–ब्रह्मपूर असं भटकवून थकवलं आहे. त्यांना पैसे मागितले तर म्हणतात कसे की 'ये रसकुदाला बलि प्रधानच्या घरी. तिथं मुक्कामाला आहोत आम्ही.'"

"कोण आहेत हे?" सरदेईने विचारले.

थकल्या स्वराने जगुनी म्हणाला.

"कोण जाणे! चिलीकेत इकडे तिकडे हिंडत काय शोधत होते देव जाणे. मी हजार वेळा विचारलं असेल पण एक शब्द बोलतील तर रामाचं नाव."

सरदेईला वाटलं की मउसा–ब्रह्मपूरला जगन्नाथाची जगति पूजा करायला आलेले यात्रेकरू असावेत ते. असे कितीक येतात. त्यांना नावेतनं हिंडवणं हा एक बरा धंदा झाला होता जगुनीला.

तुफानी हवा धूळ उडवत होती; आणि त्या तसल्या वाऱ्यावादळात जगुनी अर्धवट धावत रसकुद्याला निघाला पैसे वसूल करायला.

सरदेईने मागून ओरडून म्हटलं,

"लवकर परत ये रे. वादळाचं चिन्ह दिसतंय."

थोडया वेळाकरता ढगाआडून सूर्यानं तोंड बाहेर काढलं तेव्हा जलसारसांच्या पंखांवर गुलालाची उधळण झाली. जटिआनासी व घंटशिला पहाडावरच्या क्षितिज-रेषेवर सावरीच्या कापसागत तरंगणारे ढग अबीर माखल्यागत दिसायला लागले. याआधी बिचारे मलिन वाटत होते. चिलीकाच्या कृष्णजलावर एक कुंकुमरेषा उमटली. लाटांनी लगेच तिला आपल्यात सामावून घेतली.

घरात यायला सरदेईचे मन होईना. तुफानाचे स्वागत करणं आवडतं तिला. चिलीकेच्या लाटावर तरंगणारे पक्ष्यांचे थवे आपापल्या वस्त्यांकडे निघाले होते. वाऱ्याचा वेग हळूहळू वाढत होता. कळकाची झाडं डोकी हलवून वेडयागत नाचत होती.

हाकेच्या अंतरावर जिथे एक वाळूचा बांध डाव्या बाजूला वळलाय तिथे दोन

ताडाची झाडे पहारेकऱ्यासारखी उभी आहेत. कपाळावर पंजाचा आडोसा करून, दृष्टी बारीक करून तिने पाहिलं की एक घोडेस्वार त्या वाटेनं इकडेंच येतो आहे. दक्षिणे-कडून येणाऱ्यांची हीच वाट असते. पण हल्ली हा रस्ता बंद झाल्यागत आहे. कटक चिकाकोलच्या वाटेने हल्ली घोडेस्वार जा ये करीत असतात. मालुत गावाद मोंगल सेनापती तळ ठोकून आहे. पण त्यांचे लोकही इथून ये जा करत नाहीत. मग हा कोण ? सरदेई भयभीत झाली. आजही हा जगुनि नाही. बालूगावच्या इतिहासाची पुनरावृत्ती तर......

जोरजोरात ती हाका मारू लागली, " जगुनि, अरे जगुनी."

पण हाक पोचणार कशी ? तोवर घोडेस्वार सराईच्या जवळ येऊन पोचला होता. त्याच्या शिरस्त्राणात व अंगरख्यात वारा भरला होता. त्यामुळे त्याच्यामागून आणखी दोन घोडेस्वार येताहेत असा भास होत होता. आत जावं की बाहेरच थांबावं या संभ्रमात ती होती तोवर घोडेस्वार येऊन पोचला.

घोड्याला बघून सरदेई चमकली. तो घोडाही काळा होता. त्याच्याही कपाळावर शुभ्र टिळा होता......बालूगावची ती एक स्मृती तिच्या मनात जागी झाली आणि ती निर्बलशी झाली. पण या घोडेस्वाराच्या डोळ्यात ती हिंस्र लोलुपता नव्हती. स्निग्ध आग होती. तरुण होता तो. डोक्यावर जरीचे शिरस्त्राण होते. भिजून काही बटा कपाळावर उतरल्या होत्या. काळ्या भुंग्यांगत भासत होत्या त्या. नाक धारदार होतं. मदनाने हलकेच त्याखाली एक काळी रेषा कोरण्याचा प्रयत्न चालवला होता. ओठ कमानदार होते, नाकाजवळच्या दोन बारीकशा रेखा चेहेऱ्याला अधिकच सौम्य व संवेदनशील करीत होत्या. अपरिचित घोडेस्वाराचा तो सुंदर चेहरा सरदेईच्या अंतः-करणातला एक बंद कप्पा ठोठावत होता. त्यात लपलेला चेहरा व हा समोरचा...... हाही आपलाच कोणी आहे पण कोण ? कुठे भेटला होता हा ?

तरुण घोडेस्वाराने घोडा आवरण्याचा प्रयत्न करूनही तो आवरला जात नव्हता. एकदम लगाम खेचल्यावर तो मागच्या दोन पायावर उभा राहिला तेव्हा सरदेई घाबरली व आत जाऊ लागली. पण तिचा पदर वाऱ्याने उडाला व रिकिबीत अडकला. जसा काही घोडेस्वारानेच पकडला व तिला थांबवली.

सरदेई सराईच्या पायऱ्यावर थांबून डाव्या खांद्यावर मान झुकवून भयार्त नजरेने वळून पाहू लागली. छातीवरून पदर सरकल्यामुळे डावा स्तन साफ उघडा पडला व उजव्या बाजूची वर्तुळरेखा ईषत् दिसू लागली. वाऱ्याने उडणारे केस मधूनच पदराचे काम पार पाडण्याचा प्रयत्न करत होते. रिकिबीत अडकलेला पदर मात्र रसिकतेने

उडत होता. हे दृश्य बघत घोडेस्वार देहभान, ठावठिकाणा सगळेच विसरून गेला होता; नाहीतर त्याने केव्हाच सरदेईचा पदर पार मोकळा केला असता.

पण त्याच्या डोळ्यात वासना नव्हती. नारीचा देह चुकून जरी अनावृत्तसा समोर आला तर पुरुष देहभान विसरतो. साहजिकच आहे ते. पण रसानुभूती ही वासनेपेक्षा भिन्न असते. तो मोह वेगळा असतो. तसाच तो घोडेस्वार सरदेईचे अनावृत्त रूप पाहून मोहित झाला होता.

तिने दोन्ही हातांनी स्वत:च्या शरीराला झाकून टाकले होते व पदर कसा सोडवून घ्यावा हे काही तिला समजत नव्हतं. शरमेने ती चूरमार होऊन गेली.

नाईलाज होऊन ती घोड्याजवळ आली तेव्हा तो जणु शुद्धीवर आला न् वाकून त्याने तिचा पदर सोडवला तेव्हा नकळत त्याचा स्पर्श तिच्या छातीला झाला. तीही रोमांचित झाली व घोडेस्वाराच्या वृत्तीही चंचल झाल्या.

पदर मोकळा होताच ती एका क्षणात आत निघून गेली व दार तिने आतून लावून घेतले. तिच्याकडे बघत घोडेस्वार स्वत:ला विसरून गेला होता. ती जाताच क्षणात त्याची चंचलता नाहीशी झाली व एक मधुर वेदना त्याचे मन व्यापून राहिली.

ती घोडेस्वारापेक्षा वयाने मोठी होती. दुपार ढळायला लागावी तसे तिचे यौवन किंचितसे उताराला लागले होते. पण त्यातही एक अनिर्वचनीय करुण लावण्य लपलेले होते जे चंचल नसूनही अधिक सुंदर, अपूर्व आणि विलोभनीय होते. ते घोडेस्वाराच्या मनाला विंधून गेले होते. उन्हाळ्याच्या पहाटेस चुरगळलेली पुष्पमाला जशी मंद मंद सुगंध पसरवते तसे तिचे कोमेजलेले तारुण्य त्या तरुण घोडेस्वाराच्या संवेदनशील मनाला विचलित करत होते. अनेक तरुणींचा त्याने उपभोग घेतला होता हे त्याचा चेहराच सांगत होता. रूपयौवनाच्या अरण्यातली त्याची भटकेगिरी त्याचे डोळे स्पष्ट दाखवत होते. पण आज चिलिकाच्या या उजाड, निर्जल प्रदेशात त्याने असे एक नारीरूप पाहिले की ज्यात माता, भगिनी व प्रेयसी एकरूप होत्या.

जोरदार वाऱ्याने पावसाला दूर पळवून लावले होते. पण त्याची गती अद्याप कमी नव्हती झाली. दक्षिणेला व पश्चिमेला सायंकाळचा काळोख दाट होत चालला होता पण पूर्वेकडे व उत्तरेकडे संधिप्रकाश अजूनही होता. पक्ष्यांचे थवे त्याच दिशेने उडून चालले होते.

मागून आलेल्या घोडेस्वाराने सांगितले की माणिकपाटना इथून थोडेसेच लांब आहे. रात्रीच्या पहिल्या प्रहरापर्यंत तिथे सहज पोहोचता येईल. महादेवीने अंधारीगडच्या केलु सामंतरायला आधीच खबर पाठवली आहे. त्याप्रमाणे सेनेसहित ते माणिक-पाटण्याला प्रतीक्षेत असतीलच. तिथे रात्र काढून उद्या सकाळी पुढे पुरीला जाऊ.

पण पहिला घोडेस्वार अजून भानावर नव्हता. समुद्राच्या बाजूने एक जलसारसांचा थवा उडत आला, वादळाची पर्वा न करता चिलीकाकडे उडत गेला.

दुसऱ्या घोडेस्वाराने वैतागाने विचारले, "या वैराण वाळवंटात कशाला थांबला आहात कुमार ? कसला विचार करताहात ?"

पहिला घोडेस्वार म्हणजे खोर्ध्याचे युवराज भागीरथीकुमार होते.

त्यांच्यापाठोपाठ आलेले दोन घोडेस्वार वंशीधर श्रीचंदन आणि जगन्नाथ उपाध्याय ललिता महाराणीच्या विश्वासातले सेवक होते. पन्नास घोडेस्वारांचे पथक त्या दोघांच्या बरोबर देऊन तिने कुमारला एका विशिष्ट कामगिरीवर पाठवले होते. रामचंद्रदेवाचे रथयात्रेच्या वेळेचे हक्क काढून घेण्याच्या ज्या उद्देशाने तकीखाँने अमीनचंदाला पाठवले होते, त्याच उद्देशाने राणीने भागीरथीकुमारला पाठवले होते. रथयात्रेच्या वेळी भागीरथीकुमाराला जर छेरापहेरा इत्यादी धर्मविधी करता आले तर खोर्ध्याच्या सिंहासनावरचा त्याचा अधिकार सहस्रावधी जनतेसमोर खुद्द जगन्नाथापुढे शाबीत झाला असता. याच हेतूने ललिता महादेईने पुरीत वाट पाहणाऱ्या वेणू भ्रमरवराच्या अन्य सहकाऱ्यांशी गुप्त सल्लामसलत करून सगळा बेत आखला होता. वेळेवर जर भागीरथीकुमार पुरीला पोचला असता तर आज्ञामाळ त्याच्याचकडे गेली असती, बहुधा. अशा परिस्थितीत रामचंद्रदेवांनी काय केले असते कोण जाणे !

पण विधिघटना काही वेगळीच होती.

पुरी अजून लांब होती. रथयात्रा होऊन चुकली होती. व आज हेरा पंचमीचा उत्सव पुरीत चालला असणार. ज्यासाठी ते बाणपुराहून निघाले होते ते काम सफल होण्याचा आता प्रश्नच नव्हता.

त्यांनी पोता खाडी पार केली न् मालुदचा सेनापती त्यांच्यावर तुटून पडला; पण हे स्वप्न कुणाला पडलं होतं ? आता बाहुडा यात्रेपर्यंत जरी ते पुरीला पोचले तरी खूप झालं म्हणायची वेळ आली होती. पण त्याचीही आशा फार नव्हती.

वंशीधर पुन्हा अधीरपणे म्हणाला, "संध्याकाळ झाली. रात्री तुफानही होईल. आता वेळ कशाला लावताय कुमार ?"

भागीरथीकुमार घोड्यावरून उतरले, म्हणाले, "अशाच रात्रीच्या वेळी आम्ही कंदा नदी पार केली न् मालुद सेनापतीचे कैदी बनलो. असल्या अंधाऱ्या रात्री आम्ही माणिकपाटण्याला नाही जाणार. तुम्ही चला पुढे. आम्ही सकाळी येतो. तिथे जाऊन नावेची व्यवस्था करा. शिवाय मागून पायी येणाऱ्या लोकांसाठीही कुणीतरी थांबलं पाहिजेच ना ! ही समोरची सराई आहेसे वाटते. इथे आम्ही एका रात्रीसाठी थांबतो."

भागीरथीकुमारचा हट्टी स्वभाव वंशीधरला छान माहीत होता. त्याला समजावणं व्यर्थ होतं. खरी गोष्ट अशी होती की नृत्यगायन सोडून रुक्ष राजकारणात पडणं त्यांना बिलकुल रुचलं नव्हतं. पण एकतर महाराणीचा आदेश; शिवाय त्यांना स्वत:लाही खोर्धा सिंहासनाची हाव होतीच, बापाबद्दल एक तिरस्कार होता म्हणून वादळात सापडून उडणाऱ्या पाचोळ्याप्रमाणे पुरीकडे ढकलले जात होते इतकंच. आता ते सकाळी माणिकपाटण्याला येतो म्हणतायत तर प्रलय ओढवला तरी आधी येणार नाहीत हे जाणूनच काही न बोलता वंशीधर पुढे निघून गेला. भागीरथीकुमाराने घोड्याचा लगाम पकडला व ते सराईच्या दिशेने निघाले.

दरवाजाच्या आड उभी राहून सरदेई दार उघडावे की नाही याचा विचार करत होती. तसं तर काय, इतर यात्रेकरू उतरतातच की! तसाच हाही! शेजारच्या खोलीत राहील. काही तर नेहमीचेच असल्याकारणाने सरळ येऊन मुक्काम ठोकतात. बऱ्याच वेळा फिरंग्यांनाही तिने जागा दिली आहे. मग यालाच काय हरकत आहे? आपल्याच मनाशी वाद घालता घालता ती थकून गेली होती. पण उत्तर मिळत नव्हते. दाराच्या फटीतून येणाऱ्या वाऱ्याने तिचा पदर फडफडत होता. तो दूर उडू नये म्हणून दातात धरून तिने साडी घट्ट लपेटून ठेवली होती.

काजूच्या झाडाला घोडा बांधून घोडेस्वार सोप्यात आला.

तकीखाँने बाणपुरात भागीरथीकुमारला कैद करण्याचा हुकूम दिला होता. त्यानुसार हाशिमखाँने फौजेसमवेत बंकाड, नीलाद्रिप्रसाद, चंपागड, कोहडी, छत्रगड वगैरे धुंडाळले होते. पण युवराज सापडले नव्हते. शिवाय महादेईने आपल्या उजव्या हाताप्रमाणे असलेले वंशीधर व जगन्नाथ उपाध्याय बरोबर देऊन युवराजाला पुरीला पाठवले होते. पण तरीही युवराज अलगद एका दुसऱ्याच जाळ्यात फसतील हे कुणाला स्वप्न पडलं होतं? बाणपुराहून येताना हाशिमखाँला चुकवण्यासाठी खोर्ध्याची सडक सोडून, वज्रकोट घाटावर चिलिका सरोवर पार करून ते वाळूच्या पट्ट्यावरून पुरीला चालले होते. त्या बाजूला मोंगलांचं तेवढंसं भय नसतं. म्हणून भागीरथीकुमार त्यांच्या हाती लागेल याची फिकीर नव्हती. पण कंदा नदीच्या तोंडावरच मालुदच्या सेनापतीने दक्षिणेच्या यात्रेकरूंकडून जिझिया कर वसूल करण्यासाठी चौकी बसवली आहे हे युवराजाला ठाऊक नव्हतं.

वज्रकोटहून तिथे पोचेतो कुमारला संध्याकाळ झाली. आषाढाच्या सुरुवातीला नदी साधारणत: कोरडीच असते. फार तर गुडघ्याएवढे किंवा क्वचित् कंबरभर पाणी असते. पण श्रावणात जेव्हा चिलिका भरून जाते तेव्हा एरव्ही मेल्या सापासारखी

पडलेली कंदा नदी फेसाळ पाण्याने भयंकर दिसते. फार पूर्वी मोठमोठी गलबते, पडाव यांची इथून ये जा असायची. पण आता ही खाडी मातीने भरली तेव्हा ते बंद झालं. आता पुरीला जाणारे यात्रेकरू या रस्त्याने पायी पायी जातात. म्हणून तर मालुदच्या सेनापतीने जिझिया कर वसूल करण्यासाठी तिथेच चौकी बसवली होती.

दक्षिणेकडचे सर्वसाधारण यात्रेकरू पायी येतात. भागीरथीकुमाराबरोबरचे लोक जेव्हा बैलगाड्यांतून रसद घेऊन, घोड्यावर स्वार होऊन आले तेव्हाच हे नेहमीचे यात्रेकरू नाहीत याचा अंदाज चौकीवरच्या पहारेकऱ्यांनी केला व रात्रभर अडकवून ठेवून सकाळी फौजदाराकडे नेले. त्याने तेव्हाच ओळखले व कैद करून तकीखाँला कळवले. हाशिमखाँला जे नाही करता आलं ते चुटकीसरशी करून दाखवलं म्हणून बक्षिशीदाखल निदान मनसबदारी मिळेल या आशेने त्याने बिचाऱ्याने टाकोटाक खबर धाडली होती. पण तोवर खोर्ध्याबाबतचे राजनैतिक धोरण तकीखाँने बदलले होते व त्याची इकडे मालुदच्या सेनापतीला खबरच नव्हती.

राजनीती मोठी विचित्र असते. एकवेळ वेश्येचं प्रेम न् चंद्राचे चांदणे या गोष्टी स्थिर राहू शकतील पण राजनीतीमध्ये वैर व मैत्री ढगांप्रमाणे चंचल असतात. थोड्या वेळापूर्वी जो शत्रू असतो तो लगेच जिवश्चकंठश्च मित्र होतो. शत्रूकरता पाजळलेली सुरी मित्राचा गळा कापायलाही उपयोगी पडू शकते. राजनीतीतला सोयिस्करपणा जो असतो त्यात आत्मरक्षण व स्वार्थ हेच धर्म असतात.

खोर्ध्याच्या रामचंद्रदेवाच्या विरुद्ध बंड करण्याच्या अपराधामुळे ज्या भागीरथी-कुमारला कैद करण्यासाठी तकीखाँने हाशिमखाँला फौजेनिशी पाठवले होते त्याच भागीरथीकुमारच्या दोस्तीची जरूर तकीखाँला पडली होती. रामचंद्रदेवाला पुरीहून च्युत करण्यासाठी. कारण पुरीहून अमीनचंदने खबर धाडली होती की वेळेवर जर भागीरथीकुमार पुरीला पोचला तर रामचंद्रदेवाला राजसेवकाच्या अधिकारांपासून वंचित करणं सोपं जाईल व ते धर्मकार्य कुमाराकडून करवता येईल. पितापुत्रात वितुष्ट येईल व त्यात तृतीयपक्षाचा फायदाच होईल.

पुरीला जाताना रस्त्यात कुमारला कैद केले आहे हे वृत्त ऐकताच इनामाऐवजी तकीखाँने हुकूम पाठवला की कोणत्याही परिस्थितीत त्याला पुरीला पोचवा व तेही लवकर. जर वेळेवर तो नाही पोचला तर मालुदच्या सेनापतीला कैद केलं जाईल.

त्यावेळी खुद्द हाशिमखाँ लालबागेतच होता. त्याच्यासारख्या बलाढ्य सेनापतीला जे करता आलं नाही ते एका यःकश्चित फौजदाराने करून दाखवल्यामुळे तो दातओठ खात होताच. म्हणून तकीखाँच्या रागात तेल ओतण्यासाठी तो म्हणाला,

" महाराज, अगदी याच कारणासाठी मी भागीरथीकुमारला बघूनही सोडून दिला

होता. नाहीतर काय बिशाद माझ्या हातून तो सुटला होता. आता या मालुदच्या फौजदाराच्या मूर्खपणामुळे बघा कसा घोटाळा झाला तो !"

पण तकीखाँला आधीच राग आला होता. पाय आपटत तो ओरडला,

" गप्प बैस. ठाऊक आहे तुझ्या हातून काय होतंय ते ?"

भागीरथीकुमारच्या मुक्ततेचा हुकूम घेऊन स्वार मालुदला पोचेतो पुरीला गुंडिचा यात्रा समाप्त झाली होती.

वादळ शांत झालं होतं. आकाशात ढगांच्या पदराआड सप्तमीचा चंद्र खेळत होता. चिलिका ढगांची सावली व चांदण्याचे पांघरूण घेऊन झोपी गेली होती. पण लाटा व काही जलसारस जागेच होते. चंद्र क्षणभर ढगाआड गेला. ढगांच्या आसपास चांदीचे जडावकाम कुण्या कारागिराने केले कोण जाणे ! तो ढग काळा होता. पण त्याच्या कडा चंदेरी होत्या, दुर्दिनाला सुयोगाची किनार असावी तशा.

एरव्ही त्या उजाड वाळूच्या प्रदेशातल्या एका बाजूच्या धर्मशाळेत अशी काही अनोखी भावना भागीरथीकुमाराला कशी प्रतीत झाली असती ?

सताड डोळ्यांनी चंदेरी चिलिकेकडे पाहताना कुमार हाच विचार करत होता. किनाऱ्यापाशी वारंवार येणाऱ्या सारसाप्रमाणे त्याच्या वृत्ती सरदेईकडे धाव घेत होत्या. पण बाणपूरला परतायच्या विचारानेच सगळा रसभंग होत होता. ललिता महाराणी रागीट आहे. खोर्धा सिंहासनावर भागीरथीकुमारला बसवण्याची जी तिने प्रतिज्ञा केली होती त्यात कुमार निमित्तमात्र होता. ज्या रामचंद्रदेवाने यवनी मवत म्हणून आणून तिचा अपमान केला त्याचा बदला घेण्याची प्रतिज्ञा तिने द्रौपदीप्रमाणे केली आहे.

कंदा नदीच्या खाडीपाशी मालुद फौजदाराने कशा प्रकारे कैद केलं तो प्रकार ती कधीच समजून घेणार नाही. ती विचारेल, " मग बरोबरची फौज काय भजन करत होती ?" पण रात्रीच्या वेळी – जवळजवळ रात्रच झाली होती की तेव्हा – मालुदच्या फौजदाराशी मुकाबला करण्याची शक्ती कुमाराच्या सैन्यात नव्हती हे महाराणी कसं समजणार ? शेवटी तिला जेव्हा हे समजेल की कुमार पुरीला वेळेवर पोचलाच नाही तेव्हा दुखावलेल्या नागिणीप्रमाणे त्याच्यावर तुटून पडेल – याचीच काळजी कुमारला पडली होती.

जवळच्याच खोलीत सरदेई पण निद्राहीन अवस्थेत तळमळत होती. क्षुधित चकोरासारखं तिचं मन न जाणे कुठं कुठं पालाण मारत होतं. आशा निराशेच्या द्वंद्वामुळे तिच्या डोळ्यात झोप नव्हती.

संध्याकाळी त्या तरुण घोडेस्वाराला पाहून तिचं इतके दिवस झोपलेलं स्त्रीत्व जागं झालं होतं व वाऱ्याने हलणाऱ्या वेलीप्रमाणे आधार शोधत होते.

मालकुदा गावातील तिच्या सासरची पुसट चित्रं तिच्या डोळ्यासमोर येत होती, तिला व्याकूळ करीत होती. लढायांपायी एवढं भरलेलं गाव पण उजाड होऊन गेलं होतं. तिचं ते घरही एव्हाना वाऱ्यापावसाने धुळीला मिळालं असेल. पूर्वजांच्या त्या जमिनीवर काटेरी झुडुपं वाढली असतील. संसार करण्याची स्वप्नं उराशी बाळगून ती नवी नवरी या गावात आली होती. लाजरी बुजरी, पायाला आळता, भांगात कुंकू, कपाळाला टिळा व ओठावर लाली……

सुहागरात काही संपली नव्हती तोवर गावात शिंग वाजलं. घराघरातून तरुण लढाईच्या तयारीला लागले. सरदेईच्या मोठ्या तीन दिरांनी लढाईतच प्राण गमावले होते. पाईकाचे मुलगे होते ते. ते जन्म घेतात तेच धारातीर्थी पडण्याची प्रतिज्ञा करून. तीन मुलगे गमावल्याने सरदेईची सासू भ्रमिष्ट झाली होती. म्हणून सगळ्यात धाकट्याला ती आडवत होती. नव्या सुनेला म्हणू लागली, " तूच पांढऱ्या पायाची. म्हणून तू या घरात येताक्षणीच लढाईचं शिंग वाजलं. आता तो काय जिता परत यायची आशा आहे ? याआधी तीन गेले होते……एकही आला नाही. या मेल्यानंही कंबर कसलीय. माझं ऐकणार नाही तो. पण तू अडव."

ती बिचारी नवी नवरी होती. अजून नवऱ्याचा चेहेराही धड पाहिला नव्हता. कधी कधी एक रूप तिला अस्पष्टसं आठवतं...काळ्या पाषाणाची सुंदर बलिष्ठ मूर्ती, खांद्यापर्यंत रुळणारे केस. कानात सोन्याची वळी, ताज्या फुलासारखे टवटवीत स्वप्नाळू डोळे, गालावरच्या गालमिशा...पण नीटसं आठवत नाही सरदेईला. डोळे भरून येतात आणि अश्रूंनी ते चित्र अधिकच अस्पष्ट होऊन जातं.

नवऱ्याला ती त्यावेळी काय म्हणणार होती ? त्याचे पाय धरून उन्मळलेल्या वेली-गत ती पडून राहिली. तीही पाईक घरची मुलगी होती. तिलाही ठाऊक होतं की लढायला गेलेले परतून येत नाहीत. तिचा बाप, भाऊ, काका सगळे लढाईला गेले होते. व एकही जण परतून आला नव्हता.

पाईकाची मुलगी व सून होती, तिच्याही अंगात पाईकाचं रक्त खेळत होतं. पण ज्याच्या सोबतीने जन्मभर इथे राहण्यासाठी ती आली होती त्याला मंगलाक्षता उधळून निरांजने ओवाळून निश्चितपणे मृत्यूच्या जबड्यात लोटायला तिचा जीव होईना.

पण तिच्या सासऱ्याला काळजी पडली की सुनेच्या डोळ्याचे पाणी बघून मुलगा घरीच राहतो की काय ! पिशाच्चाने पछाडल्यागत तो बडबडू लागला,

" अरे कोण, आहेस कोण तू ? पाईक की भंगी ? मुसलमान श्रीमंदिरावर हल्ला करणार आहेत. उडिया जातीचे भूषण खोर्ध्याचे महाराज जगन्नाथाला वाचवायसाठी रानावनात हिंडताहेत आणि तुम्ही पदराआड दडून रहा." हातात कुऱ्हाड घेऊन तो नाचत होता. या वयातही लढाईचे शिंग ऐकून त्याला वीरश्री चढली होती.

शेवटी सरदेईनेही आपल्या पतीच्या भालाला कुंकुमाक्षता लावून, ओवाळून, देवीची प्रसादी माळा गळ्यात घालून त्याला निरोप दिला. पण मंगल शंख फुंकताना तिच्या डोळ्यात आसू व वेदनांची दाटी झाली होती. लढाईवर जाणारे युवक वळणावर दिसेनासे झाले व सरदेई तिथेच वादळात सापडलेल्या वेलीगत पडली.

खूप दिवस वाट पाहिल्यावर तिचा पती नाही परतला तर एक तलवार व रक्ताने माखलेले शिरस्त्राण आले. सरदेईच्या सौभाग्याचे अवशेष.

त्या एका आठवणीवर जणू ती जगत होती. या जन्मानंतर आणखी एक जन्म आहे ? कुणास ठाऊक ! तिने एक उसासा सोडला.

बाहेर चांगलीच रात्र झाली. अजून जगुनि आला नाही. दिव्याच्या उजेडात भिंतीवर सावल्या नाचत होत्या. फुरसदीच्या वेळात जगुनीने काळ्यापिवळ्या रंगात जगन्नाथ, बळिराम, सुभद्रा चितारून ठेवली होती. ते चित्रदेखील वरखाली होत होते. त्यावर सरदेईच्या अनावृत्त उभार छातीची सावली दोन भल्या मोठ्या पर्वतासमान पडली होती. समाजाच्या म्हणण्याप्रमाणे ती कलंकित आहे. जगन्नाथाच्या देवळात तिला जाता येत नाही. पण तिच्या हृदयात त्याची मूर्ती आहे तिला कोण काढून लावेल ? जगुनी तर हट्टाने म्हणतोय की पुरीला नेईनच नेईन. तिथे कोण ओळखतंय ? पण तो सर्वसाक्षी ......त्याला काही कोणी सांगावं लागत नाही. त्याला हेही माहीत आहे तिने संबंध हयात निष्कलंकतेत घालवली आहे व शुद्धीवर असताना जाणूनबुजून काही त्या पठाणाला देहदान केलेलं नाही. आता मनात काही वेळा काही विचार आले होते हे खरं आहे. पण त्या काय पाण्यावरच्या रेषा !

बाहेरचं वादळ थांबलं आहे पण जटियानासी डोंगरांकडून ढग भरभरून येत होते. जगुनी तरीही परतला नव्हता. हल्ली कुणा कुठल्या लोकांना घेऊन तो चिलीकेत जातो. विचारलं तरी धड सांगत नाही. शिवाय बालूगावच्या त्या दुर्घटनेनंतर त्यांच्यात एक विचित्रसा दुरावा आलाय. याआधी तिच्याशी किती बोलू न् किती नको असं होत असे त्याला. पण हल्ली तो दूरदूरच राहतो.

तिच्या डोळ्यात आसू आले व गालावरून खाली ओघळले. धुळीने ते पिऊन टाकले.

त्यांचे डाग पसरले व काही वेळाने दिव्याच्या उजेडात डोळयागत दिसू लागले.

पुन्हा एकदा तिच्या डोळयांसमोर ती निर्जन सुनसान दुपार आली. तेव्हाच तर मालकुदा गावात तो तहानेला घोडस्वार आला होता......त्याचे ते उदास डोळे...... तशी असहाय उदास दृष्टी सरदेईने याआधी कधीच पाहिली नव्हती. कोण जाणे का ते, पण त्याला पाहताच सरदेईच्या मनात जिव्हाळा उफाळून आला होता. त्याच्या कपाळावरचा घाम आदराने पुसून पदराने वारा घालून त्याला थोपटून झोपवावं असं तिला फार वाटलं.

ती एकटीच असली की कधीकधी ते डोळे चिलिकेवर तरंगणाऱ्या मेघच्छायेगत तिच्या मनात तरंगतात.

आज आणखी एक घोडेस्वार आलाय.

आता कुठे तिला आठवण आली की याचे डोळे व ते मालकुदा गावातले डोळे यात खूप साम्य आहे.

पण ही दृष्टी रानटी आहे. त्या दृष्टीसारखी ही असहाय नाही. स्नेहभरित तर नाहीच पण कोणतीतरी दूरवरची तृषाही त्यात प्रतिबिंबित नाही.

सरदेईच्या अंगावर काटा आला. दरवाजातून येणाऱ्या वाऱ्याने बहुधा आपल्याला बेचैन केलं असावं असं वाटून तिने अनावृत्त छातीवरून नीट पदर घेतला, पायावर वस्त्र ओढून घेतलं.

बरीच रात्र उलटली होती. जगुनि परत येईल की नाही कुणास ठाऊक? त्या दिवशी देखील असाच कुठंतरी गेला होता तो थेट दुपार उलटल्यावर आला होता. त्यावेळी माणिक पाटण्याच्या दिशेला समुद्रावर पहाटेचा तारा उगवू लागला होता.

पडल्या पडल्या मागच्या गोष्टींची आठवण काढायला सरदेईला फार आवडतं.

संध्याकाळपासून पदराच्या टोकाशी बांधलेली अंगठी सोडवून न्याहाळायसाठी तिचा जीव थोडा थोडा होतोय. पण तिला कशामुळे कुणास ठाऊक धीर नाही होत.

संध्याकाळी आलेल्या त्या घोडेस्वाराने सरदेईकडून दूध आणि खवा घेतला. पैसे नव्हते म्हणून अंगठी ठेवली आहे.

..... दिवस कलला होता. चांदणं निस्तेज होतं कारण आकाशात मळभ होतं. सरदेईने दिवा लावला. तिला दुसऱ्या खोलीतली त्या युवकाची चाहूल ऐकू येत होती. नेहमी सराईतल्या उतारूंची देखभाल, हवं नको जगुनी बघतो. आजच नेमका तो नाही. सरदेईने एक दिवा लावला न् त्याच्या खोलीत नेऊन ठेवला. सुरईत पाणी भरलं. जेवणाचं तो काय करणार? स्वत: रांधणार का तिनं रांधलेलं खाणार हे मात्र तिनं विचारलं नाही. भूक लागली की आपणहूनच मागेल.

असाच काहीसा विचार ती करत होती तोच दरवाजावर कोणीतरी थाप मारली. ती चमकली. हा काही वारा नाही. वादळ देखील शांत झालं होतं. घाबरत ती उठली व तिने दार उघडलं. समोर घोडेस्वार उभा होता.

अशा वेळी त्या अपरिचिताला समोर बघून ती झटकन् दाराआड झाली. दाराची एक फळी घट्ट पकडून ठेवली. घोडेस्वाराला तिची पावलं व दाराच्या फळीवरची चाफेकळीगत बोटं तेवढी दिसत होती. पण त्याचे स्पष्ट दर्शन तिला होत होतं.

घोडेस्वाराने विचारलं, " दही मिळेल काय ?"

बऱ्याच वेळा तोच प्रश्न आल्यावर नाईलाजाने तिला उत्तर द्यावंच लागलं. ती म्हणाली, " दही नाही पण दोन घडे दूध आहे. "

त्याच्या ओठावरच्या खोडसाळ स्मिताचे क्षणार्धात खदखदून हसण्यात रूपांतर झालं· तो का हसला ते ध्यानात येऊन ती लाजेने चूर झाली. तिच्या चेहऱ्यावरची लाली घोडेस्वाराला मात्र दिसली नाही. आपलं हसू थांबवून त्याने पुन्हा विचारलं, " पाणी-बिणी मिसळलेलं नाही ना ?"

तोवर सरदेईचा संकोच कमी झाला होता. ती बाहेर आली व म्हणाली,

" आपल्या गोठ्यातलं दूध असेल तर खात्रीपूर्वक सांगता येतं. हे विकतचं दूध. त्याची खात्री कुणी द्यावी ?"

पुन्हा एकदा घोडेस्वाराला हसू फुटलं. पण यावेळी तो का हसला अन् पाण्याचाही काही अर्थ असतो हे सरदेईला कळलं नाही. घोडेस्वाराच्या हसण्याने ती शरमेने चूरमार होत होती.

तो म्हणाला, " बरं, जे असेल ते दे."

सरदेई आत गेली. दोन घडे दूध व थोडा खवा आणून त्याच्यासमोर ठेवला. त्याला पैसे बियसे देण्याची सवय नसावी बहुधा; वस्तू उचलून जेव्हा तो आत जाऊ लागला तेव्हा सरदेईने विचारलं, " पैसे ?"

आकाशातून धपकन् खाली पडावं तसा तो जागच्या जागीच थांबला. मग संकोचून म्हणाला, " पैसे नाहीत मजजवळ. अडचणीत सापडलो म्हणून एक रात्र इथं काढावी लागते आहे. " बोलता बोलता त्याने आपल्या बोटातली अंगठी काढली. त्यात एक मोठा निळा खडा जडवला होता. पुढं करून तो म्हणाला,

" ही ठेव. जातेवेळी पैसे देईन अन् ही घेऊन जाईन. "

खाणावळ चालवणारी सरदेई अशी किमती वस्तू ठेवून घ्यायला खळखळ कशाला करील ?

सरदेई नंतर विचारपूस करू लागली, "कुठं जाणार आहात तुम्ही? कुठून आलात? एकटेच आलात?"

"एकटाच आहे मी. तू?" उसासा सोडत तो उत्तरला.

दिव्याच्या उजेडात अंगठी न्याहाळत अन्यमनस्क भावाने ती उत्तरली, "जगुनि आज परतेल असं वाटत नाही."

त्याच्या पातळ जिवणीवर खटयाळ हसू फुललं व सरदेई लाजेने लाल झाली.

आपल्या डाव्या हातावर मस्तक ठेवून पडल्या पडल्या दिव्याकडे पहात सरदेई मनातल्या मनात स्वत:ला दूषण देत होती की कशाला तिने आपण एकटं असल्याचं सूचित केलं? तो काय म्हणत असेल मनात?

पुन्हा बाहेर आकाशात ढग जमू लागले होते. दरवाज्यातून येणाऱ्या वाऱ्याने दिव्याची ज्योत फडफडत होती. त्याच वेळी सरदेईला वाटलं की दरवाजावर थाप पडली. उत्कंठा व एक विचित्र भावना यांनी ती थरथर कापू लागली.

आवाज बंद झाला. भिंतीवरचे जगन्नाथाचे चित्र पुन्हा हलू डोलू लागले.

पुन्हा तोच आवाज आला. ती एकटी आहे हे माहिती असल्याने घोडेस्वाराने तर दरवाजा ठोठावला नाही? त्याच भीतीने दरवाजा न उघडता ती बसून राहिली. पण थापांचा आवाज वाढत चालला. ती उठली व तिने धीर करून दरवाजा उघडला. त्या दिवशी बालूगावात पठाणाने तिला उचलले तेव्हा जशी ती पाषाणवत् थंडगार पडली तशीच आताही झाली.

तिने दरवाजा उघडताच जोराचा वारा आला. पण दरवाज्यात कुणी नव्हतं. शुक्लातला चंद्रमा मावळला होता.

सराईच्या सोप्याखाली चाफ्याच्या झाडाखाली घोडा बांधला होता. तोच खूर आपटत होता. वारा आणि चिलिकेच्या लाटांचा आवाज एक होऊन भयंकर वाटत होता. अजून जगुनि परतला नव्हता.

तोंडावर आलेल्या बटा बाजूला सारून पुन्हा एकदा सरदेईने हाक दिली, "जगुनि, अरे जगुनि ऽऽ".

वाऱ्याच्या झोताबरोबर प्रतिध्वनी परत आला.

तिने आत येऊन दरवाजा बंद केला इतक्यात जगुनीची हाक आली, "देई."

तिने ताबडतोब दार उघडलं. तो आत आला व कनवटीस खोचलेला रुपया खणकन् फरशीवर टाकून म्हणाला, "नीट ठेवून दे. ते आणखी देणार आहेत."

तो चांदीचा नूरजहाँनो रुपया होता. सर्वसाधारण घरातून हे आढळण कठीणच. ह्या कुणी दिला, का दिला वगैरे हजार प्रश्न तिच्या मनात आले. ती काही विचारणार तोच जगुनीने विचारलं, " बाहेर घोडा कुणाचा बांधलाय देई ?"

सरदेई उत्तरली,

" संध्याकाळी एक घोडेस्वार आलाय व सराईत राहिलाय. तू नव्हतास. माझी मोठी पंचाईत झाली बाबा."

जगुनी म्हणाला, " म्हणजे ते खरंच बोलत होते तर."

तिला हे कोडयातलं बोलणं कळेना. तिने विचारलं, " काय म्हणत होते ?"

त्या प्रश्नाचं उत्तर न देता जगुनि विचारू लागला, " हा कोण आहे ठाऊक आहे तुला ?"

सरदेई म्हणाली, " नाही बाबा. इथं किती येतात किती जातात."

जगुनीने सांगितले, " तू मला एकदा पत्र देऊन खोर्ध्याच्या राजाकडे पाठवलं होतंस ना, त्याचाच मुलगा आहे हा. बापाबरोबर युद्ध करायला पुरीला चाललाय."

चमकून तिने विचारलं,

" बापलेकात लढाई ? तुला कोण म्हणालं ?"

पदराच्या टोकाला बांधलेली अंगठी जगुनीला दाखवावी असं तिच्या मनात येऊनही तिने दाखवली नाही. तिला हे सर्व कोडं सुटत नव्हतं.

जगुनीला ती म्हणाली, " हे बघ, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. सगळं सांग बघू. किती तरी दिवस ओळखीच्या ना देळखीच्या लोकांबरोबर हिंडत असतोस. चिलिकेत तुझं काय काम ? कोण आहेत हे लोक ?"

त्याने एक जांभई दिली व दिवा मालवला, म्हणाला, " काही विचारू नकोस. सांगायचं नाही अशी आण घातली आहे. भारी थकलोय. झोपतो आता. पुन्हा पहाटे जायचंच आहे."

दिवा मालवून त्याचं घोरणं सुरू झालं. पण सरदेईच्या डोळ्यात झोप नव्हती, वाऱ्याच्या पंखांनाही विश्रांती नव्हती.

# दहा

## 1

आज नवमी आहे. उद्या बाहुडा यात्रा. परवा अधरपणा भोग. मग नीलाद्रिविजय. त्यानंतर जगन्नाथ मंदिराकडे परत येतील व रथयात्रेचा सोहोळा संपेल.

पण त्यानंतर !

रामचंद्रदेवाच्या मुखमंडलावर कठोरपणा पसरला. विचाराने भुवया आकुंचित झाल्या. डोळे सातपडा बेटापलीकडच्या वोरूंच्या जाळ्याकडे गेले.

दुपारच्या उन्हात दूरवर दिसणारे जंगल स्निग्ध कोमल वाटत होतं. पूर्वेकडून वाहणाऱ्या थंड वाऱ्याने रामचंद्रदेवाचे केस अस्तव्यस्त झाले होते व डोळ्यावरही आले होते. गालावर दाढीचे केस बुरखुंड्यासारखे आले होते. त्यामुळे चेहऱ्यावर मलीन कळा आली होती.

छोटे उपाध्याय विष्णु पश्चिम कपाट महापात्र गाल हातांवर टेकवून विचारमग्न होऊन चिलिकेच्या अथांग जलराशीकडे एकटक पहात बसले होते. मधून मधून रामचंद्र-देवाकडेही ते पहात होते. त्यांच्या मनात खळबळ माजली होती. पण ते गुपचूप बसले होते.

नावेने डाव्या बाजूला बरूणकुदा सोडले. गुरुबाई बेटापासून ती उत्तरपूर्व दिशेकडे सरकू लागली. पूर्वेचा वारा समोरून येत होता म्हणून चिलिकेच्या फेसाळ लाटा पश्चिमेला जात होत्या. समोरून उलटा वारा नव्हता म्हणून आतापर्यंत नाव स्वच्छंद गतीने चालली होती. पण आता मात्र जरा कठीण होणार होतं. जगुनी कमरेपासून वाकून दोन्ही हातांनी वल्हवत होता. त्याच्या दंडातल्या बेटकुळ्याही लाटांप्रमाणेच लहानमोठ्या होत होत्या.

चिलिकेवर सुनसान होते. मच्छीमारांच्या होड्या किनाऱ्याला लागल्या होत्या.

जगुनीने मागं वळून पाहिलं. कालीजाईच्या डोंगराआड सूर्य मावळायला लागला होता. चिलिकेच्या पाण्याला दोन भागांत विभक्त करीत मावळणाऱ्या सूर्याच्या एका किरणाने चिलिकेच्या जळभांगात सिंदूर भरला होता. पूर्वेच्या बाजूने पक्ष्यांचा एक थवा घरट्यांच्या दिशेने चालला होता.

तोच एक छळणारा प्रश्न रामचंद्रदेवांच्या मनात पुन्हा पुन्हा येत होता,

"त्यानंतर ?"

बरूणकुदा द्वीपावरचं जंगल एकसंध व दाट आहे; त्यात फट अशी कुठेच नाही. त्यालाच न्याहाळत त्याच्या दुर्गमतेची कल्पना रामचंद्रदेव मनाशीच करत होते. एक हुशार व सजग सेनापतीच्या दृष्टीतून ते पहात होते की इथवर मोगल सेना येऊ शकेल किंवा कसे ?

लव्हाळी व बोरूंचे गवत यांनी चिलिकेत जागोजाग बेटे तयार केलीत. जिथे लव्हाळी खाली वाकून पाण्याला स्पर्श करीत होती तिथे शांत व एकांत अशी जागा तयार होत होती. ताडाचे एकटेच झाड तिथे सावध पहारेकऱ्यागत उभे होते व तिथल्या एकांत–रहस्याची जपणूक करत होते.

काळचा पक्ष्यांचा एक थवा सातपडा बेटाकडून उडत आला आणि चिलिकेच्या सावल्यांनी सावळचा झालेल्या जळावर पसरला. अनादि अनंत अशा आनंदाची लेकरे म्हणजे हे पक्षी. यांना भय, भीती, चिंता, दुश्चिह्न, वैताग काही नाही. देशात मोंगलांच्या हल्ल्याचे भय आहे अन् श्रीजगन्नाथ चिलिकेत कुठेतरी लपून बसायला येणार आहेत याचे त्यांना काहीच वाटत नाही; हे त्यांना समजतच नाही. पाण्यावर तरंगणे व आसपासची वनश्री एवढेच त्यांना समजत असावे.

एक उसासा सोडून रामचंद्रदेवाने चिलिकेकडं पाहिलं.

हळूहळू लांबवर पाण्यावर मउसा–ब्रह्मपूर बेटाचा कासवाच्या पाठीसारखा आकार दिसू लागला. बिचारे हे बेट ! उत्कलच्या इतिहासातील अनेक विश्वासघात, विडंबना, नीच देशद्रोहाच लांछन या अनामिक बेटावर फासलं गेलं होतं. त्याकडे बोट दाखवून रामचंद्रदेव म्हणाले, "कालापहाडने पुरीवर आक्रमण केल्याची बातमी कळली तेव्हा उपाध्याय दिव्यसिंह पट्टनायकने जगन्नाथाला माणिकपाटणाच्या खाडीत नावेत बसवले व तिथेच त्याला भूमिगत केले. पण अंधारीचा दानपाहांता सिंह द्रव्याच्या लालसेने कालापहाडला इथं घेऊन आला. पत्तामुद्रा लागताच जगन्नाथाला हत्तीवर लादून घेऊन गौड सडकेने कालापहाड गेला. विश्वासघाताचे पारितोषिक म्हणून दानपाहांताला घोडाशिरिया, चबिश कुद व राहांग प्रांताची जहागिरी मिळाली. शिवाय पाहांतासिंह ही पदवी मिळाली होती. आजही असल्या पाहांतासिंहांची काही कमी नाही. शत्रूशी संगनमत करून उत्कलला कोचून तोडून घायला ते कमी करणार नाहीत."

अशांना जगन्नाथ कधी शिक्षा करणार नाही काय ?

थव्याथव्याने पक्षी मउसा–ब्रह्मपूर बेटाकडे उडत होते. सांजप्रकाशाने चिलिका लाल झाली होती. रथयात्रा उरकून परतणारे अनेक यात्रेकरू माणिकपाटणा घाट उतरून वाळूच्या पट्ट्यावरून चालले होते. त्यांची अनेक ठिकाणी दिसणारी मुंग्यांसारखी रांग व काही काही ठिकाणी एकत्र जमलेला घोळका हे सर्व सांध्य–आकाशाच्या पार्श्वभूमीवर छायाचित्रांसारखे वाटत होते, हळूहळू अस्पष्ट होत जाणाऱ्या छायाचित्रासारखे.

रामचंद्रदेव आपल्या मनात घोळवत होते...आज नवमी. उद्या नव्हे परवा अधरपणा भोग, मग नीलाद्रिविजय, पण मग ? त्यानंतर ?

तोच छळणारा प्रश्न !

चिलिकेचे पाणी अनिमिष नेत्राने न्याहाळणारे छोटे उपाध्याय विष्णु महापात्र काही वेगळाच विचार करत होते. या अथांग पाण्याचंही आपलं असं एक विश्व आहे. त्याला स्वतःचं हृदय आहे, भावना आहे. पण वरवरच्या त्याच्या लाटांवरून त्याचा पत्ता लागत नाही. ते रहस्यमय जीवन व हृदय सात ताड खोलवर लपलेलं आहे; जसे मनुष्याचे मन तळाशी हजार काळज्या चिंता लपवून ठेवते तसे. जर चर्मचक्षूंना त्या दिसू शकल्या असत्या... माणसाच्या मनातील रहस्यांचा उलगडा झाला असता तर... हे रामचंद्रदेव कसला विचार करताहेत ? उपाध्यायांनी त्यांच्याकडे पाहिलं.

स्वप्नातून जागं व्हावं त्याप्रमाणे रामचंद्रदेवांनी विचारलं, " आणि ह्यानंतर ?"

या प्रश्नाचा रामचंद्रदेवांच्या मनातला संपूर्ण संदर्भ उपाध्यायांना झटकन् समजला नाही. ते म्हणाले, " मउसा–ब्रह्मपूरमध्ये अजूनही जगन्नाथाचे ते स्थान आहे. "

जगुनीचं त्यांच्या गोष्टींकडे लक्ष होतं. नावेची दिशा बदलली होती म्हणून वल्हवणं सोपं होतं.

तो म्हणाला, " पुरीहून परतताना यात्रेकरू रसकुदा घाटावरून मउसा–ब्रह्मपुरीस जातात. मी आता तुम्हा लोकांबरोबर इकडे तिकडे हिंडतोय. एरव्ही या दिवसात मला कुठची फुरसद असायला ?"

विष्णु महापात्र त्याच्या जवळच बसले होते. प्रेमाने त्याच्या पाठीवरून हात फिरवत ते बोलले, " काळजी करू नकोस. हे तुझे श्रम व्यर्थ नाही जायचे. त्या यात्रेकरूंकडून तुला जे पैसे मिळतात ना त्याहून कितीतरी जास्त आम्ही देऊ. पण हे बघ, चुकूनही कुणाकडे बोलू नकोस हं की असे असे आम्ही गुरुबाई बेटावर गेलो होतो म्हणून. "

नाही अशा अर्थी मान हलवत जगुनि गंभीरपणे उत्तरला, " छे–छे ! मी कशाला कुणाला सांगायला जातोय ? मी जगन्नाथाशी बेईमानी करणार नाही. भले तुमच्याकडून पैसे न का मिळेनात. "

स्नेहदृष्टीने रामचंद्रदेवांनी त्याच्याकडे पाहिलं. कितीतरी दिवसांपासून तो त्यांच्या-बरोबर नाव घेऊन भटकत होता. कधी त्याने तक्रार केली नाही, दमलो म्हणाला नाही की चुकारपणा केला नाही. त्याच्याबद्दल अपरंपार प्रेम रामचंद्रदेवांच्या मनात उफाळून आलं. स्निग्ध स्वरात ते म्हणाले, "अरे जगुनी, तुला कुठंतरी पाहिलंय. पण नीटसं आठवत नाही."

जोरात वल्हवत गर्वाने तो म्हणाला, "आपण मोठे माणूस. राज्याचे राजा. मी एक मामुली माणूस. आपल्याला कशी आठवण राहणार माझी ?"

रामचंद्रदेवांना आश्चर्य वाटलं. त्यांनी विचारलं, "तुला रे कसं ठाऊक मी राजा आहे ते ?"

त्यांना निरखून बघत जगुनि म्हणाला, "वा, सरदेईचं पत्र घेऊन नव्हतो का आलो मी बालूगावाहून खोर्धागडला ?"

विस्कटलेल्या केसांना रामचंद्रदेव नीटनेटके करण्याचा प्रयत्न करू लागले. हळूहळू विस्मृतीत दडलेली जगुनीची मूर्ती त्यांच्या मन:चक्षूसमोर आली. हाच मुलगा त्या दिवशी खोर्ध्याला आला होता बक्सी वेणू भ्रमरवरने ललिता महादेईच्या नावे लिहिलेलं पत्रं घेऊन. एकादे भारलेले कवच असावे त्याप्रमाणे त्या पत्राने एका घोर संकटातून रामचंद्रदेवांचे रक्षण केले होते. याच त्या कोणत्याशा सरदेईने बालूगावच्या कोणा सराईत बक्सीच्या नोकरांकडून चोरून या मुलाहाती पाठवले होते. कोण ही सरदेई ? कुठे आहे तिची सराई ? आणि हा जगुनि तरी बालूगावची ती सराई सोडून इथे काय करतो आहे ? या चिलिका तटावर ह्याचं काय काम ? हे सगळंच एकाद्या कोड्यासारखं होते त्यांना. पण आपल्या उपकारकर्त्याला आपण ओळखायला विसरलो याबद्दल त्यांना लज्जा वाटत होती.

सातपडा व मउसा—ब्रह्मपूर यांमध्ये चिलिका एखाद्या खंदकासारखी आहे. याची लांबी माणिकपाटण्याची खाडी ते हरचंडी नदीची खालकाटि पाटणा खाडीएवढी आहे. त्याच्या दुतर्फा गहन अरण्य आहे. त्याच्या किनाऱ्यावर एरा पक्ष्यांचे थवेच्या थवे येऊन विसावत होते. अस्ताला जाणाऱ्या सूर्याने त्यांच्या पसरलेल्या पंखांवर अबीर उधळला होता. काही पक्षी रामचंद्रदेवांच्या डोक्यावर चक्कर घेत उडत होते. गुरुबाई बेट खूप मागे राहिलं होतं. बरुणकुदा तर दिसतच नव्हतं. कालीजाई पहाडही अंधारामागे लपू लागला होता.

समोरची माणिकपाटण्याची खाडी काळोखासारखी रहस्यमयी वाटत होती. खाडी जवळ असल्याने चिलिकेवर लाटा उसळत होत्या व म्हणून नावही डळमळत होती.

जगुनीने दोन्ही हातांनी नाव सांभाळत रसकुदा घाटाकडे बोट दाखवून म्हटलं,

" ती पहा ती आमची सराई. चिलिकेच्या तटावर कळकाच्या बेटापाशी कुणीतरी उभं आहेसं वाटतं. आमची सरदेई असणार."

वाळूच्या तट्टचावर एखादे काळोखाचे ढेकूळ असावे तशी सरदेईची सराई वाटत होती. रामचंद्रदेवांनी तिथून दृष्टी वळवली व जगुनीला विचारलं, " तू सरदेईशीही या बाबतीत बोलत नाहीस ना ? आमच्याबरोबर हा असा चिलिकेत हिंडतोस वगैरे ? कुणाला कळता कामा नये हं. "

जगुनि उत्तरला, " नाही. " मग थोडा वेळ गप्प राहून म्हणाला, " ती वारंवार विचारते अगदी आग्रहानं. पण मी कशीतरी वेळ मारून नेतो झालं. जगन्नाथाशी बेईमान कसा होऊ ? आता माझ्यावरती रागावते हे खरं आहे. पण काय करणार ? रागावू दे झालं. "

आदल्या दिवशीही जेव्हा भल्या पहाटे जगुनि गुरुबाईला नाव घेऊन जाण्यासाठी घरातून निघाला तेव्हा त्याची वाट अडवून सरदेई उभी राहिली होती. रडतरडत म्हणाली होती, " अरे, रात्र न् दिवस, वेड्यासारखा कुठं रे जात असतोस ? माझी शप्पथ आहे. सांग बघू. "

तिला भीती वाटत होती की यात्रेकरूंना लुटणारे, किंवा गंजा बंदराकडे जाणारी गलबतं लुटणारे जे चोरडाकू आहेत त्यांना हा जाऊन मिळाला वाटतं. वाळूच्या पट्टचाच्या उत्तरेला थोडं दूर नरसिंह पाटना, दक्षिणेला कलावंतगुंफा आहे; या इथंच गंजागडच्या सीमेला लागून जगाई माधाई गुंफा आहे. तिथं गाठून हे दरोडेखोर बिचाऱ्या असहाय्य यात्रेकरूंना लुटतात. गलबतं कशी लुटली जातात त्याच्या थरकाप-वणाऱ्या गोष्टी तिने ऐकल्या आहेत. डाकू कधीकधी शिकारीचा मागोवा घेत सरदेईच्या सराईतही येतात. पण कुणाला बाप तर कुणाला मामा, भाऊ मानून तिने स्वतःची सोडवणूक करून घेतली आहे. ते तिच्या सराईत येतात, लुटींची वाटणी करतात आणि दारू पितात. कधीकधी भांडतात व सरदेईचा निवाडा मानतात. कधी जगुनीही त्यांच्या गोष्टी करतो. म्हणून सरदेईला भीती वाटते की त्यांच्याबरोबरच तो जात तर नाही ?

पण तिच्या सगळ्या आणाशपथा बाजूला सारून तो निघून आला. माणिकपाटणावर पहाटतारा प्रकाशत होता. अजून पाखरंही झोपली होती. पाठीमागून हाक मारत सरदेई रडकुंडीला आल्या स्वरात म्हणत होती, " जगुनि, पुरीहून येणारे यात्रेकरू येतील आता. माझ्या एकटीच्यानं कसं झेपेल हे सारं ?" पण जगुनि झपाझप चालत रसकुद्याला निघाला.

तीच बहुधा ढळत्या सांजवेळी उजाड घाटावर त्याची वाट बघत असणार.

हळूहळू रसकुदा घाट एका वळणावर दिसेनासा झाला. नवमीचा म्लान चंद्र दोन ढगांच्या तुकड्यात मगरीच्या तोंडातल्या मोत्यागत दिसत होता.

अरखकुदा अजून दूर आहे. माणिकपाटण्याला नावेतून उतरून घोड्यांवरून जावं लागतं.

आतापर्यंत मनातच दाबून धरलेले अनुमान विष्णु महापात्रने बोलून दाखवले. म्हणाले,

"महाराज उगीचच भीत आहेत. मला नाही वाटत तकीखाँ श्रीक्षेत्रावर हल्ला करील."

"असं वाटायचं कारण ?" रामचंद्रदेवांनी चिंतित स्वरात विचारलं.

विष्णु महापात्रनी स्पष्टीकरण देत म्हटलं, "पहिली गोष्ट म्हणजे अजून मुर्शिदाबादेच्या तख्तावर उदार धोरण असलेला सुजाखाँ आहे; तेव्हा तशी भीती जगन्नाथाला नाही."

"हो, पण तोच सुजाखाँ जेव्हा कटकेला नायबनाजिम बनून आला होता तेव्हा मोंगलांचं राज्य संकटात नव्हतं आणि खुद्द जगन्नाथही उत्कलच्या एकीचे केंद्र बनले नव्हते." रामचंद्रदेव.

महापात्र उत्तरले, "खरं आहे आपलं म्हणणं. पण पाईकांनी मोंगलांशी जी दीर्घकाळ टक्कर दिली आहे त्यामुळे त्यांचं सामर्थ्य क्षीण झालं आहे. ही गोष्ट तकीखाँला छान माहिती आहे. तेव्हा त्यांच्याकडून सध्यातरी कसलीच भीती नाही हेही तो जाणतो."

रामचंद्रदेव शांत स्वरात म्हणाले, "मला नाही असं वाटत, याहून काही वेगळं कारण आहे का ?"

विष्णु महापात्र म्हणाले, "इथल्या मोंगल सत्तेचं द्रव्यसंपादनाचं एकमेव ठिकाण म्हणजे जगन्नाथ. त्याच्या यात्रेकरूंकडून जो जिझिया मिळतो तो सोडायला ते सहजासहजी तयार होतील काय ? तकीखाँने जिझिया बसवला तेव्हापासून दरवर्षी नऊ लाख रुपये मुर्शिदाबादेला जात आहेत. शिवाय नोकरवर्गाचे, ठेकेदारांचे हात ओले होतातच आहेत. म्हणून जगन्नाथालाच उखडून स्वतःचं नुकसान का होऊन देतील ते ?"

वाळूचा निर्जन पट्टा व माणिकपाटण्याची खाडी यामधला चिलिकेचा भाग संकीर्ण आहे. म्हणून तो अनेक प्रवाहांनी भरला आहे. शिवाय संध्याकाळी भरतीही सुरू झाली होती. इथून नाव चालवणे फारच कष्टाचे असते. ठायी ठायी भोवरेही आहेत. त्यात सापडून नाव बुडायची भीती असते. त्यामुळे इथली नीट माहिती असलेला नावाडी

असेल तर बरे. एरव्ही कुणी जातही नाही म्हणा. जाणते नावाडी भोवऱ्यांपासून दूर किनाऱ्याच्या जवळून चालतात.

अचानक एक मोठी लाट आली आणि तिने नावेला खालीवर केले. जगुनीने 'जय आई कालीजाई' म्हणून नावेला किनाऱ्याकडे वळवले. त्यानंतर हंसासारखी ती मंथ गतीने चालू लागली. किनाऱ्यावर वाळूचा बांध बनला होता; त्यापलीकडून समुद्राची गर्जना ऐकू येत होती. तिच्यापुढे सगळे आवाज लोपले होते.

रामचंद्रदेव म्हणाले, "तकीखाँ एका दगडात दोन पक्षी मारू पाहतोय. जगन्नाथावर हल्ला करून तो द्रव्य गमावायचा विचार करत नाही आहे तर त्याच्यामुळे जी खोर्ध्याला केंद्रबिंदू करून उत्कलची राजनैतिक शक्ती वाढते आहे तिला गारद करायचं आहे त्याला. म्हणून तर अमीनचंद पुरीचा नायब बनून येतो आहे. तो हिंदू आहे. तेव्हा जगन्नाथाला शिवाशीव व्हायचा प्रश्न येत नाही. पण खोर्धा राजा त्यामुळे जगन्नाथाचे राजसेवक म्हणून राहू शकणार नाहीत; आणि अर्थातच बाकी राजे व सामंत त्यांना मानणार नाहीत. मी जर अमीनचंदला विरोध करीन तर राजसिंहासनावरून माझे उच्चाटन करून भागीरथीकुमारचे बाहुले बसवले जाईल या आशयाची खबर बाणपुरास गेली आहे. युवराज हाच मार्ग पार करून पुरीला गेलेत. मला ठाऊक आहे."

चिलिकेवर चंद्रप्रकाश पसरला होता. फेसाळत्या लाटा व भोवरे या प्रकाशात चमकत होते. अर्थात् जवळच अथांग अंधारही नांदत होता. जलसारस मात्र कोणत्याही भयापासून मुक्त होऊन छायाप्रकाशाच्या त्या महास्रोतातून उठून इथे तिथे उड्या मारत होते.

रामचंद्रदेव म्हणाले, "आतापर्यंत मोंगल सेनापतीच्या हातून जगन्नाथ भ्रष्ट होत आलाय. आता अमीनचंदासारख्या कुलांगार हिंदूच्या हातून ते पापकर्म व्हायचं आहे. तुमचं नशीब म्हणून तुम्ही तिथं ते दृश्य पाहयला नाही आहात गौरी राजगुरूंनी जर या कामी अमीनचंदाना सहकार्य केले तर त्यांना इनाम व जहागीर मिळेल. तशी हामीही त्यांना मिळाली आहे. पण यानंतर तुमचे उपाध्यायपण संपलेच म्हणून समजा. बंडखोरांच्या यादीत तुमचे नाव एव्हांना दाखल झालेच असेल."

विष्णु महापात्र अजून तरुण आहेत आणि उत्कलवासीय असल्याचा अभिमान त्यांना आहे. जगन्नाथाचे व श्रीमंदिराचे ते परंपरागत सेवक आहेत. त्यांच्या पूर्वजांनीही जगन्नाथाला मोंगलांपासून वाचवण्यासाठी अनेक साहसे केली आहेत. त्याच्या स्मृती व अभिमान त्यांच्या धमन्यांतून वाहात आहे.

आता खाडी जवळ आली होती. प्रकाश जणू उसळ्या मारत होता व त्यात दश-

दिशांचा लोप झाला होता. जगुनीने किनारा सोडला व तो माणिकपाटण्याच्या बाजूला सरकू लागला.

जवळच एक भोवरा गरगरत होता. त्याच्या मध्यभागी मात्र स्तब्धता होती. जवळ जाताच नाव गोल गोल फिरायला लागली. सुकाणू पकडून आणि कालीजाईचा जयजयकार करत जगुनि नाव बाहेर काढायचा प्रयत्न करू लागला. पण भोवऱ्याचे केंद्रस्थळ हळूहळू पसरत होते. तिथे नाव पोचली की आटोपलंच.

मागून येणाऱ्या एका लाटेने ढकलल्यामुळे नाव वाळूच्या पट्ट्याकडे सरकली. एक उसासा सोडून उपाध्यायांनी म्हटलं,

" जय आई कालीजाई."

जगुनीने सुकाणू सोडलं व म्हणाला, " जोवर भरती ओसरत नाही तोवर थांबलं पाहिजे."

रामचंद्रदेव एकटक त्या भोवऱ्याकडे पहात होते. वल्हं हातात घेऊन ते उपाध्यायांना म्हणाले, " तुम्ही सुकाणू सांभाळा. मी वल्हवतो."

जगुनि नावेच्या कडेला बसून जोरजोराने कालीजाईचा जयजयकार करू लागला. एखाद्या वेड्याप्रमाणे कसलीही फिकीर न करता रामचंद्रदेवांनी नाव त्या भोवऱ्याकडे वळवली. एकाद्या मुग्ध हंसीप्रमाणे तीही निघाली.

## 2

ज्यावेळी माणिकपाटणा खाडीच्या तोंडाशी रामचंद्रदेव चिलिकेच्या कराल लाटांशी व भोवऱ्यांशी टक्कर देत होते व अरखकुदा घाटावर नाव घेऊन जाण्याची शर्थ करत होते त्यावेळी पुरीतल्या चुडंगसाहीमध्ये सुना कलावंतिणीच्या माडीवर मखमली तक्क्याला टेकून अमीनचंद दारूने धुंद झाल्या आवाजात भागीरथीकुमाराला म्हणत होते,

" यावे, यावे कुमार. पण फार म्हणजे फारच वेळ करून आलात. त्यामुळे झालं काय की धर्मभ्रष्ट खोर्धा राजाने जगन्नाथाच्या रथाचा छेरापहेरा वगैरे धर्मविधी केले. पण तुम्हाला सांगतो, प्रत्येक हिंदुधर्माभिमानी व्यक्तीला याचा अतिशय राग आलाय. अहो, धर्माची मर्यादाच उल्लंघन झाली ना ! "

सुना अमीनचंदाच्या जवळ बसून पान नखलीत होती. काजळभरली तिची दृष्टी तशी पानदानावरच होती पण खटयाळ डोळे मधूनच कुमाराच्या नजरेशी लपंडाव खेळत होते. भागीरथीकुमाराला ते जाणवत होतं. आपल्या रूपज्वालेत कुमारासारखे पतंग फडफडून भस्मसात् होतात हे सुना ओळखून होती. कुमार तरी मदनाच्या या आमंत्रणाला नकार कशाला देतील ?

खरं तर कुमारला पुरीला पोचेतो बराच उशीर होऊन गेला होता. अमीनचंदाला काहीही सांगता येईल पण ललिता महादेईला काय सांगायचे ? मातेचा विचार मनात आला की कुमारचे मुख म्लान होत असे. मालुदच्या फौजदाराने जर कंदा नदीपाशी अडवले नसते तर कदाचित् धर्मकार्य करण्यासाठी यथासमय पोचता आलं असतं पुरीला. पण वाळूच्या त्या निर्जन पट्ट्यावरच्या सरदेईच्या सराईतून निघायलाही दोन दिवस लागलेच. त्याबद्दल काय जाब देणार ? त्या दिवशी पहाटेपासून पावसाची झड लागली होती......तोंड बाहेर काढणे ढगांनी अशक्य केले, तुफान होते वगैरे कारणे सांगता आली असती. पण ज्याला यासारख्या क्षुल्लक गोष्टींवर मात करणे अशक्य झाले त्याने राजसिंहासनाचीही अपेक्षा ठेवू नये.

भागीरथीकुमार वेळेवर पुरीला पोचले नाहीत हा ललिता महादेईच्या हिशेबी अक्षम्य अपराध ठरला असता.

आळोखेपिळोखे देत, जललहरीप्रमाणे उठून सुना कलावंतीण खोलीबाहेर गेली. तिं भासवलं असं की लज्जेने ती निघून गेली. पण गुरुनितंबिनी सुनाने मदमस्त हस्तिनी-प्रमाणे अनेक हृदयांच्या कमल वनांची धूळधाण केली आहे हे देखील तिला आपल्या अंगविभ्रमांनी सुचवायचे असेल. आपल्या रूपलावण्याचा यथाविधी परिचय कुमारला करून द्यायचीदेखील इच्छा असेल तिची. नाहीतर एरव्ही नीटनेटक्या असणाऱ्या तिच्या अंबाड्यातून केवड्याचं पान कशाला गळलं असतं ? उंबरठा ओलांडताच तिने मान मुरडून बघून घेतलं की सावज घायाळ झालंय. तिच्या झिरझिरीत वस्त्रातून फुटून पडणारं यौवन पाहून कुमार स्मराहत झालेच होते.

सुना माहारी पुरीची प्रख्यात कलावंतीण होती. तिच्या आणखी दोघी बहिणीही जगन्नाथाच्या देवदासी होत्या व मंदिरात वेळोवेळी अन्य देवदासींसह गीतगोविंद गात असत. सुनाची आई केतकी हिने तर आपल्या तरुणपणात कटक सुभ्याचा नायब नाजिम सुजाखाँसारखा मासा जाळ्यात पकडला होता. त्याची मर्जी संपादन करायला आलेले शेटसावकार, जमीनदार, जहागीरदार केतकी कलावंतिणीच्या दाराशी नजराणे घेऊन तिष्ठत असत.

असं म्हणतात महाराज दिव्यसिंहदेवांची देखील ही केतकी कलावंतीण सहचरी होती.

त्यांच्या साधनेत ही असायची. हिच्यासह त्यांनी बालिसाही प्रासादातल्या साधना मंदिरात दिवसच्या दिवस रात्रीच्या रात्री घालवलेल्या होत्या.

त्यांच्या कारकीर्दीत सहाव्या वर्षी सुजाखाँने श्रीमंदिर तोडून टाकण्याच्या उद्देशाने स्वारी केली. त्याला तोंड देण्यासाठी दिव्यसिंहांनी चंदनपुरापाशी छावणी टाकली. तिथवर केतकी त्यांच्या संगती आली होती. भार्गवी नदीच्या किनारी अचानक सुजाखाँने छावणीवर हल्ला केला तेव्हा महाराज तिथे नव्हतेच. त्या एकट्या छावणीत केतकी जशी काही सुजाखाँची प्रतीक्षा करत होती. सुजाखाँला पाहताच तिने कुर्निसात् केला आणि सलज्ज नेत्रांनी खाली पहात ती उभी राहिली. पायाचा डावा अंगठा फक्त भुईवर वर्तुळ रेखत होता. तेवढी हालचाल सोडली तर ती अगदी स्थिर होती.

सुजाखाँने उजव्या हाताने केतकीची तीळ गोंदलेली हनुवटी वर उचलली व विचारले, "तूच खोर्धा राजाची सेनापती आहेस ?"

तिच्या गुलाबी मुखावर येवढंसंही भय नव्हतं. उत्तरादाखल तिनं एक स्मित केलं आणि आपली हनुवटी सोडवून घेतली. पुन्हा होती तशी अचल उभी राहिली.

त्यानंतर म्यानासकट आपली तरवार सुजाखाँने केतकीच्या पायावर ठेवून हसून तिच्या उत्फुल्ल फुलासारख्या असलेल्या मोहक चेहेऱ्याकडे बघितलं. म्हणाला,

"ठीक आहे. बिन लढताच आम्ही शरणागती देतो."

तेवढ्या अवधीत दिव्यसिंहांनी श्रीमंदिरातून मूर्तीचे स्थानांतर केले. पण त्यानंतर सुजाखाँने पुन्हा पुरीवर आक्रमण केले नाही.

त्या केतकीची कन्या सुना. तिच्या रूपाची ख्यातीही पुरीहून मुर्शिदाबाद व कटक-पर्यंत होती.

सुना निघून गेली होती. पण तिच्या पैंजणांची छुमछुम भागीरथीकुमारच्या कानात अजून रेंगाळत होती. खोलीबाहेर तिच्या कांकणांचा व पैंजणांचा मधुर आवाज संगीता-सारखा मधून मधून ऐकू येत होता. तोच ऐकायचा प्रयत्न भागीरथीकुमार कान टवकारून करीत होते. अमीनचंदांनी डोळे अर्धवट मिटून घेतले होते. ते बहुधा काही-तरी विचार करीत होते. भागीरथीकुमारने सुनाच्या डोक्यातून गळलेले केवड्याचे पान उचलले होते व त्याचे बारीक बारीक तुकडे करून खाली मखमली गादीवर टाकणे चालू होते. त्यांच्या मनात सरदेईचे सजल नेत्र व सुना कलावंतिणीचे डोळे यांची तुलना चालली होती. सावल्यांनी झाकलेल्या चिलिकेचे अथांग पाणी असावे तशी प्रशांतगंभीर होती सरदेईची दृष्टी. तिच्यात बुडून जावंसं वाटायचं. पण सुनाचे डोळे ! हसरे नाचरे डुबकी मारायचं आह्वान करणारे चंचल डोळे !!

अमीनचंदांनी डोळे उघडले. अचानक त्यांना कुमारच्या उपस्थितीचे स्मरण झाले. कंपित स्वरात ते पुन्हा म्हणाले, " आपण विलंब केलात कुमार."

उगीचच हसत कुमारनी म्हटलं, " आपण जाणताच आपल्या मालुदच्या सेनापतीचे कर्तृत्व ! जेमतेम कंदा नदी पार केली आम्ही तोवर त्याने गिरफदार केलं आम्हाला. नाहीतर आम्ही वेळेवर पोचत होतो."

पुन्हा एकदा बाहेर सुनाची कंकणे वाजली. कुमारची दृष्टी मंत्रमुग्धासारखी तिकडे वळली. अमीनचंदांनीही डोळे मिटून त्याचा आस्वाद घेतला. नंतर जवळचा हुक्का उचलून ओढत ते म्हणाले, " तो मूर्ख आहे. नायबनाजिम त्याच्यावर खप्पा आहेत. पण आपण तरी नेहमीच्या रस्त्याने येण्याचे टाकून तिथून कुठून येत होतात ?"

पुन्हा एकदा भागीरथीकुमार हसून म्हणाले, " वा, खोर्ध्याच्या प्रत्येक घाटीवर हाशिमखाँची फौज आमची वाट पाहात होती ना ! त्यांनी कैद केलं असतं !"

मुद्याला हात कसा घालावा याचाच विचार अमीनचंद करत होते. खाकरून गळा साफ करीत ते म्हणाले, " अशी भीती आपण व्यर्थ बाळगलीत. खोर्ध्यामध्ये आज एक आपणच फक्त आहात की ज्यांच्यावर नायब नाजिम तकीखाँची मेहेरनजर आहे. हाशिमखाँने बाणपुरावर हल्ला केला होता हे खरं आहे; पण बंडखोरांना जरब बसावी एवढाच हेतू त्यामागे होता. बाकी काही नाही. तो कशाला आपल्याला कैद करील ?"

पण त्याक्षणी भागीरथीकुमारचे सारे लक्ष राजनीतीच्या तुच्छ कूट प्रश्नावरून उडून अंतःपुरात हिंडणाऱ्या सुनाकडे लागले होते. तिच्या अंबाड्यातल्या केवड्याच्या पात्याचा उरलेला भाग आता ते चावत होते.

अमीनचंद गंभीर स्वरात बोलले,

"कुमार आपण हे नीट ध्यानात घ्या की आपण खोर्ध्याच्या राजगादीवर बसावे म्हणून नायबनाजिम तळमळत आहेत. त्यांच्याबद्दल कोणतीही शंका अथवा भीती मनात बाळगू नका."

खोर्धा सिंहासनाबद्दल कुमारच्या मनातही अभिलाषा होती व ललिता महादेईच्या प्रोत्साहनाने ती बळकटही झाली होती. महाराज रामचंद्रदेवांबद्दल एक उगीच तिरस्काराची भावनाही त्यांच्या मनात होती; पण तरीही ते जिवंत असताना आपण सिंहासन बळकावायचं ही नुसती कल्पनाही त्यांना अशुभ वाटत होती. अर्थात् ललिता महादेईला हे त्याने कधी बोलून दाखवले नव्हते. पण अमीनचंदांपुढे गप्प बसायचे त्याला काहीच कारण नव्हते. ते म्हणाले,

" पण......पण महाराज असताना मी कसा काय सिंहासनावर बसणार ?"

आपल्या बोलण्याचा योग्य तो परिणाम होत नाही हे बघून अमीनचंद नाराज झाले. घुश्शात ते म्हणाले,

"आपण कुणाला 'महाराज' म्हणताहात कुमार? आपल्या तीर्थरूपांनी एका यवनीशी निक्का लावला न् हिंदू धर्माचा त्याग केला. मुक्तिमंडपाने जो निर्णय दिला तो खरं पाहता अन्याय्य होता; आणि जरी त्यामुळे त्यांनी छेरापहरा केला असला तरी मंदिरप्रवेश त्यांना वर्ज्य आहे. तेव्हा मंदिरात ते कोणताही विधी करू शकणार नाहीत."

अजूनही भागीरथीकुमारला काही त्यांचा सल्ला पटत नव्हता. त्यामुळे ते काही न बोलता पूर्ववत् केवडा चावत सुना कलावंतिणीच्या बांगड्या व पैंजण वाजण्याची प्रतीक्षा करत बसले.

पुरीला पोचल्यावर गुंडिचा घरापाशी अमीनचंदांशी भेट झाल्यावर भागीरथी-कुमारच्या मनात त्यांच्याविषयी एक अढी बसली होती. त्यामुळे त्यांच्याशी ते आखडू-नच वागत होते. अमीनचंदानी मारे त्यांचा सन्मान केला पण त्यांच्याशी संपर्क ठेवण्याचा बगैरे कुमारनी फारसा प्रयत्न केलाच नाही. पण एवढ्यात ललिता महादेईने बाणपुराहून एक खास दूत पाठवून त्यांना कळवले होते की, "राजा अमीनचंद आपले हित-चिंतक आहेत. त्यांच्या सल्ल्याप्रमाणे चालावे."

मातेची आज्ञा शिरोधार्य मानून भागीरथीकुमार आता सल्लामसलतीसाठी गुंडिचा घरात अमीनचंदाकडे आले होते. आपल्या पित्याविरुद्ध ही सर्व कारस्थाने चालली आहेत त्याची कल्पना त्यांना होती; पण म्हणून एका परक्या माणसाकडून पित्याची निंदा ऐकायला ते तयार नव्हते.

भागीरथीकुमार गप्प बसले. अमीनचंद पुढे म्हणाले, "धर्मच्युत, जगन्नाथाच्या सेवे-तून दूर केलेला यवन हाफिज कादर खोर्धा सिंहासनाचा कोणत्याही प्रकाराने अधिकारी रहात नाही. मात्र आपण युवराज आहात; तेव्हा आपला अधिकार जरूर आहे. शिवाय तकीखाँनाही ते ठीक वाटतंय."

आपली कठोर दृष्टी पितळेच्या दिव्यातील निश्चळ ज्योतीवर खिळवून कुमार म्हणाले, "महाराज रामचंद्रदेव काही आपणाहून यवन झाले नाहीत. त्यांच्यावर बळ-जोरी केली होती."

बराच वेळ अमीनचंदांनी हुक्क्याची नळी दातात दाबून धरली. मग पुन्हा धूर सोडत ते म्हणाले, "ठीक आहे. मी महाराणींना खबर पाठवतो की कुमारना सिंहासनाचा लोभ नाही. मग नायबनाजिम दुसरा कुणी वारस निवडतील. त्यांचीही संख्या कमी नाही. पण हाफिज कादरचा खोर्धा सिंहासनावर कसलाही अधिकार उरला नाही हे निश्चित."

पण असं सिंहासन सहजासहजी सोडायला भागीरथीकुमारही तयार नव्हते. शिवाय महाराणीची रागाने धगधगणारी दृष्टी त्यांच्या मनासमोर होतीच. उद्विग्न स्वरात ते म्हणाले, " मला खोर्धा सिंहासन नकोय असं मी कधी म्हणालो ? महाराज स्वेच्छेने धर्मच्युत होवोत की बळजबरीने, परंपरा असं सांगते की जो जगन्नाथाची सेवा करतो तोच खोर्ध्याचा राजा म्हणवून घेऊ शकतो. महाराज जर ती करू शकत नसले तर मग सिंहासनावरही त्यांचा अधिकार रहात नाही अन् मग मात्र मीच एक वारस आहे. नायबनाजिम आम्हाला कसे डावलू शकतील ?"

हळूहळू तो ताळ्यावर येतोय हे बघून अमीनचंदांना समाधान वाटले. आता पुढच्या अडीअडचणी त्याला कशा सांगाव्या याचे बेत ते मनातल्या मनात करू लागले. कारण श्रीमंदिराच्या कारभारात कुमाराचा यत्किंचितदेखील अधिकार रहाणार नाही तर ती बाब सर्वस्वी अमीनचंदांकडे राहील – खोर्धा सिंहासनावर कब्जा मिळवायसाठी ही किंमत कुमारला मोजलीच पाहिजे. असे विचार करत ते पुन्हा एकदा हुक्क्यात बुडून गेले.

अचानक त्यांना तहान लागली. थोडीशी रसिकता दाखवत ते मोठमोठ्याने सुनाला बोलवू लागले, " सुना, अग ए सुना ! छे, लाज कसली वाटत्येय तुला ? आं ? आण काही पेय वगैरे. कुमारनाही तहान लागलीच असेल बहुधा. " कुमारकडे वळून ते म्हणाले, " काय, खरं आहे की नाही ?"

खोलीच्या बाहेर कांकणांचा व पैंजणांचा मंजुळ नाद झंकारला. भागीरथीकुमार चंचल दृष्टीने तिकडे पाहू लागले. अर्थात् अमीनचंदांच्या नजरेतून ते सुटणं शक्यच नव्हतं.

थोड्या वेळाने सुना नागिणीसारखी सळसळत चांदीचे दोन पेले भरून मदिरा घेऊन आली. तिच्या हालचालीत कोमल शय्येचे निद्रातुर आमंत्रण होते. तिने प्याले खाली ठेवले न् नितंबांची मादक हालचाल करत ती जाऊ लागली तोच तिचा हात धरून अमीनचंदांनी तिला थांबवली. म्हणाले, " बैस ना इथं जराशी. खोर्ध्याचे महाराज खुद्द इथे बसले आहेत त्यांची देखभाल नाही करणार ?"

ती गादीवर बसली पण जणू काही ती गादी तिला बोचते आहे अशा रीतीने. तिने ' हाय ' केले; आणि स्वत:वर कुमारची दृष्टी खिळून राहिलेली पाहून तिने त्यांना मोंगली पद्धतीने उजव्या हाताने ओठांना स्पर्श करीत कुर्निसात केला.

हळूहळू कुमार मंत्रमुग्ध होत चालले होते. त्यांच्या अंगोपांगावर एक नशा चढत चालली होती. पण अचानक रसभंग करीत तिथे मोठे उपाध्याय गौरी राजगुरू आले. अतिशय चिंतातुर व दमलेले दिसत होते ते. त्यांच्याबरोबर अंधारीगडाचे केल

सामंतराय, बाणपुराहून आलेले बंशी श्रीचंदन व जगन्नाथ परिछा हेदेखील आले. रामचंद्रदेवाविरुद्ध अमीनचंदांनी जे भयंकर कपटकारस्थान आरंभलं होतं त्यातले हे साथीदार होते. ते आल्याबरोबर सुना आत निघून गेली.

अशा वेळी हे सगळे दिसतील अशी कल्पनादेखील अमीनचंदांनी केली नव्हती. त्यामुळे उद्विग्न होऊन त्यांनी विचारलं,

"काय झालं ? अशा भलत्या वेळी तुम्ही लोक इथं कसे आलात ?"

त्यांचा तो प्रश्न विचारून होतो न होतो तोच कटक लालबागेहून तकीखाँने पाठवलेला अमीनचंदांच्या परिचयातला एक सैनिक आत आला. बिचारा कटकेहून घोडा दौडत टाकोटाक आला होता म्हणून तो धापा टाकत होता. लडामठात अमीनचंद भेटले नाहीत म्हणून गौरी राजगुरूंना बरोबर घेऊन अमीनचंदांना शोधत शोधत तो सुना कलावंतिणीच्या माडीवर आला होता. त्याच्या कपाळावरून पावसाच्या पागोळ्यासारखा घाम सांडत होता. अंगरखाही जागजागी चिकटला होता. काहीतरी महत्त्वाची खबर घेऊन तो आलाय हे अमीनचंदांनी ओळखलं. विचारलं,

"काय आहे ? तू कसा आलास ?"

त्याने सांगितलं, "लोधुमियाँनी खबर धाडली आहे की खोर्ध्याचे महाराज फरारी झालेत. हेरांचा प्रमुख, दरोगा कुणालाच त्यांचा ठावठिकाणा माहीत नाही. हीच खबर घेऊन मी आलो आहे. वजीर मुस्तफा अलीखाँनी पाठवलं आहे मला."

महाराज रामचंद्रदेव जे अचानक अंतर्धान पावले त्यामुळे गौरी राजगुरू वगैरे सगळी मंडळी चकित झाली होती.

खबर ऐकून अमीनचंदही चकित झाले होते. म्हणजे काय रामचंद्रदेवांना त्यांच्या कारस्थानाची पूर्वसूचना मिळाली होती ? रथयात्रेनंतर त्यांना गिरफदार करण्यात येणार आहे अशी भीती यात्रेत लोक व्यक्त करतच होते. पण म्हणजे ते सिंहासनावरही न रहाता आजन्म कारावासात राहणार आहेत त्या अतिशय गुप्त योजनांचा पत्ता कसा कुणाला लागला ? गौरी राजगुरू वगैरेंना हे ठाऊक होते की कोणत्याही उपायानं रामचंद्रदेवांची तळी उठवण्यासाठी अमीनचंद प्रयत्नशील आहे. पण त्यातल्या गूढ कारस्थानाचा अत्यंत गुप्त भाग तकीखाँच्या दरबारातही अनेकांना माहीत नव्हता. म्हणून तर त्यांचे खोर्ध्याहून अशा रीतीने अंतर्धान पावणे बुचकळ्यात पाडणारे होते.

गौरी राजगुरूंनी आणखी माहिती पुरवली – "भीतरछो महापात्र, धनी पढिआरी, छोटे उपाध्याय विष्णु पश्चिम कपाट महापात्र इत्यादी अन्य बरेच देवसेवकही नापत्ता आहेत. कालच्या अष्टमीच्या रात्री बडसिंहारनंतर दइतापती कुठं आहेत ते शोधू

गेल्यावर हा प्रकार समजला. काल त्या दोघांची पाळी होती – असतील कुठे तरी भांग पिऊन पडलेले असा विचार करून त्यांना शोधत होते. पण मग कळलं की भीतरछो महापात्र न् धनी पढिआरी हे देखील नाही आहेत. त्यांच्या घरच्या मंडळींकडे विचार-पूस केली तर ते म्हणतात सप्तमीच्या रात्री सडकेवर 'गोटिपुअ' नाच बघायला म्हणून ते जे गेले ते परतलेच नाहीत. खरं म्हणजे छोटचा उपाध्यायांनी हे सगळं पहायला हवं. हे नोकरलोक दिवसेंदिवस बेशिस्त होत चाललेत. कामंही नीट करत नाहीत. पण छोटचा उपाध्यायांना भेटायला गेल्यावर समजलं की तेही जागेवर नाहीत. त्यांच्या घरातल्यांनाही ते कुठं गेलेत वगैरे काहीच ठाऊक नाही."

अमीनचंदांनी मनात खूणगाठ बांधली की रामचंद्रदेव बहुधा नागपूरला मराठ्यांशी संधान बांधायला गेले असावेत. आता मराठ्यांची नजर बंगालकडे वळली आहे. उत्कलमध्ये त्यांचं तसं बस्तान नाही हे खरं; पण त्यांच्याच सहाय्याने तकीखाँची उत्कलमधून उचलबांगडी करायची रामचंद्रदेवाने ठरवलेले दिसत होते. त्याचसाठी भास्कर पंडितकडे त्यांनी वकील पाठवला होता अशी खबर हेरप्रमुखाकडून मिळाली होती. पण ती सिद्ध नव्हती झाली.

वजीर मुस्तफा अलीने अमीनचंदांच्या नावाने मोहोरबंद लखोटा धाडला होता. सेवकाने तो खिशातून काढून त्यांच्यासमोर धरला.

वजीर मुस्तफा अलीची चिठ्ठी फारशीत होती. त्यात वजीराने म्हटलं होतं की भागीरथीकुमार जर पुरीला पोचला असेल तर त्याला ताबडतोब खोर्ध्याला पाठवून सिंहासनावर बसवून टाका. आता तो राजा व्हायचा म्हणजे काय तर त्याने जगन्नाथा-समोर विधिवत शुभ वस्त्र परिधान करायचे व जगन्नाथाकडून आज्ञामाळ घ्यायची. तेवढं झालं की खोर्धा सिंहासनाचा अधिकारी झालाच.

चिठ्ठी काळजीपूर्वक खिशात कोंबून अमीनचंदांनी कुमारकडे पाहिलं. हा दुर्बल, अप्रौढ, अस्थिर मनोवृत्तीचा युवक खोर्धा सिंहासनावर बसणार हे ध्यानात घेऊन त्यांना हेवा वाटला.

थोडा वेळ गप्प बसून डोळे मिटून अमीनचंद विचार करत बसले. जोवर अमीन-चंदांचे पुरीवरील व जगन्नाथावरील स्वामित्व कुमार मान्य करणार नाही तोवर त्याला राज्यावर बसवून त्यांचा एकही मतलब साधणार नव्हता; राजनैतिक व वैयक्तिक कुठलेच कारस्थान अंशत: देखील यशस्वी होणार नव्हते. कुमार राज्यावर आल्यावर नंतर कदाचित त्यांच्याविरुद्ध गेला असता. तो भावनेच्या भरातच बऱ्याच गोष्टी करत असतो. विचारपूर्वक कोणतेही पाऊल उचलणे त्याला माहीतच नाही. तेव्हा प्रथम या बाबतीत ललिता महादेईचे बाणपुराहून आलेले प्रतिनिधी व गौरी

राजगुरु यांच्याशी बोलणी केली पाहिजेत. बाहेर उभ्या असलेल्या सुनाकडे अमीनचंदांनी एक नजर टाकली. मग कुमारला म्हणाले, "आपण इथंच थांबावं. आम्ही थोडचा वेळात येतोच. कदाचित् अधिकउणा वेळ झाला तर चिंता करू नये. एकंदर परिस्थितीचं गांभीर्य आपण जाणताच."

महालाबाहेर पुन्हा एकदा सुनाच्या बांगडचा व पैंजण वाजले. अमीनचंद वगैरे सगळे निघून गेले. आवेगभरल्या स्वरात कुमारने हाक मारली,

"सुना."

पण महालाबाहेरच्या अस्पष्ट उजेडातून तिच्या कंकणांचाच नाद येत राहिला. जणू तेच तिचे उत्तर होते. अनेक विनंत्याविनवण्यांनंतर झोप आल्याचे नाटक करीत, आळोखेपिळोखे देत, वक्ष:स्थळांना हेलकावत ती आली. अमीनचंद वगैरे सगळे निघून गेलेत व खूप वेळाने ते येणार आहेत हे तिला छान माहीत होते. तरीही असहाय्य अबलेचं नाटक करीत ती म्हणाली, "हे काय ? मला इथं अशी एकटीला टाकून राजा अमीनचंद गेले तरी कुठं ? सगळचा प्रासादात माझ्याशिवाय दुसरं कुणीच नाही."

अशा आडवळणाने आलेल्या आमंत्रणाची कुमारना छान ओळख होती. हसून ते म्हणाले, "मला पहाऱ्याला ठेवलेलं आहे ना ! काळजी का करतेस ?"

तिनं मुख वळवलं. भिंतीवर कांची यात्रेच्या वेळचं जगन्नाथ बलभद्र व माणिक गौळणीचं चित्र होतं. त्याकडे बघत ती म्हणाली,

"तुम्ही आहात मला अनोळखी. चोरबिरही असायचे. काय नेम सांगावा ?"

तिच्या 'सुना' म्हणजे 'सुवर्ण' या नावावर कोटी करत कुमार हसत हसत म्हणाले,

"चोरानं जर सोनं चोरलं नाही तर बाकीच्यांना त्याची किंमत कशी कळायची ?"

तिनं त्यांच्याकडे एक मादक कटाक्ष टाकला व अंबाडचातलं फूल फेकून त्यांना मारत ती म्हणाली, "चला... .."

स्त्रीचं कल्याणमयी रूप कधी कधी अश्रुपूर्ण असतं, विषादाने भरलेलं असतं. पण जिथे ती ज्वाळेसारखी धगधगत असते तिथे ती अशी हास्यमयी व रसमयी कामनेची मूर्ती बनते. तेव्हा ती लावण्याची उज्ज्वल ज्योत न रहाता सौंदर्याची झळकती शिखा बनते. जेव्हा ती कारस्थानी असते तेव्हा तिची चतुराई तिच्या चंचल नजरेत आणि मनोहर हास्यात प्रगट होते; आणि त्याने पुरुष आंधळा मूर्ख बनतो. भ्रमात पडतो.

सुनाने कुमारना आंधळा केलंच होतं. त्यावेळी तिच्यासाठी काहीही करायला कुमार तयार होते.

दिव्याच्या कोमल उजेडात चंपकवर्णी सुनाची यौवन प्रमत्त अंगलता लवलवत्या अग्निज्वालेसारखी दिसत होती. एका अशोक फुलाच्या पाकळ्या पिसकारीत अन्यमनस्कतेचा देखावा करीत आपुलकीच्या स्वरात ती म्हणाली,

" राजा अमीनचंदांचं तुम्ही ऐकत नाही. मी कशाला तुमचं ऐकू ?"

राजा अमीनचंद न ऐकण्याजोगं काय सांगत होते कुमारला ? उलट त्यांचं प्रत्येक म्हणणं ऐकायला व त्यानुसार वागायला कुमार तयार होते. सुनाचा हा गैरसमज दूर करण्याच्या हेतूने कुमार तिला म्हणाले, " वेडी का काय तू ! ते माझे हितचिंतक आहेत. त्यांचं मी ऐकणार नाही असं कसं होईल ?"

लाजत लाजत, स्मित करीत सुनाने विचारलं, " मग खोर्ध्याचे राजे व्हायला तयार का होत नाही तुम्ही ?"

" कोण म्हणतं असं ? त्यासाठीच तर महाराणीनं मला पाठवलंय. पण सुना, तू म्हणतेस ती गोष्ट इतकी सोपी नाही. त्यात अनेक भानगडी आहेत. शिवाय त्यानंतर अशा सुखमयी घटका आयुष्यात येणंही कठीणच."

अंबाड्यावर माळलेला जुईचा गजरा काढून डाव्या तर्जनीवर तो गरगर फिरवीत नखऱ्याने ती म्हणाली, " काट्याशिवाय फूल कधी कुणी पाहिलंय ?"

गजऱ्याने दिवा विझला न् महाल अंधारात बुडाला.

पुष्कळ वेळाने अमीनचंद एकटेच परतले. त्यांनी नीट लक्ष देऊन पाहिलं असतं तर त्यांच्या लक्षात आलं असतं की महालात तेवणारा दिवा निराळाच होता. कुमार आपल्या गालावरचे व्रणचिह्न लपवण्याची खटपट करत होते. पण इकडे लक्ष देण्याइतकी फुरसत अमीनचंदांना नव्हती. पुष्कळ वाटाघाटीनंतर त्यांच्या अटी बाणपुराहून आलेल्या ललिता महादेईच्या प्रतिनिधींनी स्वीकारल्या होत्या. गौरी राजगुरूंनीही संमती दिली होती. राजा अमीनचंदांच्या म्हणण्यानुसार मंदिराचा कारभार चालेल. जगन्नाथाची सेवा जी खोर्धा राजाने करायची ती अमीनचंद करतील. कुमार व राजपरिवार मंदिरात पारंपारिक पद्धतीनुसार जातील येतील; पण संक्रांति व इतर सणासुदीच्या दिवशी जेव्हा मंदिरावरचा महाप्रदीप उचलून महाऽरती होते तेव्हा खोर्धा राजाचे नाव नाही घेतले जाणार. फक्त अमीनचंदांचा नामोच्चार होईल.

अत्यंत श्रांत स्वरात, गादीवर पडता पडता अमीनचंदांनी सांगितले, " आपण तयारीत असावं कुमार. नीलाद्रीविजयाच्या दुसरे दिवशी आपल्याला सिंहासनाभिषेक होईल."

या बातमीने कुमार खूष झाले व त्यांना खुदकन् हसू आले.

## 3

आकाशात चंद्र ढगांचा पाठलाग करत होता का ढग चंद्राचा हे बघणाऱ्याला एक कोडेच वाटलं असतं. पण कुमारचे तिकडे लक्ष नव्हते. काळ्या ढगाआड जेव्हा चंद्र झाकला जायचा तेव्हा एक पातळ सावट बडदांड रस्त्यावर येत असे; व त्यातून बाहेर येऊन जेव्हा त्याचे चांदणे पसरे तेव्हा सडकेच्या दोन्ही बाजूंच्या नारळी हिऱ्यांच्या कणांनी मढून निघत. पक्षी जागे होत, बडदांड सडकेच्या दोन्ही बाजूला चादरी, कांबळी पांघरूण निजलेले लोक मुडद्यांसारखे दिसत होते.

उद्या बाहुडा दशमी. त्या निमित्ताने अर्धेअधिक यात्रेकरू अजूनही पुरीतच होते. उद्याच्या बाहुडा यात्रेनंतर त्यातले काही परत जातील. मग उरलेले महाप्रभूच्या नीलाद्रिविजय व द्वादशीच्या उत्सवानंतरच जातील.

परवा अधरपणा एकादशी, त्याच्या दुसऱ्या दिवशी नीलाद्रिविजय व द्वादशी. त्यानंतर खोर्ध्याच्या राजसिंहासनावर कुमारचा राज्याभिषेक व्हायचा. महाराज वीर केशरीदेव या नावाने त्यांची कारकीर्द सुरू होणार द्वादशीनंतर.

बडदांड निर्जन होता. चंद्र मलूल झाला होता व वारा पिसाट. सुनाच्या मोहिनीतून बालिसाही प्रासादाच्या जीर्ण शीर्ण वास्तूत जायला कुमार नाखूष होते.

बडदांड रस्त्यावर यात्रेकरू झोपले होते. जे यात्रेकरू झोपले नव्हते ते खंजिरी वाजवून भजन म्हणत होते. पण त्यांचे सूरही झोपाळूच होते. बाकी अर्थात् झोपलेच होते.

गुंडिचा मंदिराजवळ कोलाहल चालू होता. बाहुडा यात्रेची तयारी चालू होती. नवमीच्या रात्री देवतांचा शृंगारविधी – बडसिंहार – झाला की त्यानंतर बाहुड्याचा रथ ओढला जाईतो सेवकांना फुरसत म्हणून कशी ती नसते.

रथांचं काम करणाऱ्या सुतारांनी रथावर शिडी लावायला सुरुवात केली होती. उजेडासाठी तिथे काही मशाली पेटवल्या होत्या. त्यात बडदांड थोडासा प्रकाशित झाला होता. मशालींच्या प्रकाशात तिन्ही रथ चित्रांसारखे वाटत होते.

रथदांड रस्त्यावर एक छोटी मिरवणूक शंखघंटा, शिंग वाजवत राघवदास मठाच्या दिशेनं चालली होती. तिथं पांढरं वस्त्र अर्पण करायचा विधी व्हायचा होता. काही दइता त्या मिरवणुकीत अग्रभागी चालत होते.

रथांवरच्या शिड्या बांधेतो पहाट होणार. त्यानंतर आरती मग सूर्यपूजा, द्वारपाल-पूजा, प्रातःकालचा खिचडी भोग. अशी अनेक कर्मकांडे पार पाडत महाप्रभूचे सेवक नवमीची रात्र जागून काढत होते.

अकस्मात् कुमारना आठवण झाली की रामचंद्रदेव नाहीसे झाले आहेत. म्हणून बाहुडा यात्रेसमयी राजा अमीनचंद छेरापहेरा करून रथावर चंदनाचा सडा शिंपणार, त्याच अटीवर तर त्यांनी कुमारच्या राज्यारोहणाला तकीखाँचा प्रतिनिधी या नात्याने संमती दिली.

बाणपुराहून आलेले जगन्नाथ उपाध्याय प्रथम याला कबूल होत नव्हते. पण करीनात अमीनचंद छेरापहेरा ? त्याने काय मोठेसे राजकार्य अडणार आहे ? उगीचच काय आपले ताणून धरायचे !

सुनाच्या माडीवर पुन्हा तीच चर्चा झाली होती. खूप वेळाने वंशी श्रीचंदन, गौरी राजगुरू व जगन्नाथ उपाध्यायांबरोबर येऊन अमीनचंदांनी आपल्या अटी सांगितल्या. एक म्हणजे श्रीक्षेत्र पुरीवर भागीरथीकुमारचा काहीही अधिकार रहाणार नाही. जगन्नाथाचा सेवक या नात्याने खोर्धा राजाची काही कर्तव्ये असतात. त्यापासून तो मुक्त राहील. ते सर्व अमीनचंद करतील. याचे तात्पर्य कुमारना कळलेच नव्हते.

ललिता महादेईने हट्ट धरला म्हणून केवळ कुमार छेरापहेरा करायला सिद्ध झाले होते. त्यांच्या मते हे कार्य कोणीही केलं असतं तरी चाललं असतं पण ते तिथं उशीराच पोचले न् आपोआप त्यातून त्यांची सुटका झाली. आता एकदा जगन्नाथासमोर वस्त्रग्रहण करून ते महाराणीला संतुष्ट करू इच्छित होते व ताबडतोब बाणपुराला परतायला आतुर होते. तिथे सुनाशी घडून आलेलं आकस्मिक मीलन, तंडाकिनारीच्या सरदेईशी झालेली भेट व खोर्धा सिंहासनाच्या प्राप्तीची निश्चितता या सगळ्याच गोष्टींनी ते भारून गेले होते. जगन्नाथाची सेवा कोण करणार असला वृथा वाद वाढवून सिंहासन हातचे घालवायला ते तयार नव्हते.

पण जगन्नाथ उपाध्यायांचं मत या अटींच्या विरुद्ध होतं. ते म्हणाले,

" हे काय बोलणं झालं ? महाराज अनंगभीमदेवाच्या वेळेपासून हा विधी चालत आलेला आहे. खोर्ध्याच्या राजसिंहासनावर कधी कुणाला अभिषेक झाला आहे ? श्रीजगन्नाथच उत्कलचे एकमेव सम्राट आहेत. खोर्ध्याचे गजपती राजा त्यांचे सेवक या नात्याने राज्यकारभार पाहतात. आता सूर्यवंशी सम्राट कपिलेंद्रदेवानेही गंगेपासून गोदावरीपर्यंत उत्कल साम्राज्याचा विस्तार केल्यानंतर स्वतःला बिरुदावली घेतली " वीर श्री गजपती गौडेश्वर नवकोटि कर्णाटोत्कल वर्गेश्वर वीराधिवीरवर "; पण श्रीमंदिराच्या जयविजय द्वाराजवळ शिलालेखात लिहून ठेवलं की, ' तुझी ज्याच्यावर कृपा तोच या सिंहासनाचा अधिकारी.' ही इथली गजपति सिंहासनाची परंपरा आहे. राजा जर जगन्नाथाचा सेवक राहणार नसेल तर त्याला खोर्ध्याचा राजा मानेल कोण ? भागीरथीकुमार हे अधिकार कसे सोडू शकतील ?"

हे ऐकत असताना गौरी राजगुरू आतल्या आत धुमसत होते. बहिरी ससाण्यासारखे ते दिसत होते.

इथे या सर्व परंपरा यथायोग्य पद्धतीने माहीत असलेली व्यक्ती मणजे गौरी राजगुरू. पण राजसेवेचा अधिकार अमीनचंदांना सुपूर्द करण्याच्या बदल्यात त्यांना एवढी मोठी लालूच गेली दाखवली होती की या सर्व परंपरा ते जणू विसरूनच गेले होते. ते म्हणाले, " जगन्नाथाच्या सेवेचा अधिकार गजपती राजांना मिळाला हे सत्य आहे. पण जेव्हा राजा हजर नसेल तेव्हा मुदिरथ ही कार्ये करीत असत हे सगळ्यांना ठाऊक आहे. पुन्हा आजच्या महाराजांच्याच कारकीर्दीत बक्सी वेणु भ्रमरवरने देखील हे राजसेवेचं काम केलं होतं. आता राजा अमीनचंद करतील. एवढ्याशा लहानशा बाबतीत वादाचा घोळ कशाला ? असं काय मोठंसं याने होणार आहे ? आभाळ का फाटणार आहे ? मुदिरथ जर राजसेवा करू शकतात तर अमीनचंदांना काय हरकत आहे ?"

जगन्नाथ उपाध्याय उत्तरले,

" आम्ही हरकत करून अगर न करून काय होणार आहे ? नीलाद्री महोदयोक्त इंद्रद्युम्नच्या ब्रह्मवाक्यांचे स्मरण आपणच करावे. त्यानुसारच या सर्व विधीचे प्राचीन काळापासून परिपालन होते. सदासर्वकाळ मुदिरथ राजसेवा करतील असा प्रतिष्ठित परवाना त्यांना नाही मिळालेला; त्यासाठी मुदिरथ सर्व शास्त्र जाणणारा असला पाहिजे. शिवाय राजप्रतिनिधी म्हणून त्यांना अनुमती मिळणे आवश्यक आहे. ते वाक्य असे आहे.

' एवं महोत्सवं कुर्यात् पूजयां च रमापते
विधीमेतादृशं कर्तुं नो शक्यचेद् यदानृप
तदा प्रतिनिधी कुर्यात् विप्रं किंचित्सुधार्मिकम्
तव प्रतिनिधी सोऽयं सर्व शास्त्रार्थ तत्वविद् ॥ '

हे नीलाद्री महोदयाचे ब्रह्मवाक्य आहे. यातल्या ' प्रतिनिधी ' शब्दाचा काटेकोर विचार करा न् मला सांगा."

अत्यंत तिरस्कारभरल्या स्वरात गौरी राजगुरू उत्तरले, " हं : ! म्हणे प्रतिनिधी ? समजा, खोर्ध्याच्या भावी राजाने प्रतिनिधी म्हणून अमीनचंदाची नेमणूक केली तर कोणतं शास्त्र विटाळणार आहे ?"

हे सगळं ऐकत अमीनचंद एका तक्क्याला टेकून गुडगुडी ओढत जणू अनासक्त भावाने बसले होते. अंबरी तंबाखूच्या गोड कडवट वासाने महाल भरून गेला होता. श्रम व उत्कंठा यांनी त्यांच्या पृथुल शरीरावर घामाचे ओघळ वाहत होते. ते म्हणाले,

"राजत्वाशी धर्मकर्माचा काय संबंध ? भागीरथीकुमार सिंहासनावर बसतील. धार्मिक कार्याचा यात काय संबंध ?"

जगन्नाथ उपाध्याय गंभीर स्वरात उत्तरले, "अं हं, असं म्हणू नका राजेसाहेब. गजपती सिंहासन जेवढे बाहेर आहे तेवढेच अंतर्गत आहे. बाहेर राजत्व आहे तर आत धर्म आहे. तसं नसतं तर पठाणांच्या आक्रमणामुळं उत्कल केव्हांच नामशेष झाला असता."

पठाणांच्या आक्रमणाचा उल्लेख व तोही अशा रीतीने अमीनचंदांना आवडला नाही. थोडयाशा रागीट स्वरात ते म्हणाले,

"या चर्चेत काही तथ्य नाही. प्रत्यक्षात गोष्ट अशी आहे की – खोर्धा सिंहासन रिक्त पडलं आहे. भागीरथीकुमारना कोणी जबरदस्ती करत नाही आहे. त्यांना पटलं तर चांगलंच झालं. नाहीतर खोर्धा खालसा केलं जाईल. मी हिंदू आहे म्हणून जगन्नाथाला तर्कीखांच्या तावडीतून वाचावायची खटपट करतो आहे. नाही झालं तरी मला दु:ख नाही. गीतेत म्हटलंच आहे, 'कर्मण्येवाऽधिकारस्ते' कुमारानी सर्व ऐकलंच आहे. निर्णय त्यांनी घ्यायचा आहे."

गुंडिचा मंदिरात कुठल्या तरी कार्यानिमित्ताने वाद्ये वाजत होती. घंटा आणि शिंग यांच्या आवाजाने रात्रीची शांतता भंग पावली होती. दूरवरच्या भविष्याचे आव्हान जणू त्यातून व्यक्त होत होते.

भागीरथीकुमार म्हणाले, "आपल्या अटी मला मंजूर आहेत."

चर्चा समाप्त झाली.

कुमार बालिसाही प्रासादाकडे निघाले. म्लान चांदण्यात श्रीमंदिर अनेक जयपराजयाचे, गौरव व लांछनाचे, उत्थान व पतनाचे रहस्य पोटाशी धरून उभे होते. जसे काही उत्कल जातीच्या दुर्दम्य विश्वासाच्या अंतिम विजय संकेताचे अचल रूप !

कुमारना आठवण झाली, जगन्नाथ उपाध्याय म्हणत होते की गजपती सिंहासन जेवढं बाहेर आहे तितकंच अंतर्गत आहे. आत धर्म आहे बाहेर राजत्व.

कपाळावर ओघळून आलेल्या बटा मागे सारत कुमार स्वत:शीच पुटपुटले,

"मंदिरातल्या राजसेवेत असं काय भलं आहे ?"

खोर्धा सिंहासनाच्या प्राप्तीच्या आशेनं त्यांना उत्तेजित केलं होतं. शिवाय सुना कलावंतिणीच्या मादक डोळ्यांची आतुर अपेक्षा त्यात मिसळली होती.

घोडयावर उगीचच चाबूक फडकावत निर्जन बडदांड रस्त्यावरून ते बालिसाही प्रासादाकडे घोडा दौडवत निघाले.

# अकरा

## १

बाहुडा यात्रा काल संपली.

उद्या अधरपणा एकादशी, मग द्वादशी, नीलाद्रिविजय. बहुडानंतर गर्दी ओसरली. अधरपणा एकादशी व नीलाद्रिविजय या दोन्ही दिवशी पंचकोशी यात्रेकरू व गौड प्रदेशाचे वैष्णव भक्त यांची विशेष गर्दी असते. पश्चिमेकडचे यात्रेकरू रथयात्रेनंतर पुरी सोडायला लागतात. या वर्षी बाहुडा संपता संपता कशी कुणास ठाऊक सगळीकडे अफवा फैलावली की जगन्नाथ श्रीक्षेत्र सोडून गेलेत.

खरं पाहता गुंडिचा घरातून बाहेर येऊन मंदिराच्या सिंहद्वारापाशी स्थावर श्रीमूर्ती कर उभारून बसलेली आहे. द्वादशीला नीलाद्री प्रवेश करतील पण प्रत्यक्ष बघूनही लोक अफवेवर विश्वास ठेवतातच आहेत. म्हणताहेत की तकीखाँचा नायब, तो पश्चिमेचा अमीनचंद छेरापहरा करायला रथावर चढणार म्हणून त्याआधीच जगन्नाथ पुरी सोडून निघून गेलेत. शून्यपुरुष महाशून्य झालेत. इथ समोर दिसते आहे ती कुडी, काया. प्राण नाहीच आहेत त्यात... इत्यादि.

ज्यांची अंतर्दृष्टी तीक्ष्ण होती ते दुसऱ्यांना दाखवू लागले. " बघा बरं, श्रीमुख कसं म्लान दिसतं आहे ते !"

या वर्षी बाहुडा यात्रेत सामील होताना यात्रेकरूंच्या मनात आनंद उत्साह नव्हता. एक अस्पष्टशी भीती सगळ्या पुरीला घेरून राहिली होती. पुन्हा खोर्ध्याचे महाराज रामचंद्रदेव अकस्मात् अंतर्धान झाले होते ही बातमीही लोकांत पसरली होती. पण कुणीही त्यांच्यावर अतिक्रम केल्याचा आरोप ठेवत नव्हते. कोणी म्हणत होते की ते टिकालीला गेलेत; तर कोणी म्हणत होते की मोंगलांच्या हल्ल्यापासून रक्षण व्हावे म्हणून कोदला आठगडला जाऊन लपलेत. त्यांना पिंजऱ्यात बद्ध करून बारवाटी किल्ल्यात नेण्यासाठी पुरीला सैन्य आले होते. आता युवराज नरेन्द्र कुमार खोर्ध्याचे

राजे बनतील. म्हणून तर नवमीदिवशी गुंडिचा मंदिरात जगन्नाथासमोर वस्त्रग्रहणादि विधी झाले. लोक असे तर्कवितर्क करत होते खरे पण सगळ्यांच्या मनात एक अवलक्षणी शंका घर करून बसली होती.

बाहुडा यात्रेच्या सुरुवातीला सकाळी त्रिवर्ग देवतांची पहंडी – म्हणजे स्वस्थानापासून रथापर्यंतची – यात्रा होते. ती सुरू झाली अन् कुणास ठाऊक एक गिधाड येऊन तालध्वज रथावर बसले. घंटा, शिंग व गर्दीच्या आवाजानेही ते भ्याले नाही की उडून गेले नाही. त्याने पंख पसरले, इकडे तिकडे पाहिले व श्रीमंदिराकडे ते निघून गेले. तेच गिधाड मग लक्ष्मीमंदिराच्या कळसावर जाऊन बसले असे लोक नंतर सांगू लागले. या घटनेमुळे पहंडीला उशीर झाला रथ अपवित्र झाला होता, त्याची शुद्धी झाली, मंदिराची शुद्धी झाली अन् मगच पहंडी सुरू झाली.

रथावर गिधाड बसणे न् रामचंद्रदेवांचे नाहीसे होणे यात तसा काहीच संबंध नव्हता. असलाच तर काकतालीय न्याय होता.

बाहुडा यात्रेच्या दिवशी हे अपशकुन घडल्याने येऊ घातलेल्या मोंगल आक्रमणाच्या अमंगल आशंकेने श्रीक्षेत्र आतून थरारून गेलं अथांग निळ्या पाण्यावर बुडबुडे उठावेत तद्वत अनेक स्मृति–विस्मृति मनात येऊ लागल्या.

एक म्हातारा सांगत होता, " महाराज दिव्यसिंहदेवाच्या वेळी सातव्या वर्षी वृषभ महिन्यात असंच एक गिधाड नीलचक्रावर बसलं. त्याच वर्षात मोंगलांचा प्रखर हल्ला श्रीक्षेत्रावर झाला. दुष्काळ पडला. एक 'भरण' धान्याची किंमत पंचवीस 'काहान' झाली. माणसानी माणसाला खाल्लं; न् दिल्लीपती औरंगशहाचा सेनापती इकरामखाँही त्याच वर्षी आला होता नाही का? मंदिराचे सिंहद्वार बंद झाले. चंदनयात्रा, रुक्मिणीहरण वगैरे महाप्रभूचे उत्सव स्थगित झाले. एवढंच काय, एकादशीला रात्री महाप्रदीप देखील प्रज्वलित झाला नाही. आतल्या आत कसं तरी काष्ठासनांवर देवस्नान उरकलं; पण चुपचाप. शंख नाही की घंटा नाही. गुंडिचा यात्रादेखील भोगमंडपात केली."

आज त्याचीच आठवण लोकांना होऊ लागली आहे. पहंडीला अजून वेळ होता. तालध्वज रथावरून गिधाड उडून गेल्यावर यात्रेकरू गटागटाने त्याचीच चर्चा करू लागले. अर्थात् अशा कोंडाळ्यात म्हातारे वक्ता होते व बाकी श्रोते.

रथीपूरहून नीलकंठ पट्टनायक नेहमी रथयात्रेसाठी पुरीला येतात. याही वर्षी कुटुंबकबिल्यासह ते आले होते. नीलाद्रिविजय झाला की ते परततील. दिव्यसिंहदेवांच्या वेळचा माणूस आहे तो. वय ऐंशीच्या पुढचं! इकरामखाँच्या मंदिरावरील हल्ल्याच्या वेळी धुमश्चक्रीत त्यांनी स्वतः भाग घेतला होता. म्हातारपणामुळे त्यांची स्मृती काही

गंजली नव्हती. कपाळावर, गळयाखाली, दंडावर सुरकुत्या पडल्या होत्या व त्यातून निळ्या शिरा उठून दिसत होत्या. ते बोलू लागले की त्यांच्या तुळशीमाळेखालच्या गळयाच्या नसा ताणल्या जात. सगळे त्यांना घेरून त्यांच्या गप्पा ऐकत होते. महाराज दिव्यसिंहदेवांच्या वेळी असंच एक गिधाड रथाच्या ध्वजदांडीवर येऊन बसलं होतं; त्यावेळच्या आठवणी कल्पनेच्या सहाय्याने खुलवून ते सांगत होते.

थरथरणाऱ्या आवाजात नीलकंठ पट्टनायक सांगत होते,

"हा एक अत्यंत मोठा अपशकुन आहे. महाराज दिव्यसिंहदेवांच्या कारकीर्दीत सातव्या वर्षी जगन्नाथाला चामडयाच्या वाद्यांनी जखडून याच गौड सडकेवरून फरफटवलं होतं. पण महाराजांनी तेव्हा एक युक्ती केली. इकरामखाँचा भाऊ मस्त-रामखाँ जेव्हा पन्नासएक स्वारांनिशी आला तेव्हा महाराजांनी त्याला एक लाकडी मूर्ती दाखवून म्हटलं की हाच जगन्नाथ! मोंगलांनी भोगमंडपावरून नीलचक्र काढले व ती लाकडी मूर्ती हत्तीवरून घेऊन ते चंदनपुरीला निघून गेले. त्या वर्षी चंदनयात्रा, रुक्मिणीहरण काही म्हणता काही झाले नाही. महाप्रदीपही प्रज्वलित झाला नाही. पण महाप्रभू मात्र विमलाईच्या मागच्या आंगणात होते."

श्रोत्यांनी उत्सुकतेने विचारले,

"मग?"

नीलकंठाची गोष्ट रंगात आली. ते पुढं सांगू लागले,

"मोगलांना वाटले की ते परमेश्वराला घेऊन गेले. पण बलिआर भुज तिथेच आत मंदिरात होते."

एकाला शंका आली. त्याने विचारलं, "हे कसं? प्रभू मंदिरात असताना मोंगलांना कसा पत्ता लागला नाही?"

नीलकंठ म्हणाले, "अरे, इकरामखाँ मस्तरामखाँ त्या लाकडी मूर्तीलाच जगन्नाथ समजून हत्तीवर लादून चालायला लागले होते. त्यांना वाटलं आता कुठले ठाकूर मंदिरात असायला? श्रीवत्स खंडाशाल मंदिराचे सिंहद्वार त्यांनी मोहोरबंद करून टाकले होते. मंदिर एखाद्या प्रेतासारखं पडून होतं, यात्रेकरूंचं येणं जाणं बंद झालं. मोंगलांना कसं वाटेल की जगन्नाथ मंदिरात आहे म्हणून? पण तुम्हाला सांगतो त्याच आंगणात सगळे विधी होत राहिले. त्या वर्षीची गुंडिचा यात्रा भोगमंडपात झाली होती. अशा रीतीने दिवसरात्र जाता जाता दिव्यसिंहदेवांच्या कारकीर्दीचं पंचविसावं वर्ष उजाडलं. कन्या राशीच्या दहाव्या दिवशी कृष्ण एकादशीला गुरुवारी मंदिर फिरून उघडलं. दिव्यसिंहदेवांच्या सांगण्यावरून अठरा राज्यांचे रजवाडे आले होते त्यांनी देवळाच्या दरवाजाची मोहोर तोडली, दारं उघडली. त्याच दिवशी संध्याकाळच्या

आरतीच्या वेळचे शंख, घंटा, शिंग वगैरे वाद्ये वाजू लागली. पुन्हा एकदा महाप्रदीप प्रज्वलित झाला. ही सांगोवांगी नव्हे प्रत्यक्ष बघितलेली गोष्ट आहे. "

श्रोत्यांत नीलकंठाच्या बरोबरचे एक समवयस्क वृद्ध होते. ते लक्ष देऊन ऐकत होते. मध्येच म्हणाले,

" खरी गोष्ट तर व्याहीबुवा सांगतच नाही आहात. मोंगलांनी नीलचक्राचा विध्वंस करून टाकला होता. तेहतिसाव्या वर्षाच्या कुंभ महिन्याच्या चौथ्या दिवशी पात्र परमानंद पट्टनायकचा पुत्र धरमु हरिचंदन महापात्राच्या प्रयत्नांमुळे मंदिरावर नवे नीलचक्र झळकले. तेव्हा कुठे इंद्राने पाऊस पाडला, राज्याला कळा आली."

पान कुटत वृद्धाच्या सांगण्याला जोड देत नीलकंठ पट्टनायक म्हणाले,

" अरे बाप रे, काय तो तेव्हाचा दुष्काळ ! केवळ परमेश्वराची कृपा म्हणूनच देश जागेवर राहिला. चिंचेच्या झाडावर एक पान शिल्लक राहिलं नव्हतं. लोकांनी खाऊन टाकली होती सगळी पानं. बांबू कळक उपटून कच्चेच खाल्ले होते. गवत बिवत सगळं माणसांच्या पोटात गडप झालं होतं. सगळं संपलं तशी मग माणसं मरू लागली. हे ऽ ऽ प्रेतांचे ढीग पडले होते. आजही आठवण आली तरी थरकाप होतो. "

पुन्हा एकदा वृद्ध सूत्र जोडत म्हणाले,

" परमेश्वराचा रथ तर एक अंगुळही हलला नाही. आता आज रथावर गिधाड बसलं आहे. महाराज रामचंद्रदेवही, कोण जाणे कुठं निघून गेलेत. काय देवाची इच्छा असेल ती असो ! तुम्ही लोक संभाळा. आमचं काय, अर्ध्याच्या वर गोवऱ्या मसणात गेल्याच आहेत."

अशाच सगळीकडे गटागटांनी चर्चा चालल्या होत्या. अशाच प्रकारच्या आठवणींची आख्याने लागली होती.

ह्याच वेळात रथ व मंदिराचे शुद्ध करण्याचे कार्य झाले होते. मंदिरातल्या वाद्यांचा आवाज बडदांडपर्यंत येऊ लागला. दइतापती जेव्हा दार उघडायला लागले तेव्हा पालिया खुंटिआंनी ' मणिमा ', ' मणिमा ' असा गजर करायला सुरुवात केली. त्यात जणू जगन्नाथाचे अभयच ऐकू येत होते. रथदांडवर उभे असलेले यात्रेकरू अमंगलाच्या सर्व दुश्चिता विसरून ' मणिमा महाबाहू 'चा गजर करू लागले होते.

सुरुवातीला जगन्नाथ व सुभद्राचे दइतांच्या खांद्यावरून आगमन झाले. मग मोठ्या थाटामाटात, गर्वाच्या आविर्भावात बलभद्राची पहंडी सुरू झाली.

ह्या निष्प्राण मूर्ती नव्हेत – बलवानांच्या शत आक्रमणांपुढे, दुष्टांच्या अत्याचारांपुढे न नमलेल्या मानवाचा अपराजित आत्माच आहे जणू. भूतकाळात ओडिसावर पठाण

मोंगलांची अनेक आक्रमणे झाली. त्या महापुरात उत्कलवासी लव्हाळ्याप्रमाणे वाकला पण मोडला नाही. जगन्नाथ म्हणजे उत्कलवासीयांची प्राणशक्ती आहे. आताही अमंगळ, अशुभ, आक्रमणकारी घटनांचा पूर यायचा असेल तर येवो; पूर्वी जसा उत्कल त्यातून तावून सुलाखून निघाला तसेच याही वेळी होईल. पहंडीच्या वेळी बड्या ठाकुराच्या मुकुटातून जणू अभयाशीर्वचन व्यक्त होत होते.

यात्रेकरू द्विगुणित उत्साहाने जयजयकार करत होते, "बलिआर भुजा ! मणिमा महाबाहू हो !"...

पहंडी यथाविधी समाप्त झाली.

रथयात्रेच्या वेळी जे विधी होतात तेच बाहुडा यात्रेच्या वेळी केले जातात. नेहमीच्या जीवनात नाही का कोणी ह्या गावाहून त्या गावी जाताना आपण सकारण अकारण आप्तेष्टांना बोलावीत ? निघण्याच्या अगोदर काही राहिले आहे का ते बघायला लागते व नंतर मग शोधावे लागते. शिवाय ज्या वस्तू घेतल्याखेरीज प्रवासाला कोणी निघत नाही त्या वस्तू पाथेय म्हणून एकत्र कराव्या लागतात तसेच काहीसे स्वरूप या यात्रेच्या वेळच्या विधींचे आहे. त्यात काही विशेष तात्पर्य नाही की आध्यात्मिकता नाही.

अर्थात् परदेशी प्रवाशांची गोष्ट वेगळी आहे म्हणा ! पण स्थानिक व पंचकोशी यात्रेकरूही दरवेळी तेच दृश्य अगदी तेवढ्याच उत्कंठेने बघतात. मधून मधून देवसेवकांच्या बरोबर 'मणिमा', 'महाबाहू', इत्यादि जयजयकारात सामील होतात. हा आवाज शेजारच्या समुद्रगर्जनेपेक्षाही अधिक गंभीर व प्रचंड होत जातो.

यानंतर तिन्ही रथांवर सेवकवर्ग आपापली कामे करत रहातात. वेगवेगळ्या सजावटी, मखरे, हार अर्पण करणं वगैरे चालू होतं. रथ चालायला लागण्यापूर्वी छेरापहरा होतो. देवमूर्ती रथावर बसून छेरापहरा होस्तवर पुष्कळ वेळ लागतो. याच वेळात पंडे रथांना लावलेल्या शिड्यांवरून अकारण चढत उतरत असा आव आणीत असतात की यांना मरायला फुरसत नाही. पण त्याचवेळी आपापल्या यजमानांना देवदर्शन करवून त्यांच्याकडून दक्षिणा उकळणे वगैरे त्यांची खरी कामे चाललेली असतात. त्या दिवशी हे सगळं चालूच होतं; पण मधून मधून यात्रेकरूंच्या घोळक्यात गिधाड रथावर बसल्याची चर्चाही होत होती..... अर्थात दूरगावचे आप्तेष्ट, स्नेहीजन अचानक भेटल्यावर सुखदु:खाच्या गोष्टीही होत होत्या. या सगळ्या कोलाहलाने बडदांड भरून गेला होता.

त्याचवेळी समुद्रात जशी लाट उठावी तशी त्या जनसमुद्रात बातमी उठली की या वर्षी तकीखांचे नायब राजा अमीनचंद बाहुड्याच्या रथांवर छेरापहरा करणार आहेत.

पण युवराज भागीरथीकुमार असताना हा अमीनचंद कोण आला छेरापहरा करणारा ? त्याला राजसेवेचा अधिकार कोणी दिला ? युवराज जर खोर्ध्याला निघून गेलेत तर मुदिरथ आहेत. ते का नाही करणार छेरापहरा ? असे अनेक प्रश्न बंडदांडवर चर्चिले जाऊ लागले. जे राजकारण जाणत होते त्यांनी सांगायला सुरुवात केली की अमीनचंद पुरीचा नायब होऊन आलाय. त्याच अटीवर तर जगन्नाथासमोर 'गोप–पुंडरीक' शिरोवस्त्र धारण करून सिंहासन ग्रहण करायला युवराज खोर्ध्याला निघून गेलेत. आता अमीनचंदाखेरीज दुसरं कोण अधिकारी आहे छेरापहरा करायला ?

छेरापहरा करण्यासाठी बहुधा अमीनचंद पालखीत बसून निघाले असावेत. कारण मार्कंडेश्वर–साहीकडून ताशे, शिंग इत्यादींचा आवाज येऊ लागला होता. वाजंत्र्यांचा आवाज ऐकून नीलकंठ पट्टनायक उत्तेजित स्वरात म्हणाले,

"हे बघा, जो जगन्नाथाचा सेवक आहे तोच खोर्ध्याचा राजा. ही परंपरा आहे." मघाचे राजनैतिक कारण ऐकून ते अस्वस्थ झाले होते, "युवराजाने सिंहासनासाठी जर राजसेवेच्या अधिकाराचा सौदा केला असेल तर त्याला राजा कोण मानेल ? का मानेल ?"

छेरापहराच्या वेळी तलिछो महापात्रचे एक विशेष काम असते. त्यासाठी ते शिडीवरून जात असताना त्यांनी नीलकंठ पट्टनायकला पाहिलं. ते त्यांच्या ओळखीचे होते. त्यांच्याशी बोलायला म्हणून महापात्र उभे राहिले. नीलकंठ पट्टनायकनी याच विषयावर त्यांना विचारताच महापात्र रहस्यपूर्ण हसून म्हणाले, "शास्त्रात लिहिलं आहे की कुळाचा नाश व्हायचा असला की कुलांगार पुत्र जन्माला येतो. बलीआर भुजाची इच्छा, दुसरं काय ? पाहू, पुढच्या वर्षी रथयात्रा तरी होते की नाही ?"

इथूनच जगन्नाथ श्रीक्षेत्र सोडून गेलेत या बातमीचे बीज अंकुरले व हळू हळू लोकमुखात त्याचा वेल फोफावत गेला. त्यावेळी जगन्नाथाच्या रथावर पुष्पमाळा अर्पण करण्याचे विधी चालले होते. म्हणून नंदिघोषापाशी गर्दी होती. नीलकंठ पट्टनायक तालध्वजरथापाशी उभे राहून हा एकंदर अनाचार पहात होते व धार्मिक बेशिस्तीला, युवराजाला व अमीनचंदालाही शिव्या घालत होते. पण आजूबाजूच्या गर्दीवर त्याचा एवढासाही परिणाम होत नव्हता.

अमीनचंद मिरवणुकीने छेरापहरा करण्यासाठी येत होते. वेत्रधारी सेवकगण छड्या हलवून गर्दी दूर करत होते.

पुढच्या पालखीत राजा अमीनचंद व मागून येणारीत मोठे उपाध्याय गौरी राजगुरू होते.

आज अमीनचंदांची कित्यक वर्षांपासूनची इच्छा फळाला येत होती. जणू जगन्नाथाच्या

राजसेवेच्या मिषाने त्यांना एक मोठा प्रदेशच, दुष्काळात अचानक मासा मिळावा तसा मिळाला होता. म्हणून तर त्यांच्या गुबदुल चेहऱ्यावर व हत्तीसारख्या बारक्या डोळयात संतोष भरून राहिला होता. मागच्या पालखीत असलेल्या गौरी राजगुरूंचा चेहरा व डोळे प्रेते फाडून खाणाऱ्या कोल्ह्यासारखा धूर्त व जागरूक दिसत होता.

अमीनचंदांच्या पालखीच्या दोन्ही बाजूंनी चालणारे सेवक व शिपाई जयजयकार करू लागले, "महाराज अमीनचंदांना शंखामध्ये ठेवून आपल्या कृपाचक्राची सावली करा हे महाप्रभू !"

साधारणतः या जयगर्जनेनंतर यात्रेकरू म्हणतात, "खोर्धा राजाचे कल्याण करा प्रभू !"

पण आज आता दगडी पुतळयांगत मूकस्तंभ राहून ते पालखीला वाट देत होते. एवढयात एक गांजेकरू ओरडला,

"हा साला कोण आहे रे ?"

आणि बडदांडची शांतता भंगली.

यात्रेकरूंच्या हसण्याचा एवढा कोल्हाळ झाला की ताशेदेखील ऐकू येईनातसे झाले. अमीनचंदला 'साला' कोण म्हणालं हे शोधून काढण्यासाठी शिपाई इकडे तिकडे धावले. अपराध्याला शोधून काढून ते अमीनचंदना खूष करू पहात होते. शिवाय लोकात त्यांची प्रतिष्ठा वाढवणे हाही एक हेतू होता. आता तो सफळ झाला की नाही हे बघायला न थांबताच छडचा हलवत ते अमीनचंदापाशी परत आले.

पुन्हा एकदा यात्रेकरूतून कोणी ओरडले,

"अरे हा भडवा आहे. सुना नायकिणीच्या माडीवरून उठून आला आहे. बघा, बघा साल्याच्या अंगावरचे काजळ-कुंकवाचे डागही अजून जस्से न् तस्से आहेत."

लोक खो खो हसू लागले.

रथावर येऊन अमीनचंदाने बेडकासारखे फुगलेले स्वतःचे शरीर साष्टांग नमस्कारासाठी झुकवले तेव्हा ते हास्यास्पद दृश्य पाहून तर लोकांच्या हसण्याला अधिकच उकळ्या फुटल्या. पण निखाऱ्यावर पाणी पडल्यागत लगेच सगळं शांत झालं. अमीनचंदाच्या साष्टांग नमस्कारानंतर आरती करण्यासाठी म्हणून भंडारमेकापने सुवर्णाची कर्पूरारती त्यांच्यापुढे केली. पण हातात घेताना ती अमीनचंदाकडून खाली पडली.

असला अपशकुन आजवर कुणी ऐकलाही नव्हता मग बघणार कुठून ? कोणत्याही म्हाताऱ्याला अगदी कल्पनेची पराकाष्ठा करूनही असला प्रसंग आठवेना. नीलकंठ पट्टनायकही त्याला अपवाद नव्हता. सकाळी ते गिधाड रथावर येऊन बसलं होतं;

त्यामुळे लोकांच्या मनात एक भीती हळूच प्रवेश करून बसली होती ती आताचा हा भयंकर अपशकुन पाहून अधिक दृढ झाली.

पण आता पुन्हा एकदा लोकांच्या खेकाळण्याला ऊत आला होता. अमीनचंद जगन्नाथाच्या रथावर छेरापहरा करीत होते.

पूर्वी कधीतरी छेरापहराचा अर्थ रथयात्रेच्या वेळी बडदांड साफ करणे असा होता; आणि राजसेवक या नात्याने उत्कलच्या गजपतींचे ते कर्तव्य होते. उत्कलच्या राजतंत्राचा तो एक आदर्श होता. इथे प्रजा गर्विष्ठ सम्राटाचा रस्ता सडासंमार्जन करून स्वच्छ करत नाही तर सम्राट स्वतःला जनतारूपी ईश्वराचा सेवक मानून प्रजेचे इहपारलौकिक कल्याण करण्यासाठी आपल्या हातात केरसुणी घेऊन रथाचा रस्ता झाडून काढतात. हाच होता छेरापहराचा खरा अर्थ. पण नंतर सेवकाचा नम्रपणा धारण करून राजसत्तेच्या अभिमानाला समाधान वाटेना तेव्हा मग रथदांड सोडून फक्त रथावर छेरापहरा करण्याचा विधी सुरू झाला.

जे काय असेल ते असो, विधी क्लेशकारक होता. त्यातून तो करायचा होता तिन्ही रथांवर.

अमीनचंदाने बलभद्र व सुभद्रेच्या रथांचा छेरापहरा कसाबसा उरकला व जेव्हा ते जगन्नाथाच्या रथाची शिडी चढू लागले तेव्हा जणू त्यांच्या पायातली शक्ती नाहीशीच झाली. तिथे छेरापहरा करताना ते अचानक कमरेवर हात ठेवून तोंड वेडेवाकडे करीत उभे राहिले. कमरेत चमका मारत होत्या. एका हातात सुवर्णाची झारी व दुसऱ्या हाताने कंबर दाबून धरली आहे, तोंड वाकडे अंग वाकडे अशा हास्यास्पद अवस्थेत त्यांना पाहताच लोक हसू लागले. नेहमी हा विधी होत असताना लोक श्रद्धाभावाने पहात असतात. त्या भक्तिभावाचा कुठे पत्ताच नव्हता. अमीनचंदाचे राजसेवक या नात्याने वागणे कुणाला पटलेच नव्हते; त्यामुळे श्रद्धा–भक्तीची जागा हास्य–उपहासाने घेतली होती.

नंदिघोष रथावरून बलिआरभुज हे सगळे शांतपणे न्याहाळत होते. ते तर सर्वद्रष्टे आहेत. पण यात्रेकरू एकमेकांना म्हणत होते, "बघा, श्रीमुख कसे निस्तेज दिसते आहे. असं कधी पाहिलं नव्हतं, नाही ? सगळी कळाच गेली."

बाहुडा यात्रा पाहण्याची आता कुणात श्रद्धा राहिली नव्हती. रथाचे दोर मस्तकी लावून लोक निरानंद मनाने परतू लागले.

अधरपणा एकादशीच्या पहाटेपासून आकाशात ढग गोळा व्हायला लागले होते. शिडे फडकावलेल्या गलबतासारखे ढग पूर्वेकडून पश्चिमेकडे वहात होते. वारा ओलसर गार लागत होता. म्हणजे पाऊस येणार.

समुद्राकडून येणारा वारा माडांचे शेंडे कराकरा वाजवीतच येत होता. यात्रेकरू-साठी रथदांडच्या दोन्ही बाजूंना पंडयांनी बनवलेल्या केंबळयांचे आडोसे पाचोळया-प्रमाणे उडून चालले होते. तसा काही वारा जोराचा नव्हता. पण वादळाची पूर्वसूचना मात्र त्यात होती.

वादळ पावसाची चिह्ने पाहून पंचकोशी यात्री परतायला लागले होते. जगन्नाथ आता श्रीक्षेत्रात नाहीत; खोर्ध्याचे महाराज रामचंद्रदेव अकस्मात् नाहीसे झालेत; तकीखांचा नायब म्हणून अमीनचंदानी छेरापहरा केला; त्यांच्या हातून कर्पूरारती खाली पडून अपशकुन झाला, शिवाय तालध्वज रथावर गिधाड बसलं...अशा सगळया अफवा व कारणांमुळे यात्रेकरू मनातल्या मनात भयभीत झाले होते व पुरी सोडायला आतुर होते. पुरीचे रस्ते ओस पडायला आरंभ झाला होता.

मोंगलांचा हल्ला एकदा सुरू झाला की बाहेरच्या यात्रेकरूंचे हाल कुत्रा खात नाही. जगन्नाथरस्त्यावर एकदा ते पोचले की ते थोडेतरी सुरक्षित होतात. कारण सुजाखाँच्या वेळेपासून यात्रेकरूंच्या देखभालीसाठी ठिकठिकाणी चौक्या बसवून सुरक्षिततेची चोख योजना केली आहे. म्हणून जगन्नाथ रस्त्यावर यात्रेकरूंना लुटण्याचे धाडस मोगल सैनिकही करीत नाहीत. जगन्नाथ रस्त्यावर जागोजागी सरकारी चौक्या आहेत. पण मोंगल सैन्याने जर श्रीक्षेत्रावरच हल्ला केला तर दूरदेशीच्या यात्रेकरूंचे प्राण व वित्त दोन्ही धोक्यातच येते. पूर्वी असे वारंवार झाले आहे. या वेळी अचानक मोंगल हल्ला होण्याची अशी काही भीती नव्हती की परिस्थिती नव्हती. पण मग ते गिधाड येऊन देवळाच्या शिखरावर व रथदांडीवर का बसलं ? नक्कीच जगन्नाथाचा कोप झालाय; नाहीतर अमीनचंदाच्या हातून आरती पडली नसती. डोकं ठिकाणावर ठेवून विचार करण्याच्या मन:स्थितीत कुणीच नव्हता. यात्रेकरूंचं एक टोळकं पुरी सोडून जाऊ लागलं ते पाहून बाकीचेही त्याचं अनुकरण करू लागले. बाहुडाच्या दिवसापासून कॉलऱ्याचेही भय वाढू लागले आहे. बिमलेई देवीच्या एका पंडयाला स्वप्नात दृष्टान्त देऊन देवीने सांगितले की अमीनचंदाने जगन्नाथाचा छेरापहरा केला म्हणून ती रागावली आहे व पुरी निर्दाळणार आहे. या सर्वांचा परिणाम म्हणून अधरपणा एकादशीच्या दिवसापासूनच पुरीचे रस्ते ओस पडायला प्रारंभ झाला. त्यावर वारा सोसाटयाने वाहत होता.

गुंडिचा यात्रेदिवशी जगन्नाथ सुभद्रेला घेऊन निघून आले. त्यामुळे लक्ष्मीला मत्सर वाटला, ती रागावली. सामान्य उडिया कुटुंबाचे हे चित्र देवालाही लागू झाले आहे.

जगन्नाथाच्या सिंहद्वारापाशी माणूस देवपणाच्या जवळ पोचतो तसाच देवही माण-सात येतो. म्हणून लक्ष्मी जशी चिडलेली भामिनी पत्नी झाली तसे जगन्नाथही असहाय्य, पश्चातापदग्ध पती झाले.

जगन्नाथाच्या रथावरून उतरून लक्ष्मी आत गेली व तिने सिंहद्वार आतून बंदच करून घेतले. तिच्या त्या दुखावलेल्या अभिमानामुळे जगन्नाथाला दारापाशीच सारा दिवस उपाशी तळमळून काढावा लागला. खाण्यापिण्याची सोय करायची असेल तर स्वतःच्या मंदिरात जाण्याशिवाय अन्य उपाय नव्हता, पण तेही बंद होते. म्हणून लक्ष्मीच्या रागामुळे अधरपणा एकादशी कडकडीत निर्जळी – अगदी विधवा करतात तशी – करावी लागली. पुष्कळ विनवण्या प्रयत्न केले तेव्हा साखर केळी व खवा इत्यादींनी बनलेला 'अधरपणा' मिळाला. तोही कसा, तर भिकाऱ्यागत एका मातीच्या परळात. जगन्नाथाच्या अरुण अधरांनी त्याला स्पर्श मात्र केला पण ती हंडीही लक्ष्मीच्या कोपाने फुटून गेली. द्वादशीही तशीच निर्जळी जायची भीती वाटायला लागली. पण लक्ष्मीने, रुसवा सोडला नाही.

वेदपूर्व काळात समाजात जी मंत्रतंत्रपूर्ण पानफुलांची शबरपूजा प्रचलित होती त्याच्या सेविका होत्या ज्ञानदेई माळीण, निताई धोबीण, गांजी गौळण, खुआ तेलीण, लहुकुटी लोहारीण, पत्रपिधा बुरूड व सुकुटि चांभारीण. या कदाचित् कृष्णाचार्यांच्या सहजपंथाच्या किंवा कान्हुपाच्या चर्यागीतिकेतल्या साधना नायिका असाव्यात व त्यांचे परिवर्तन डोंब व शबरात झाले असावे. एकेकाळी लक्ष्मी पर्णशबरी – तंत्राची उपास्य-देवता होती. नंतर जगन्नाथाचे परिवर्तन सर्वधर्म–समन्वय देवतेत झाले व पर्णशबरी लक्ष्मीचे विष्णुपत्नी, सागर दुहिता लक्ष्मीत रूपांतर झाले. अर्थात् सांस्कृतिक संघर्षातच हे चालू होते. शेवटी वैदिकांनी जगन्नाथाला आपलासा केले; पण जगन्नाथक्षेत्रात पर्णशबरी लक्ष्मीला स्थान द्यायला जसे ते नाखूष होते तसेच अवैदिकही लक्ष्मीला पतीची आज्ञा शिरोधार्य मानणारी जगन्नाथपत्नी – करू इच्छित नव्हते. वैदिकेतर समाजात मातृप्रधान संस्कृती होती व तिचेच रूप लक्ष्मी होती. वरील लक्ष्मीचा मान ही त्या संघर्षाची स्मृती होती. कोणे एके काळी जगन्नाथ नाथसंप्रदायाचे इष्टदेवही होते. त्याचेही यात स्मरण करण्याचा हेतू असेल.

हिंदू धर्माचरण तत्त्वांचे नीरस काथ्याकूटच केवळ करत बसत नाही; त्यात काव्यात्मताही आहे. म्हणून तर या ऐतिहासिक घटनेला कथा व काव्याच्या माध्यमातून रसपूर्ण बनवलं आहे. यात लक्ष्मी खंडिता स्वकीया नायिका आहे व जगन्नाथ परक्या स्त्रीवर भाळलेला धूर्त नायक. यामुळे लक्ष्मी एका साध्यासुध्या स्त्रीसारखी रागावली व तिने जगन्नाथाला घराचे दरवाजेच बंद केले.

नीलाद्रिविजय द्वादशीच्या विधीत या आध्यात्मिक व सांस्कृतिक संघर्षाची आवृत्ती पहायला सापडते. हा बघायला दरवर्षी मंदिरात व बाहेर एवढी गर्दी जमते की तीळ ठेवायला जागा राहात नाही. पण आज द्वादशीच्या दिवशी देखील सिंहद्वारापाशी काळं

कुत्रं देखील नव्हतं. तुफान पाऊस व अनेक प्रकारच्या भीती यामुळे यात्री निघून गेलेत. निर्जन रथदांडावर यात्रेकरूंसाठी बनवलेल्या केंबळी छप्परांना उडवून लावत वारा सोसाटत होता.

भरीस भर म्हणून उद्या पंचग्रह कूट (ग्रहण) आहे.

सांजावतं न सांजावतं तोच आकाशात अमावास्येचा काळोख दाटला.

दुपारी एकदा पाऊस पडल्यानंतर ढग विरळ झाले होते. पण पुन्हा एकदा अंधारून आले. त्यातच वीज चमकून भयंकरपणात भर घालत होती. दुपारच्या पावसानंतर सडकेच्या दोन्ही बाजूंनी गटारे खळखळ आवाज करीत अठरनाल्याच्या दिशेने चालली होती. पण वारा तसाच सोसाटयाचा होता.

सायंपूजेनंतर देवमूर्तींची पहंडी होते. पण या तुफानी हवेत मशालीही राहीनात तेव्हा एखादवेळी पहंडी अंधारात करावी लागायची या भीतीने संध्याकाळ व्हायच्या आधीच जयमंगल आरती उरकून टाकली होती. त्यानंतरही ठाकुरांचे पुष्कळ विधी व्हायचे असतात. त्यांना वस्त्र, दागिने घालून सजवलं जातं. जगन्नाथ बगीच्यातून सेवक फुलांची आभूषणे घेऊन जातात. तीच श्रीना घालतात. आज हे सगळे विधी कसेबसे उरकले गेले. पहंडी सुरू करायला सेवक उतावळे झाले होते. एरव्ही गर्दीमुळे विलंब लागत असे पण दक्षिणा वगैरेची प्राप्ती होत असे. पण आज तिथे एखादं मांजरही नव्हतं. सिंहद्वाराच्या घुमटीत उभं राहून अमीनचंद व गौरी राजगुरू पहंडी सुरू करण्याची घाई करत होते.

वादळपावसाचा हाहा:कार व मेघव्याप्त आकाश अशा विषण्ण वातावरणातच पहंडी सुरू झाली व शिंग वाजले. राघवदास मठाकडून देवासाठी जे मुकुट आले होते त्यांनीच ठाकुरांना सजवलं. पहंडीला सुरुवात झाली. सुभद्रा व बलभद्र आत गेले. जगन्नाथ जेव्हा सिंहद्वाराशी पोचले तेव्हा विधीनुसार देवदासींनी द्वार बंद केले. नीलाद्रिविजय–द्वादशीदिवशी त्यांचीच सगळीकडे चलती असते. राजा अमीनचंद व गौरी राजगुरूंना देखील बाहेर ढकलायला त्यांनी कमी केलं नाही.

सुना कलावंतीण तोडयांनी शोभिवंत दिसणाऱ्या आपल्या हातांनी जेव्हा अमीनचंदांना बाहेर ढकलत होती तेव्हा तिच्या देवदासी सख्या कांचन, केतकी, सारिआ वगैरे खी खी करून हसत होत्या.

अमीनचंद एकदम सुनाला ओळखू शकले नाहीत. आपले विलासी नटणेमुरडणे टाकून तिने स्वत:ला देवदासीसारखे असे काही सजवले होते की अमीनचंदासारख्या लंपट हीन अभिरुचीच्या माणसालाही कामभावना शिवत नव्हती. ही कुणी दुसरीच सुना होती, महालक्ष्मीची सेविका. नारिंगी रंगाचे पट्टवस्त्र, मस्तकावर रत्नजडित

सोन्याची जाळी, इंद्रगोविंद चोळी, रत्नमेखला, नाकात सुढाळ मोत्याची नथ, कानात हिऱ्यांची कुंडले, गळ्यांत रत्नमाळा, पायात नूपर, डोळ्यात नैसर्गिक लालित्य...अशी मूर्ती अमीनचंदांनी फक्त मंदिरात पाहिली होती. जिवंत माणूस असं दिसेल याची ते कल्पनाच करू शकत नव्हते. तिच्यावर त्यांची नजर गेली व तिने सिंहद्वार बंद करून घेतलं.

जगन्नाथ सिंहद्वारी पोचले की पंडे व देवदासी ' दायिका ' गातात – आपल्या सवाल –जबाबासारखं. पण वादळवाऱ्यामुळे आज पंड्यांना काही उत्साह नव्हता. देवदासींचा उत्साह मात्र होता तसाच होता. तुफान, वादळ ह्यांनी त्यांना काही वाटत नव्हतं.

मंदिराच्या दक्षिणेकडच्या अंगणात एक भलं थोर वडाचं झाड होतं; वादळाने त्याची एक फांदी मोडून पडली. त्याच्या कडकडाटाने आसमंत दणाणलं. त्याचवेळी जवळपास कुठेतरी वीज पडली असावी. देवदासी मोठ्या उत्साहात होत्या नेहमीं-सारख्या; पण दइता गळाठले होते. जयविजयद्वार उघडले की जगन्नाथ रत्नखचित सिंहासनावर बसेस्तो पुष्कळ विधी व्हायचे असतात. दार उघडले की भंडारदारासमोर रुसून बसलेल्या लक्ष्मीशेजारी जगन्नाथ बसतात. तिथे आरती – वंदना होऊन मग ते रत्नखचित सिंहासनावर जातात. मग बडसिंहार, शयनव्यवस्था, वीणावादन इ. इ. वादळवाऱ्याने हे सर्व होईतो अर्धी रात्र होणार हे जाणून सगळेजण झटापट काम उरकत होते.

देवदासींच्या ' वचनिका ' गाण्यामुळे उशीर होत होतात. एका दइताने दारावर थापा मारत म्हटलं, " अग ए सुना आता बस् करा की. पावसाने न् वाऱ्याने जगन्नाथदेखील कुडकुडायला लागलेत. आता दार उघडा."

दार उघडलं. पण त्यामुळे हवेचा जो झोत आत घुसला त्याने सिंहासनासमोरचा अखंड नंदादीप विझला. ते पाहताच अखंड मेकापने एक अस्फुट किंकाळी फोडून म्हटलं, " वाहुडा सुरू झाली तेव्हापासून अपशकुनावर अपशकुन चालले आहेत. काय त्याची इच्छा असेल ती असो ! अखंड नंदादीप तरी वाढवता नये होता. "

गौरी राजगुरू अमीनचंदांसोबत काष्ठअर्गलेपाशी उभे राहून नीलाद्रिविजय विधी पहात होते. अखंड मेकापच्या बोलण्यात अमीनचंदांबद्दलचा आक्षेप समजण्याजोगा होता. म्हणून थोड्या रागीट आवाजात ते उत्तरले, " सोसाट्याचा वारा आल्यावर दीप वाढवणारच. यात विचार कसला करायचा ?"

अखंड मेकापने पुन्हा दीप प्रज्वलित केला.

मंदिरात प्रवेश केल्यावर लक्ष्मीसमोर जगन्नाथ–रुक्मिणीची वस्त्रगाठ सोडायची असते. ती विधी भीतरछो महापात्र करतात. पण आज ते कुठं दिसत नव्हते. कोण जाणे

कुठं गेलेत ! आज नरेंद्र महापात्रची पाळी आहे. त्याची गैरहजरी जाणून गौरी राजगुरू उद्विग्न स्वरात म्हणाले,

" कुठे गेले नरेंद्र महापात्र ? हळूहळू सगळेजण मनाला येईल तसं वागताहेत इकडे माझं लक्ष आहे. म्हणून तर देवकार्य नीट होत नाही."

नरेंद्र महापात्रला शोधणाऱ्या एका दइताला त्याचा मुलगा येताना दिसला. त्याला विचारू लागला, " अरे महादेव, तुझे बाबा कुठे आहेत ?"

" मला पाठवलंय त्यांनी. त्यांना ताप आलाय. अंथरुणावरून हलवत नाही", तो म्हणाला.

तात्काळ सगळेजण म्हणाले,

" बरं, बरं. लवकर आटोप. यानंतरच बडसिंहार व्हायचा."

एकदांचे सगळे सोपस्कार पार पडले. जगन्नाथ रत्नसिंहासनाकडे निघाले तशी सेवकांनी घोष केला,

" रत्नसिंहासनावर विराजमान व्हावे हे महाप्रभू."

बडसिंहार होता होता मध्यरात्र उलटून गेली. आता बाहेर नुसताच वारा नव्हता, मुसळधार पाऊसही होता. देवाची शयनव्यवस्था, आरती, गीतगोविंदगायन, तांबूल-अर्पण, कर्पूर वगैरे वगैरेही झाले. शेज करून सेवक गेले. जयविजयद्वार पालिआने बंद केले. दक्षिण द्वारही आतून बंद झाले. अग्रदीप तेवत होता. अखंड नंदादीप रत्नसिंहासनाखाली ठेवला. पालिआ मेकापने चारी बाजूला न्याहाळले.

काही उंदीर सिंहासनामागून भिंतीला चिकटून पळत होते, ते मागच्या पादतीर्थांच्या रस्त्याने गेले. निधी मृदुली म्हणाला,

" देवळातही हे बेटे उंदिर वाढलेत. तलिछो महापात्र काही सांगूनही पिंजरे लावत नाहीत. यांचा त्रास आपला वाढतच चाललाय."

दइतांचे प्रमुख गोविंद महापात्र भांगेने धुंद झालेल्या स्वरात म्हणाले, " अरे हाच एक मोठा ढोलात लपलेला उंदीर आहे. त्याला कोण सांभाळणार ? सांग."

गौरी राजगुरू व अमीनचंद यांच्या मागोमाग बाकीचेही पावसात बाहेर आले. बाहेर वादळाचे थैमान अधिकच उग्र झाले होते. मृदली, बडपुआर पढिआरी व मंदिराचे रक्षक प्रभूच्या शयनानंतर मंदिराच्या आत पहारा करतात. बाकीचे आतलं अंगण व बावीस पायऱ्या पार करून बाहेर आले.

सिंहद्वार बंद केले.

रात्री तुफानाचा वेग अधिकच वाढला. कल्पवटाच्या दोन मोठाल्या फांद्या मोडून इंद्राणी मंदिरापासून ते मुक्तिमंडपापर्यंत पसरल्या होत्या. मंदिराच्या शिखरावरून नीलचक्र उडून लक्ष्मीमंदिरापाशी पडलं होतं. पहाटेच्या सुमाराला वादळ थांबले. ढगही पांगले. वादळाच्या थैमानाने अंगणाच्या आतबाहेर रणकंदन झाल्याचे स्वरूप आले होते. पहाटेला वीज पडली व जगन्नाथ–वल्लभाची काही झाडे जळाली. तुफानाचा वेग जरी कमी झाला होता तरी ढगांचे गडगडणे चालूच होते. रथदांडवर वारा सूं सूं वहात होता.

सकाळी पाऊस नव्हता. आकाशही स्वच्छ होते.

भल्या पहाटे गौरी राजगुरू, अमीनचंद, प्रतिहारी भीतरछो महापात्र, मृदुली, अखंड मेकाप, पालिआ मेकाप, खटशेज मेकाप, पालिआ सुआर, बडखुंटिआ, गराबडू, बलिता जोगाणिआ वगैरे सर्व दार उघडायला व काकडारतीला पोचले.

प्रतिहारी, मृदुली, भीतरछो महापात्र, अखंड मेकाप आणि पालिआ मेकाप यांनी प्रथम गेल्या रात्री दारावर लावलेली मोहोर ठीक आहे की नाही ते पाहिले. त्यानंतर मृदुलीने टाळे उघडले आणि सेवक प्रदीप घेऊन आतल्या दारापाशी आले. इथल्याही दाराच्या मोहोरेची तपासणी होऊन मगच दार उघडले व अखंड मेकाप आणि पालिआ मेकाप हातात नवप्रदीप घेऊन रत्नसिंहासनापाशी पोचले आणि त्यांच्या हातातून दिवा गळून पडला. ठण् – ठण् आवाजाने मंदिर निनादून गेले.

रत्नसिंहासन मोकळे होते. जगन्नाथ अंतर्धान पावले होते.

बाहेर टाळे होते, मोहोर होती. मृदुली व पढिआरी रात्रभर पहारा देत होते. अशा परिस्थितीत महाप्रभू गेले कुठे ?

तो प्रत्यक्ष ईश्वर ! शून्यपुरुष ! ! तो काय तुम्हा आम्हांसारखा शरीरधारी आहे ? कितीही पहारेकरी असले तरी त्यांच्या डोळ्यांना तो जाताना कसा दिसेल ? अशा अनेक तर्कवितर्कांनी गाभारा गजबजला होता.

जगु पढिआरीने कुचमत सांगितले. "बाबांनो, तुम्हाला खोटं वाटेल, पण मी प्रत्यक्ष पाहिलंय. पहाटेला जेव्हा वीज पडली की नाही, तेव्हा मी वराह मंदिराच्या सोप्यात बसलो होतो. पाहिलं तर मंदिर, अंगण एकदम उजळून उठलं. एकदम लक्ष चंद्रज्योती पेटाव्या तसं. गरुडासारखा एक विशाल पक्षी पंख पसरून उडून गेला. त्यानंतर सगळीकडे मिट्ट काळोख झाला. माझं सगळं शरीर केळीच्या पानासारखं थरकापत होतं. मी जेव्हा हे मृदुलीला सांगितलं तेव्हा त्यानं माझी चेष्टा केली व म्हणाला 'ह्याचा अर्थ अजून भांगेची नशा उतरली नाही.' "

पण मृदुलीने म्हटलं,

" वा, वा ! मी कसं असं म्हणीन ? मी जर गरुड जाताना प्रत्यक्ष पाहिला तर असं कसं म्हणीन ? या नाही का वडाच्या फांद्या मोडल्यात ? गरुडाच्या पंखाने मोडल्यात त्या ! "

राजा अमीनचंद खवळले होते. ते गरजले, " जगन्नाथ कुठं गेला ? कोण सांगेल ? "

गौरी राजगुरू रत्नसिंहासनाकडे पहात विचार करत होते, पूर्वीही अनेक वेळा जगन्नाथ अदृश्य झालेत. नाही असं नाही. पण अशा रीतीने त्याचे शून्यात विलीन होणे त्यांनी कधी ऐकले नव्हते की पाहिले नव्हते. पण ते गप्प बसले होते.

जगन्नाथासारखा एक भला थोरला लाभ मुठीतून निसटून जाईल अशी कल्पनाही अमीनचंदांनी केली नव्हती. ते आपला राग सेवकांवर काढत होते

बलिआ पंडाने त्यांच्या आवाजावर आवाज चढवून ओरडून म्हटलं, " शून्य महाशून्यात अंतर्धान झाले. पिंड ब्रह्मांड झाले. सोळा कला सोळा कलांत विरल्या. तुम्हाला काही कळत नाही तर ओरडता कशाला ? जगन्नाथ कुठं गेले ते मुनियोग्यांना देखील ठाऊक नाही. मग आम्ही कसं सांगणार ? जा, बलभद्रला जाऊन विचारा. तो सांगेल. "

# बारा

## 1

चार दिवस व चार रात्री सतत वादळ पाऊस झाला आणि आज सकाळी शांत आकाशावर प्रभातीचा प्रकाश पसरला.

ज्या दिवशीपासून पाऊन कोसळायला लागलाय त्याआधी एक दिवस सरदेईला ताप यायला लागला आहे. तशा तापातच चारी दिवस मुसळधार पावसाचे गेले. कालपासून ताप थोडा कमी झालासा वाटला पण संध्याकाळपासून पुन्हा चढायला लागला. अंथरुणावर पडल्या पडल्या सरदेई बेशुद्ध झाली.

तिला आठवतं आहे, चैत्राच्या सकाळीगत धुक्याने वेढलेला अंधार चारी बाजूंनी लपेटतो आहे. त्यात किती ओळखीचे चेहरे दिसताहेत. मेलेले, हरवलेले, दुरावलेले. बेशुद्धीत हेच तिला दिसत राहिले. कोणी तिला बोलावत होते तर कुणी हसत होते. बालगावच्या हांडिभंग वडाखालची ती राक्षसी सैनिक–मूर्तीदेखील तिला दिसत होती. आणि मग सरदेई किंचाळी फोडून विसकटलेले केस मुठीत धरून ओढत होती, पुन्हा बेशुद्ध होत होती.

पुष्कळ वेळाने तिने पाजळलेल्या मशाली पाहिल्या व गडबड ऐकली. असं वाटलं की सराईत लाखो चंद्रज्योती उजळल्या आहेत. सगळीकडे कापूर, चंदन, कस्तुरी व अनेक फुलांचा सुवास दरवळतो आहे. कुणाचा तरी थंड स्निग्ध स्पर्श तिच्या तापणाऱ्या कपाळाला झाला. काळवेळाचे काहीच भान सरदेईला नव्हते.

तिने डोळे उघडून चारी बाजूला पाहिले. दरवाजा अर्धवट उघडा होता. तिथूनच येणारा थंड वारा तिच्या कपाळाला स्पर्श करत होता. स्नेहमय स्पर्श !

समुद्राचे गर्जन, अरण्यवेष्टित चिलिकेच्या लाटांचा अवखळ नाद, कलहंस, जलसारस व बाकी अनेक पक्ष्यांचा कलरव या सर्वांनी मिळून उध्वस्त तंडाकिनारला नवजीवनाचे महासंगीत प्राप्त करून दिले.

काल रात्रीचा तो सुवास आज प्रभातकाळच्या हवेतही भरून राहिला होता. सरदेईच्या श्रांत अशक्त शरीराला तो सुहास जणू काही दुसऱ्या ग्रहावर घेऊन जात होता. अमृताप्रमाणे तिच्या रोमरोमात संजीवन भरत होता.

तिला तहान लागली होती. कोण जाणे कळशीत पाणी आहे की नाही ते! पाण्यासाठी व्याकुळ नजरेने तिने इकडे तिकडे पाहिले. दगडीत पाणी होते. यात कुठून पाणी आले? तिने काही ते पाणी ठेवले नव्हते. ही दगडीही सराईतली नव्हती. कापणाऱ्या हातांनी कशीबशी दगडी उचलून ती पाणी प्याली, आणि श्रमाने थकून जाऊन पुन्हा पडली.

गतरात्रीच्या घटनांचा चित्रफलक तिच्या मनासमोरून सरकू लागला.

चिलिकाच्या काठावरच्या सराईत सरदेईला कधीपासून ताप येत होता. त्या दिवशी बरं वाटलं म्हणून बाहेर येऊन बसली होती. एका भयानक रात्रीनंतरच्या सकाळी समोर पसरलेल्या अथांग जलराशीकडे उदास डोळ्यांनी पहात भिंतीला टेकून ती बसली होती.

पश्चिमेच्या बाजूला भालेरी पर्वतावर ढगांच्या गर्दीत, मेघांनी आच्छादलेल्या दुपारीचा क्षीण प्रकाश होता. त्यात चिल्का भीषण वाटत होती. दया, भार्गवी पालिआ वगैरे नद्यांना पूर आल्याकारणाने व त्या चिलिकेला मिळत असल्याने तिलाही भरती आली होती. सातपडा, बलभद्रपूर, माणिक पाटणा वगैरे ठिकाणी पाणी भरले होते व तिथली घरे जणू वेगवेगळी बेटे असावीत तशी दिसत होती. तंडाकिनारच्या आसपास जहिंकुदा, रसकुदा आदि गावांतही पाणी भरले होते. नेहमीप्रमाणे तिथले लोक प्राणरक्षणासाठी अंधारी परगण्यात गेले होते. तंडाकिनारदेखील बऱ्याच ठिकाणी पाण्याखाली गेले होते; व समुद्र आणि चिलिकेच्या पाण्यातल्या रंगाच्या वेगळेपणामुळे तिचे पुसट अस्तित्व जाणवत होते. छातीइतके उंच वाढलेल्या काळसर हिरव्या गवताएवढे ते पाण्यात बुडले होते. शीतल वारा जेव्हा पश्चिमेकडून पावसाची चाहूल घेऊन येत असे तेव्हा चिलिकेत बोरू आंदोलित होऊ लागत व बुडणाऱ्या व्यक्तीच्या हातांप्रमाणे भासत. किनारीची फुन्नाग, आंबे, फणस यांच्या फांद्या जोराच्या वाहणाऱ्या वाऱ्यामुळे पाण्यावर वोळून आल्या होत्या. कोळयांच्या व मच्छिमारांच्या छोटया छोटया होडया तुफानाचा मार खाऊन मेलेल्या मगरीप्रमाणे किनाऱ्यावर पडल्या होत्या. चिलिकेचे फेसाळ पाणी पुन्हा पुन्हा त्यांच्यावर येऊन आपटत होते व फेस, घाण मागे ठेवून चिलिकेत परतत होते.

सराईच्या जवळच एक छोटीशी नाव उलटी पडली होती. एक एरा पक्षी कुठूनतरी

आला व तिच्यावर बसून पंख झाडू लागला. पण एका लाटेने ती नाव डचमळली तेव्हा घाबरून तो उडून गेला.

त्या कंटाळभरल्या, नि:संग चित्रात पक्ष्यांशिवाय दुसरी कोणतीही हालचाल नव्हती. ढगांनी झाकळलेलं आकाश व भरती आलेली चिलिका यांत सगळं संपल्यागत वाटत होतं.

सृष्टी व जीवन जणू इथे समाप्त झाले होते. सगळं काही सोडून देण्याचा प्रदेश जसा इथूनच आरंभ होतो आहे. जीवनाचे प्रतीकसे भासणारा एराही उडून गेला व त्या अथाह शांततेने सरदेई वेडीपिशी झाली. जगुनीला हाक मारण्यासाठी शब्द घशात गोळा होत होते पण ताप व अशक्तपणामुळे ते बाहेरच पडत नव्हते. तिला कळलंच नाही की हाक बाहेर पडण्यापूर्वीच शब्दहीन झाली. जिभेला चव नव्हती. मात्र सारखी तहान लागत होती. असहायपणे तिने कपाळावरच्या बटा मागे सारल्या. पुन्हा ताप येणारसं वाटतं. अंग दुखायला लागलं होतं. कपाळ तापलं होतं.

वाऱ्याने सरदेईचा पदर उडाला व छाती उघडी पडली. चमकून तिने अंगभर पदर घेतला व तशीच पूर्ववत् भिंतीला टेकून बसून राहिली.

तीन दिवसापासून जगुनीचा कुठे पत्ता नाही. यावर्षी सराई बंदच आहे. काय झालंय त्याला कोण जाणे ! कुठं असतो तेही हरी जाणे ! जो एकदा भल्या सकाळी नाव घेऊन चिलिकेवर जातो तो मध्यरात्री येतो. कधी कधी येतही नाही. विचारलं तर काही सांगत नाही. बालुगावचा जगुनि आणि हा जगुनि यात महदंतर आहे. असं काही होईल अशी सरदेईने कधी कल्पनाही केली नव्हती. पहिल्या-पहिल्यांदा सरदेई त्याच्यावर रुसायची. नंतर त्याचा तिरस्कार करू लागली. आता यातले काहीच नाही; आहे फक्त उदासीनता. पण तरीही या निर्जन सराईसारखा जगुनी तिचा एकमात्र आधार होता; तोच अशा रीतीने तुटल्यावर तिची प्रफुल्लता जशी मावळली तसे तिचे हातपायही थकले.

सराईत उतारू आले की ही गडबड उडे. सरदेई पाणी आणेल, रांधेल पण बाजार-हाट कोण करणार? लाकडं कोण फोडणार? बाकी छोटी मोठी कामं कोण करणार? हे सगळं जगुनीचं काम होतं. पण जेव्हापासून तो भ्रमिष्टासारखा इकडे तिकडे भटकायला लागला आहे तेव्हापासून सराई बंद झाल्यासारखीच आहे. रसकुद्यात आणखी दोन सराया उघडल्या आहेत यावर्षी. जगुनीचा एकंदरच हेतू काय आहे कोण जाणे ! एका दोघांना त्यानेच दुसऱ्या सराईत पोचवलं.

त्या दिवशी भल्या पहाटे ओंजळभर लाह्या फुटाणे घेऊन, वल्हं खांद्यावर टाकून

जेव्हा तो निघाला तेव्हा तापाने लटलट कापणारी सरदेई त्याला म्हणाली,

" बघ जगुनि, मला ताप भरला आहे. उतारू येऊन येऊन परततात. बाहुडयाची गर्दी आहे ही. आज कुठं जाऊ नकोस. "

घटकाभरात परत येतो सांगून जगुनि निघून गेला. त्या दिवशी संध्याकाळपासून पाऊस पडायला लागलाय. दुसरे दिवशीही वादळ न् पाऊस......थांबायचं नाव म्हणून घेत नव्हते.

त्याच्या दुसऱ्या दिवशी सरदेईचा निर्जळी उपास. त्यामुळे तापातही तिला आंघोळ करावी लागली. अर्थात् ताप वाढलाच. ती अतिशय अशक्तही झाली होती. बाहेर पाऊस झडत होता. वारा वहात होता. काही यात्रेकरू तशा पावसातही सराईत मुक्काम करायला होते.

त्यांच्या बोलण्यावरून तिला समजलं की जगन्नाथ श्रीक्षेत्र सोडून अंतर्धान पावलेत. बलभद्राच्या रथावर एक भलं मोठं गरुडागत दिसणारं गिधाड येऊन बसलं होतं. त्याचे पंख सुपाएवढे होते व चोच एक हात लांब. अशा खूप गोष्टी तिने ऐकल्या. जवळच्याच खोलीत राहिलेले यात्रेकरू पावसात व अंधारात बसून गप्पागोष्टी करत असावेत. त्यांचे म्हणणे होते की हा पाऊस काही थांबणार नाही. काळोखही कमी होणार नाही. समुद्र व चिलिका एक होऊन आता जलप्रलय होणार. जगन्नाथ पृथ्वीवर होते तंवर पृथ्वी राहिली. आता तेच धरती सोडून गेलेत तेव्हा कलियुगाचा शेवट आलाच. नाहीतर अजून पाऊस कसा थांबत नाही ?

तापात बडबड करीत सरदेई मधून मधून बेशुद्ध व्हायची. सकाळी सगळे यात्रेकरू निघून गेले. भल्या पहाटे पाऊस थोडा कमी झाला होता तेव्हा ते लगबगीने गेले.

कलियुगाचा अंत होण्याआधी आपापल्या प्रिय व्यक्तींना पाहण्याची त्यांना ओढ होती. पण सरदेईच्या हृदयाला एकच गोष्ट टोचत होती, जगन्नाथ श्रीक्षेत्र सोडन गेलेत. श्रीवत्स खंडाशालचे रत्नसिंहासन त्यागून कुठे गेलेत कुणास ठाऊक ?

किती घोर पापिणी असेल ती ? जगन्नाथ गुप्त होण्याआधी त्यांचे पावन मुखकमल काही ती पाहू शकली नाही. याच सराईतून कितीतरी यात्रेकरू आले न् गेले. सगळ्यांची सेवा तिनं केली. सगळे इथूनच पुरीला गेले पण ती नाही जाऊ शकली. जगन्नाथ पतितपावन झालेत. कितीतरी पाप्यांना, अधमांना त्यांनी दर्शन दिले. कितीतरी त्यांच्या पदकमलांना स्पर्श करून मोक्षपदी गेले; पण तिच्या नशीबातच नव्हतं. रथावरच्या श्रीमूर्तीला बघणाऱ्या सरदेईला गर्दीत कोण ओळखणार होतं ? कुणाला ठाऊक होतं की हीच ती कुलनाशिनी पापिष्ठा वालुगावची सरदेई ? मोंगल सैनिकाने

हिचेच शील भ्रष्ट केले आहे ? मोंगल सैनिकाची काळी छाया आठवताच ती घाबरी झाली. क्षीण स्वरात तिने हाक मारली,

" जगुनी ऽ ऽ. "

वाऱ्याच्या एका झोताने तिची हाक वाहून नेली. चिलिकेच्या कल्लोळात ती बुडून गेली.

पुन्हा ताप चढायला लागला वाटतं. तिने उर, गळा, कपाळ चाचपलं. शरीर फणफणत होतं. दूर क्षितिजरेषेपाशी ढग शिडं फुगलेल्या गलबतांसारखे भासत होते. हळूहळू ते काळे व्हायला लागले. आकाशात उडणारी बगळ्यांची माळ जुईच्या गजऱ्यासारखी वाटायला लागली.

सरदेईला अधिक बसवेना. लटपटत्या पायांनी ती आत गेली व अंथरूणावर पडली न् बेशुद्ध झाली. पुन्हा एकदा भूतकाळात जमा झालेली माणसं तिच्याभोवती घोंघावू लागली.

स्वप्नात पाहिलेले ते चेहरे अजून तिला लक्षात आहेत. तेच पुन्हा तिच्या डोळ्यासमोर आले. आंधळी, बहिरी सासू, शरीरावर सुरकुत्या पडून लोंबणारे मांस, वाखासारखे रुक्ष केस – काठीच्या आधाराने चालणारी तिची मूर्ती आली – त्याच अंधारात तिने ऐकले,

" सूनबाई, अग सरे, सुने " – बहुधा सासू तिला शोधत असावी. नेहमीसारखी शिव्यागाळी करत नव्हती. तिच्याजवळ उभी राहून प्रेमळ आवाजात म्हणत होती, " किती आनंदाने तुला सून म्हणून घरी आणली होती ग. एकदा व्याही म्हणाले होते की सरू तुमची लेक समजा, सून नाही. तशीच जपा तिला. काय ग बाळा, तुझी दशा दशा झाली या दुनियेत. सोन्यासारखं तुझं शरीर कोळसा होऊन पिचलं. मी तुला घेऊन जायला आलेय. चल, बाळा, माझ्याबरोबर चल. "

पहाटेच्या धुक्यासारखी ती कुठे अदृश्य झाली; आणि पतीचा चेहरा तिच्यासमोर आला. काळ्या पाषाणात कोरलासा दिसणारा. त्याला तिने नीट पाहिलेही नव्हते. पण आत्तांचे त्याचे डोळे आदर, स्नेह, प्रेमाने थबथबलेले नव्हते – पहिल्या रात्री जसे होते– आता त्यातून आग वर्षत होती. तो तिला दूर लोटत म्हणत होता, " दूर हो इथून. तुला जागा नाही इथे. तू जात गमावलीस. सराई उघडून लोकांना देह विकला आहेस. नाहीतर ही नीलमण्याची आंगठी कशी बोटात घातली असतीस ? "

तिन्हीसांजेच्या पातळ काळोखात ती आंगठी चापसू लागली पण मग तिला आठवलं की ती पेटीत ठेवली आहे.

सरू पुन्हा बेशुद्ध झाली. बेहोषीच्या अथांग सागरात बुडबुड्यासारखी पार डूबून बसली. कधी शुद्ध परतली तिला कळलं नाही.

तिनं सगळं पाहिलं ते स्वप्न की सत्य ते समजत नव्हतं तिला.

बाहेर वादळ प्रचंडरीत्या घोंघावत होतं. थांबण्याचं लक्षण नव्हतं. अचानक अंधारात चंद्रज्योती पाजळल्या गेल्या. बरीच लोकं एकमेकांशी बोलतात आहेतसे वाटले. पण कोण काय म्हणतं आहे ते कळेना. या इकडे चाच्यांचे अड्डेही आहेत. तेही लूटमार करून अशाच रीतीने कधी कधी सराईत येतात. असलेच कुणी आले असावेत असं वाटून तिने कानावर हात दाबून धरले व भीतीने ती तशीच लाकडागत पडून राहिली.

पण हे खरं होतं का ?

तिने जगुनीचा आवाजही ऐकला होता. तो बहुधा त्यांचा मुख्य झाला होता; म्हणत होता, " सांभाळून रे......ही समोर सराई आहे ना......अरे ए तिकडे नव्हे इकडे, त्या नाही या इकडच्या खोलीत. हां चला, बंद नाहीये आतून......"

पुष्कळ लोक होते. भली जड वस्तू उचलून आणत होते. त्यांच्या हातातल्या मशालींनी सगळं आसमंत उजळून उठलं होतं.

हे स्वप्न नक्कीच नव्हे. कानांनी ऐकलेली, डोळ्यांनी पाहिलेली गोष्ट आहे.

त्याचवेळी सर्वत्र एक अपूर्व सुगंध दरवळून राहिला होता.

सकाळच्या हवेतही तोच मंद मंद सुगंध भरून राहिला होता. तिला वाटले तिला भ्रम होणार–झालाय. स्वप्न व सत्य काही तिला वेगळे करता येईनात.

त्यातला एकजण म्हणत होता,

" इथं ठेवलं तर सगळं बेंड फुटेल. रात्रीच्या रात्रीच चिलिकेत नेणं भाग आहे."

हा स्वर तिला ओळखीचाही वाटला. पार विस्मृत भूमीत कुठंतरी तो निनादत होता. पण आठवण्याचा प्रयत्न करताच तिला घेरी यायला लागली. सगळीकडे अंधार झाला.

त्यानंतर – जगुनि म्हणत होता,

" अशा तुफानात चिलिकेत रस्ता कसा मिळणार ? थोड्या वेळाने पाऊस ओसरेल. पहाटतारा उगवताच निघू."

हे नक्कीच चाचे. भीतीने ती पुन्हा बेशुद्ध झाली. पण तिला अस्पष्टसे आठवत होते की कोणीतरी तिच्या जवळ आलं होतं...तिच्या कपाळाला ममतेनं स्पर्श केला होता... तोंडात पाणी घातलं होतं......किती तहान लागली होती तिला........पण ते स्वप्नच असेल कदाचित !

सकाळची शीतल हवा तापल्या कपाळाला प्रेमळ स्पर्श करीत होती.

आकाशातून ढग विरळ होत चालले होते. प्रभातकाळची सोनेरी किरणं फुलांसारखी पसरली होती. ती अंथरुणावर उठून बसली. आदल्या रात्री जणू तिच्या शरीराला झालेले सर्व श्रम, अपमान कुणीतरी नाहीसे केले होते. भिंतीच्या आधाराने ती उभी राहिली व डगमगणाऱ्या पावलांनी बाहेर सोप्यापर्यंत आली.

बाहेरच्या शीतल वाऱ्याच्या झुळुका व प्रकाश पाहून अनुभवून ती आश्चर्याने स्तब्ध झाली.

गेल्या रात्री तापाच्या बेशुद्धीत जो चंदन, कस्तुरी, फुलांचा वास तिला घेरून राहिला होता तोच हवेत होता.

एवढा आनंद, एवढा प्रकाश, एवढी पक्ष्यांची किलबिल, असे रोमांच सरदेईने आपल्या दु:खपूर्ण जीवनात कधी अनुभवले नव्हते. असा कंप कदाचित् एकदाच तिने अनुभवला असावा – पहिल्या रात्रीच्या अगदी निकटच्या क्षणात तिच्या पतीने चतुर्थीचा तेवणारा दिवा विझवला तेव्हा.

पदरात तोंड लपवलेली सरदेई म्हणाली होती, " चतुर्थी दिवा कशाला विझवता ?"

पण लाजेने भीतीने ती आपल्या आत थरथरली होती. आज तीच स्मृती पुन्हा पुन्हा तिच्या डोळ्यात साकळली. पण त्या आसूत वेदना नव्हती. विचित्र उत्साहाने तिचे तनमन पुलकित झाले होते.

आजची सकाळ किती शुभ आहे.

चार दिवस पाऊस झाल्यावर आकाश निरभ्र होते. चिलिकेच्या पिसाट जललहरी शांत झाल्या होत्या. आता तिथल्या लाटा विलासिनीच्या बाहूंप्रमाणे दिसत होत्या. सगळीकडे अथाह उल्लास भरून राहिला होता.

हे पक्षी कुठे गेले होते ? चिलिकेत व तंडाकिनारच्या भिजल्या वाळूवर एरा, सारस, चक्रवाक, बगळे वगैरे पक्ष्यांची जत्रा भरली होती. यायचे उडायचे. आनंद लुटताना ते जराही थांबत नव्हते.

सरदेईने आपल्या मलीन वस्त्रांकडे पाहिले. तापामुळे कितीतरी दिवसांत तिला आंघोळ नव्हती व या सर्व वातावरणात तिला स्वत:ला अपवित्रसे वाटत होते.

आत येऊन तिने पेटी उघडली.

त्यात काय नव्हते ? लहानपणची खेळणी, लग्नाच्या वेळची बोळकी, मग रणांगणाहून आलेली रक्तभरली पगडी, त्या अपरिचित घोडेस्वाराकडून दुधाच्या बदल्यात

मिळालेली अंगठी......आयुष्यात मिळालेले सुख:दुखाचे सगळे क्षण इथे तिने एकत्र करून ठेवले होते. जणू प्रथमच बघत असल्यागत ती त्यांना निरखू लागली.

एका चिंधीच्या टोकाशी बांधलेली अंगठी तिने काढली. बोटात घातली. पण अशक्तपणामुळे तिच्या बोटातून ती घळघळू लागली. नंतर तिने शोधून शोधून बसंती रंगाची लाल काठाची साडी काढली. लग्न होऊन आली तेव्हा माहेराहून आणली होती. तेव्हापासून ती पेटीतच पडून होती. कधी नेसायची वेळच आली नाही. तिनं ती जगुनीच्या बायकोसाठी लपवून ठेवली होती. पण आज नेसण्यासाठी म्हणून तिने ती बाहेर काढली. मग फणी आरसा घेऊन खोलीच्या मधोमध ती केस विंचरायला बसली. अशक्तपणामुळे व आतावरच्या श्रमामुळे तिचं डोकं भणभणत होतं. सगळं जिथल्या तिथं टाकून पडून रहावं अशी सारखी इच्छा शरीराला होत होती. पण मनात एक वेगळाच उत्साह भरून होता. पुन्हा त्या रुग्ण शय्येवर झोपायला मन घेईना.

पुष्कळ वेळ सरदेई केस विंचरत बसली होती. कंगवा भरभरून केस उतरत होते. याआधी स्वत:कडे तिने कधी निरखून पाहिलं नव्हतं. म्हणून नवीनच काही दृष्टीस पडल्यासारखी तन्मयतेने पहात होती. तिच्या गालावर कधी एकदा कुणी तिळाचं फूल गोंदलं होतं. ते आता तिच्या मलीन चेहऱ्यावर मृत चंद्रागत दिसत होतं. केस विंचरून, साडी घागर घेऊन सरदेई विहिरीकडे आंघोळीसाठी निघाली.

जलसारसांचा एक थवा समुद्राच्या बाजूने उडत आला व चिलिकेवर उतरला. सकाळी सकाळी हे पक्षी कुठून आले ? बालूगाव सोडल्यापासून सरदेईने हे पक्षी पाहिले नव्हते की त्यांचा कलरव ऐकला नव्हता. यात सारेच गायक होते, श्रोता एकही नव्हता.

सराईच्या समोर भिजल्या वाळूवर अनेक पावले उठली होती. समुद्रापासून सराईपर्यंत. तिथे ती एकमेकात मिसळली होती. आदल्या रात्री आलेल्यांची पावलं तर नसतील ही ? त्या गोष्टी आठवून ती शहारली.

आहा ! या पुष्पमाळा न् हे संपुट कुठून आलं इथं ? वाळूवर इकडे तिकडे कोमेजलेले शेवंतीचे, दवण्याचे हार पडले होते. नागचाफा व केतकीची पानंही पडली होती. चारी बाजूला दवण्याचा वास दरवळत होता. ही जगन्नाथाची आवडती फुलं ! इथं कशी आली ? न कळून ती खाली वाळूवर बसली व मोत्याप्रमाणे ती फुलं वेचू लागली.

काल रात्री या उजाड भागात कोण आला होता ? मागे फुलांचा सुगंध, प्रकाश, उत्साह सोडून गेला होता ? अभगिनी, पावसाळ्या रात्री असा कोण रूपरसवान् तुझ्या इथं आश्रय घ्यायला आला होता ? तू बघितलंही नाहीस.

तिचं मस्तक घेरू लागलं. डोक्यापासून पायापर्यंत ती कापू लागली. तिला जगुनीची आठवण आली. पाऊस सुरू व्हायच्या आधी तो गेला होता न् अजून परतला नव्हता. तिने हाका मारल्या,

" जगुनी रे, जगुनी."

तिच्या डोळ्यातून आसू गळत होते व खाली वाळूवर पडत होते.

सराईची दारं उघडीच टाकून आली होती सरदेई. आंघोळ आटोपून, बसंती साडी नेसून ती आली. सोप्याच्या पायऱ्या चढता येईनात तिला. अचानक तिच्या पायातलं बळच गेलं. तशीच लटपटत चढणारी सरदेई उन्मळल्या केळीप्रमाणे खाली पडली. भिजल्या केसांनी तिचं मुख अर्धवट झाकलं गेलं होतं व पावसाचे थेंब शिवरलेल्या फुलागत दिसत होते.

चंदन, कस्तुरी व फुलांच्या सुवासानं घर भरून गेलं होतं. इकडेतिकडे दवणा, शेवंती, मालती, जाईजुईच्या माळा विखुरल्या होत्या. केवडयाची पानं, नागचाफ्याच्या पाकळ्या पडल्या होता. कुठूनतरी एक भुंगा येऊन तिच्या मुखाभोवती घोटाळू लागला. पण त्याला वारण्याची शक्ती तिच्या बाहूंत नव्हती. पदर सरकला होता पण तोही नीट करवत नव्हता. घराच्या भिंतीवर हळद, तांदुळाची पिठी व काजळ वापरून कधी-तरी तिने एकदा जगन्नाथाचे चित्र रंगवले होते. तिच्या डोळ्यांसमोर तेच उजळून उठलं होतं. तिला तापाच्या बेशुद्धीत ऐकलेले शब्द आठवले, ' जगन्नाथ अंतर्धान पावलेत ', ' शून्यात विलीन झालेत.'

पण सरूला वाटलं की ते सगळं खोटं असलं पाहिजे. यात्रेकरूंनी घडवलेल्या कपोल-कल्पित कहाण्या. महाशून्य काळाशी मीलन होऊन ते महापूर्ण झालेत. जगन्नाथाच्या डोळ्यात ती महाशून्यता नव्हती. वल्लभासारखी प्रेमळ दृष्टी होती ती. सरदेईच्या उघड्या छातीवर व केसानी आच्छादलेल्या मुखमंडलावर ती दृष्टी स्थिर झाली होती. सरदेईचे ओठ कापत होते......हे कठोर, निर्दयी कसं चकित केलंत अचानक येऊन... निघूनही गेलात......मागे मात्र अथांग विरह व आसू ठेवून जाता !

तिची शुद्ध हरपत होती. चारी बाजूंनी एक धुकं तिला वेढत होतं. कुणाच्यातरी गाढ आलिंगनात तिचे शरीर दुखत होतं......श्वास हळू हळू रुद्ध होत होता.......... मृत्यू समीप आला होता.

सरदेईला आणखी बघवेना. तिचे डोळे मिटले. असह्य वेदनेने तिच्या डोळ्यात जे आसू उसळले होते तेच नंतर रात्रीच्या तुहिन कणांसारखे हलके हलके वाहू लागले.

## 2

नरकुल गवत व बोरूंचे बेटा. गुरुबाई द्वीप......बाणपूरचा शेवटचा राजा हरिसेवक मानसिंह याने, अठराव्या शतकाच्या शेवटी खोर्धा राजाने नीलाद्रिप्रसाद गडातून हाकलल्या कारणाने इथे राजधानी वसवली होती. तोवरी हे निर्जनच होते.

अनेक तऱ्हेचे बांबू, गवत, पाणकणसे, बोरू इत्यादी रानझुडुपांनी वेढलेले हे एक दुर्गम बेट होते. माणिकपाटण्याच्या खाडीतून पालूर व गंजा बंदरांना जाणाऱ्या गलबतांना लुटणाऱ्या चाच्यांना एक हे बेट ठाऊक होतं; दुसरं चिलिकेच्या एरा पक्ष्यांना !

हेच गुरुवाई आज तकीखाँच्या उपद्रवामुळे जगन्नाथाचं आश्रयस्थान झालं आहे. अरण्यातल्या झाडांच्या शेंड्यावर प्रभातीची कोवळी किरणं खेळू लागली आहेत. तरी अंतर्भागात गेल्या रात्रीच्या पावसाचे अवशेष व अंधार होता. चिलिकेचे पक्षी सूर्याला अभिवादन करत उडत होते, अरण्य निनादूत सोडत होते. त्यांच्या पंखांना विश्रांती नव्हती.

सातपडा, बलभद्रपुराहून चिलिकेचा एक जलप्रवाह गहन अरण्याला भेदून द्वीपाचे दोन भाग करत वहात होता; पण सहसा तो कुणाला माहीत नव्हता; त्याचे दोन्ही किनारे बोरू बांबूंनी इतके काही झाकले होते की बाहेरून या अरण्यपथाचा पत्ताही लागला नसता. याच प्रवाहातून पुढे अरण्यात जाऊन एक वाळूचा भाग दिसला असता. त्यावर एक विराट् वटवृक्ष अनंतकाळापासून आपल्या शाखा पारंब्या विस्तारून बसला होता. त्याच्याच खाली एक शिलाखंड ठेवून वेदिका बनवली होती. जगन्नाथावर तकीखाँची वक्रदृष्टी वळली आहे ही बातमी ऐकून खूप शोधांती रामचंद्रदेवांनी त्याच्यासाठी हे आश्रयस्थान निवडले. जगन्नाथाचे काही विश्वासू सेवक, काही रामचंद्राचे अनुयायी व जर्गुनि यांच्याशिवाय कुणालाही या जागेचा पत्ता नव्हता.

तांबडं फुटण्याआधीच जगन्नाथ त्या वेदिकेवर स्थानापन्न झाले. रामचंद्रदेव, छोटे उपाध्याय विष्णु महापात्र, राजगुरू, लक्ष्मी परमगुरू व दइत यांच्याखेरीज बाकी सगळे परतले होते. वेदिकेखाली अजून अखंड प्रदीपाची प्रतिष्ठापना नव्हती झाली. रात्री झाडाच्या एका पारंबीला तो बांधून ठेवला होता तिथेच तेवत होता. पण आता दिवसाच्या उजेडात तो निष्प्रभ वाटत होता.

त्या गहनारण्यात एक पक्षी कुठूनसा साद घालत होता. वडाच्या फांदीवर बसलेला एक कावळा मधून मधून काव काव करून त्याला प्रत्युत्तर देत होता.

रामचंद्रदेवांनी आपल्या भाळावर आलेले केस बाजूला सारून पाहिले – असा निर्जन एकांत त्यांनी कधी अनुभवला नव्हता.

आतापर्यंत स्नान, वस्त्राभूषण, काकडारती होऊन प्रभातपूजेला आरंभ झाला असता. पण इथे आरतीसाठी सुवर्णाची कापूरारती, तुपाचे दिवे वगैरे काहीच नव्हते. वस्त्रासाठी दुसरे उपरणे, अंगरखा काही नव्हते. रोजच्या गरजेच्या वस्तू एका पेटीत व्यवस्थेशीर बंद केल्या होत्या; पण ती ज्या नावेत होती ती या पावसात माणिकपाटणाच्या नजीकच्या खाडीत बुडाली. त्यातून ओढून आणलेली प्रभूची वस्त्रे चिखलाने बरबटलेली होती. श्रीमाळ व इतर आभूषणे तुटून विखरून गेली होती. त्यामुळे प्रभूचे बाहू मोकळे दिसत होते. आता ती मळलेली वस्त्रे कशी काढायची? दइता मोठ्या पेचात पडले होते. किंकर्तव्यविमूढ होऊन एकमेकांच्या तोंडाकडे बघत होते.

वेदिकेजवळच वाळूवर बसून रामचंद्रदेव स्तंभित दृष्टीने जगन्नाथाकडे पहात होते. मनात म्हणत होते की उडिया जमातीची अशीच अवस्था झाली आहे. प्राण जाण्यापेक्षा फरफटच जास्त झाली आहे. या जगन्नाथासारखीच तीही आज सगळं काही गमावून बसलेली आहे. उरलं आहे फक्त स्वप्न! चिखलाने बरबटलेल्या जगन्नाथाच्या मूर्तीकडे रामचंद्रदेव एकटक बघत होते.

गेल्या काही दिवसांपासूनचे परिश्रम, उत्कंठा, भीती आणि झोप वगैरे शरीरव्यापातला अनियमितपणा यामुळे एरवी कोवळ्या पालवीसारखे मृदु असणारे त्यांचे शरीर पावसाने झोडपलेल्या वेलीगत झाले होते. वाढलेले दाढीचे खुंट, रुक्ष केस व म्लान आरक्त डोळे यांमुळे ते एकाद्या कापालिकासारखे दिसत होते.

आज जगन्नाथदेखील महा–भैरव झालाय.

उत्कलचा मानबिंदू, जगत्पती जगन्नाथ रत्नजडित सिंहासनाचा त्याग करून या वनारण्यात आले आहेत हा विचार रामचंद्रदेवांच्या मनाला व्यथित करत होता. त्यांच्यापासून काही अंतरावर विष्णु महापात्र थकून बसले होते व बसल्या बसल्या झोपी गेले होते. दोन्ही दइताही पुतळ्यांसारखे न ययौ न तस्थौ अशा अवस्थेत वेदिकेपाशी उभे होते.

देवाची पूजा आरती कशी व्हायची या चिंतेत ते पडले होते.

अशाच चिंतेत लक्ष्मी परमगुरूंनी जगन्नाथासमोर साष्टांग प्रणिपात घातला व तशाच स्थितीत मोठ्याने स्तोत्रपाठ सुरू केला :

"नील जीमूत संकाश: पद्मपत्रायतेक्षण: ।  
शोणाधर, धर:श्रीमान् भक्तानामभयङ्कर: ।  
बलभद्रस्तथा सप्तफणो विकटमस्तक: ।  
कुन्देन्दुशंखधवल: प्रकाशोऽम्बुजलोचन: ।  
गुप्त पाद कराम्बोज समुत्तोलित सद्भुज: ।  
भक्तानामवनायेव तथा भद्रापि भद्रदा."

पण रामचंद्रदेवांच्या मनात शंकाकुशंका फार नव्हत्या; होता विस्मय !

कोणत्या गहन रहस्याचे रूप म्हणजे हा जगन्नाथ आहे ? सृष्टीच्या कोणत्या सुरुवातीला, प्रळयकाळाच्या सर्वनाशाचा प्रचंड खेळ चालू असता कुठून हा लाकडी देव वहात वहात आला ?

उपकथेचा यवन रक्तबाहू, ऐतिहासिक काळातला महापदनंद आदि कित्येकांनी त्याचे रहस्य जाणायच्या हेतूने आक्रमणे केली.

कधी हा अरण्यात पळून गेला तर कधी भूगर्भात लपून बसला तर कधी सागर-लहरीत आश्रय घेतला. पण याच्या रूपावरचा पडदा दूर झाला नाही. अविनाशी आत्माच जणू मूर्त रूपात अवतरला आहे. उद्धट मानवाचा स्पर्श तिथे कसा होईल ?

बलशालीच्या अत्याचारांमुळे मानवाचे शरीर नष्ट होते पण आत्मा अविनाशीच असतो; म्हणून तर मृत्यूचे जहरी फूत्कार वारंवार सोसूनही जीवनाचा दीप उजळतोच आहे ना ? विध्वंसाच्या प्रमत्त तांडवलीलेत सृष्टीच्या जीवन प्रेरणांचा स्रोत नित्य वहात असतोच. जगन्नाथ तिचे मूर्त रूप आहेत. महामुक्ती, महापूर्णता आहे. त्या पूर्णतेची अनिर्वचनीय अनादि अनंत भावमूर्ती !

उडिया जातीचा मानबिंदू म्हणजे जगन्नाथ ! तिचा इष्टदेव, सर्व इडापिडा टाळणारा; मांगल्य, अमांगल्य सर्वांचा ' जय जगन्नाथ ' आहे

आपल्या तुच्छ गर्वाचं रक्षण करण्यासाठी जगन्नाथाला श्रीवत्स खंडाशालच्या रत्नखचित सिंहासनावरून उचलून चिलिकेतल्या या बोरूंच्या बेटात कोळ्यांच्या नावेतून आणून ठेवल्याबद्दल रामचंद्रदेव मनातल्या मनात पश्चात्ताप करत होते.

अमीनचंदांनी श्रीमंदिरावर कब्जा केला असता व पुरुषोत्तमक्षेत्रातल्या समस्त अधिकारांपासून आपण वंचित झालो असतो काय मोठंसं बिघडणार होतं ? हेच होऊ नये म्हणून एखाद्या खेळण्यासारखं जगन्नाथाला उचलून आणणं म्हणजे पापकर्म नाही तर काय ? ज्याप्रकारे फसवणूक करून छोट्या उपाध्यायांच्या साहाय्याने जगन्नाथाला पतितपावन बनवले होते त्याचे स्मरण होऊन रामचंद्रदेव अधिकच दु:खीकष्टी होत होते.

पण जगन्नाथ तर उडिया जातीच्या अपराजिततेचे चिन्ह आहे ना !

कस्पटासमान असलेले स्वत:चे स्वातंत्र्य व निरामय जीवन यांच्या क्षुद्र मोहाने मूठभर मानवद्रोह्यांच्या हातात जगन्नाथाला ते कसे सोपवणार होते ?

पण ते स्वत: कोण आहेत ?

धर्मद्रोही हाफिज कादर आहेत की जगन्नाथाचे राजसेवक रामचंद्रदेव ?

कदाचित् इतिहासात त्यांचे नाव एक दुर्बल मनाचा जगन्नाथद्रोही राजा म्हणून राहील. पण इतिहासाच्या वरती जी कुणी सत्ता असेल तीच फक्त त्यांच्या मनातला संघर्ष, त्यांचा मनस्ताप जाणू शकेल.

दइता आपसात चर्चा करत होते. चिखलाने बरबटलेली वस्त्रे काढली तर मग देवाला घालायचं काय ? पण ती वस्त्रे काढणे तर भाग होते. त्यांना धुवून वाळवणेही भाग होते.

एक जण म्हणाला,

" वस्त्र वाळेतो प्रभू काय विवस्त्र राहणार ?"

लक्ष्मी परमगुरू मोठ्याने हसले. म्हणाले, " महापात्रजी, अहो समुद्र ज्याचे वस्त्र, वारा ज्याचे उत्तरीय, आकाश ज्याचा मुकुट त्याच्यासाठी विचारात काय पडलात ?"

मग एक जण वर चढून जगन्नाथाची वस्त्रे उतरवून खालच्याला देऊ लागला.

वस्त्रहीन मूर्ती आता विश्वाच्या नग्न आत्म्याप्रमाणे दिसू लागली. ते अपूर्व दर्शन घेऊन सेवकही गंभीर झाले व त्यांनी साष्टांग घातला. यानंतर काय करायचे ?...... कुणालाच सुचेना ! हे पितांबरधारी नीलजीमूत रसराज जगन्नाथ नव्हेत........नग्न महाभैरव आहेत. यानंतर बरेच विधी असतात. पाणके तीर्थ आणतात. स्वर्णपात्र व दंतमंजन आणतात. अशाच तऱ्हेने पाट, आरसा, आवळ्या चंदनाची उटी, कापूर वगैरे घेऊन सेवेकरी सेवेसाठी येतात. प्रत्येक विधी व त्यासाठी लागणाऱ्या सामग्रीची योग्य व्यवस्था करण्यासाठी वेगळे सेवक आहेत.

इथे तसे काही नाही. दंतमंजन, मुखप्रक्षाळण तरी होईल का ?

जगुनि दातवण आणि काही फळं आणायला गेला होता. त्यानंतर गोपाळ भोग होईल. त्यावर सेवक वर्गात चर्चा चालू होती.

त्या आवरणहीन नग्न जगन्नाथाला पाहून रामचंद्रदेव विचार करत होते भाळावरचा तिलक कुठे आहे ? कुठे आहे ती लोण्यासारखी अंगकांती ? रक्ताधरोष्ठावरचे ते मंद हसू कुठे गेले ?

समस्त मानवजातीच्या एकाकार आत्म्याप्रमाणे जगन्नाथ सर्व काही त्यागून या दुर्गम वनात सत्याचा निष्पापपणा पटवण्यासाठी संग्राम मांडून बसलेत.

हेही काय त्याच अभिशप्त मानवाचेच रूप आहे की ज्याला संघर्षशील जीवनात मोक्षाचा मार्ग शोधण्यासाठी वेळ नाही; त्या काळोख्या रात्रीला प्रभात नाही, त्या वाटेला कुठं शेवटच नाही ?

पण हे महाबाहू ! तुम्ही तर वाटचुकल्या जीवांना मार्ग दाखवता. भवसागरात गटांगळ्या खाणाऱ्यांना वाचवता. या जीवनरथाचे सारथ्य तुम्हीच तर करता.

मानवाचे जीवन जर व्यर्थ असेल तर तुम्ही अधिकच व्यर्थ बनता. ते जर वंचित असेल तर तुम्ही जास्त वंचित राहता.

रामचंद्रदेवांच्या डोळ्यात आसवांनी दाटी केली व त्यांच्या गालावरून ते ओघळू लागले.

आसपासच्या वृक्षराजीत खजबजाट झाल्याने सगळ्यांनीच चमकून तिकडं पाहिलं. जगुनि येत होता, हनुमंतासारखा. त्याच्या खांद्यावर जांभळाने लगडलेली एक फांदी होती व हातात काही फुलं होती. उत्साहाने निथळत होता जसा तो. विस्कटलेल्या केसांनी कपाळ व डोळे काहीसे झाकले होते.

जांभळाची फांदी खाली ठेवत तो म्हणाला, "याशिवाय जंगलात आणखी काही नाही मिळालं."

पावसाने जांभळाची फळं स्वच्छ झाली होती. याचाच आता 'गोपाळ वल्लभ' भोग होईल. इतकंच काय, प्रभातपूजा, मध्यान्हभोग, बडसिहार अन् 'छपन्न पउटि' भोगही यानेच सिद्ध व्हायचा.

दंतमार्जन व स्नान झाले होते व सेवक पानावर जांभळं ठेवून पूजेची तयारी करत होते. पंचोपचाराने नैवेद्य सिद्ध व्हायच्या अगोदर एक सेवक जमिनीवर जलसिंचन करत होता.

रामचंद्रदेव वेदिकेच्या फार जवळ आले होते का ?

रथावर छेरापहंरा व इतर राजविधी करणं वेगळी गोष्ट आहे. पण पूजेच्या वेळी देवमूर्तीला त्यांचा विटाळ चालणार नाही, ते यवन आहेत; शिवाय अजून प्रायश्चित्तही घेतलं नाही.

एक सेवक म्हणाला, "आता नैवेद्य दाखवायचा आहे. महाराज, आपण जरा पलीकडे सरावं."

अंगावर सपकन् छडी बसावी तसे रामचंद्रदेव मागे हटले. रुसलेल्या मुलाप्रमाणे ते मनातल्या मनात म्हणू लागले,

"हे स्वप्नज, जेव्हा तुम्ही जवळ भासता तेव्हा दूर दूर असता. पण स्वत:च्या इच्छेने जेव्हा तुम्ही निकट येता तेव्हा ओंजळ रितीच राहते... ...तुमची पूजा आराधना अश्रूंनीच होते."

लक्ष्मी परमगुरू अरण्य निनादणारा मंत्रपाठ करत होते,

"ॐ मधुवाता ऋतायते, मधु क्षरंति सिंधव:
माध्वन संतौषधि मधुनक्तं मृतोऽसखौ
मधुमानो वनस्पते मधुमान पार्थिवो राज:
मधु द्विरोष्टिनो पिता माध्वेर्गावौ भवंतु न:
ॐ मधु, मधु, मधु !"

काही का असेना, जगन्नाथ इथे काही काळपर्यंत सुरक्षित राहू शकेल. मालुदचा सेनापती असो की अमीनचंद असो, कुणालाही या जागेचा सहजासहजी पत्ता लागणे शक्य नाही.

पण यानंतर काय ? कुठे जाणार ?

तिथून उठून रामचंद्रदेव चिलिकेकडे अनिमिष नेत्रांनी पहात तोच विचार करत होते. किनाऱ्यावरच्या बोरूच्या बेटाला लागून असलेल्या चिलिकेच्या लाटांवर नाव नाचत होती. एक भलं थोरलं ओझं उतरलं होतं पण तरीही हलके झाल्याचा आनंद वाटत नव्हता. ते मनातल्या मनात थकत होते.

पण विश्रांती कुठे आहे ? कुठे आहे मार्ग ?

बोरूच्या बेटाजवळ चिलिका उसळत होती राहून राहून. त्यांच्या मागोमाग जगुनि चालला होता. पण त्यांनी लक्ष नाही दिलं.

त्याने विचारलं, "कुठे चाललात ?"

पावसाने भिजल्या बोरूच्या बेटाकडे व अरण्याकडे पहात रामचंद्रदेव विचार करत होते, इथे प्रगाढ शांतता आहे खरी......पण इथे ते अपंक्त आहेत......त्यांना इथे जागा नाही. समोर अंतहीन लढा आहे.

किनाऱ्यावरून एक एरा पक्षी दमलेले पंख झाडत उडून गेला.

नावेत बसून ते निघाले. पण कुठे ? ते ठाऊक नव्हते त्यांचे त्यांनाच !

जगुनि बोरूच्या किनाऱ्याकिनाऱ्याने नाव वल्हवीत विचारत होता,

"कुठे जायचं ? कोणत्या दिशेला ?"

समोर अथांग धूसर चिलिकेची विस्तीर्ण जलराशी, वर निर्मेघ आकाश......एक निळे वाळवंट होते......

# विशिष्ट शब्दांचे अर्थ

अमला बेकि : मंदिराचा एक विशिष्ट भाग व सजावट.

अणसर पीठ : जगन्नाथाचे विश्रांती स्थान.

एरा : विशिष्ट पक्षी. हे समुद्रकाठी आढळतात.

ओउ : रुंद फोडी असलेले एक प्रकारचे आंबट फळ.

अंक : अब्द.

कुडुआ : जगन्नाथाचा महाप्रासाद ज्यात असतो ते मातीचे भांडे.

काहाण : विशिष्ट नाणे – एक आणा किमतीचे.

कालसी : विशिष्ट देवी.

गोटिपुअ : एक प्रकारचे नृत्य. स्त्रीवेषधारी तरुण नर्तक.

गोप–पुडरीक साडी : खोर्धा राजाच्या राज्यभिषेकाच्या वेळी जगन्नाथाकडून मान्यता म्हणून मिळालेले पगडीचे वस्त्र.

चार : रथावर चढण्यासाठी लावलेली शिडी.

चिता : देवतांच्या कपाळावर लावण्यात येणारा कुंकुम तिलक (विशिष्ट आभूषण)

चर्या गीतिका : बौद्ध धर्माच्या (सहज यान) आचरण विधीविषयी ८४ सिद्धाचार्यांनी लिहिलेले काव्य.

छेरा पहरा : रथयात्रेच्या वेळी राजा रथांवर चंदन शिंपडून सोन्याच्या केरसुणीने केर काढण्याचा जो विधी करतो तो.

छामु : राजाप्रती सन्मानसूचक संबोधन.

छाटिआ : राजा चालला असता वेत हलवून समोरची गर्दी बाजूला करणारा कर्मचारी.

छपन पउटी : जगन्नाथ मंदिरात दररोज लावण्यात येणाऱ्या अन्न महाप्रसादाचे परिमाण. सुमारे छप्पन्न शे शेर.

जेनामणि : युवराज.

टाहिआ : तिन्ही देवमूर्तींसाठी विभिन्न फुलांनी बनवलेले विराट मुकुट.

टेंटेइआ : टेंटा पक्षी.

धोया मुलक : महानदीचा तिकोनी फाटयातील प्रदेश आणि दरवर्षी पुराच्या तडाख्यात सापडणारा त्यालगतचा इलाखा.

निमक भाहाल : समुद्रापासून मीठ तयार करण्यात येणारा विभाग. मिठापासून उत्पन्न मिळवून देणारा प्रदेश.

नरेंद्र : पुरीतील एक सरोवर. नरेंद्र पुष्कारिणी.

पहंडी : मंदिरापासून रथापर्यंतची देवमूर्तीची यात्रा.

पाइक : वंशपरंपरेने मिळालेली जमीन व जहागीर घेऊन राहणारे सैनिक.

पाटजोड : विशिष्ट वस्त्र.

पाताली : पाताळातील.

पंचक : कार्तिकचे अखेरचे पाच दिवस.

पांजिआ महान्ति : पंचाग बनविणारे. हिशेब ठेवणारा कर्मचारी.

पहुड : शयन.

पाहाडा : नैवद्य व अन्य देवस्थानांवर घातले जाणारे गालीचे.

बाइस पावच्छ : जगन्नाथ मंदिराच्या चारी प्रवेशद्वारांशी असलेल्या बावीस पायऱ्या. ही संख्या आध्यात्मिकतेचे प्रतीक आहे.

बडदांड : जगन्नाथ मंदिरापासून माउसी मंदिरापर्यंतचा विस्तृत मार्ग. याच मार्गावरून रथयात्रा जाते.

बेंग बाइद : खेळण्यातील एक वाद्य. यावर बेडकाची कातडी लावलेली असते.

बउल : माहेरच्या बालमैत्रिणीसाठी आदरसूचक आपुलकीयुक्त संबोधन.

भरण : एक माप.

मादलापांजि : जगन्नाथमंदिर, गजपति राजा आणि तत्कालीन सामाजिक स्थिती यांची अकराव्या शतकापासून केलेली नोंद व विवरण. मादल (मर्दल) च्या आकारात बांधल्याने याला मादलापांजि म्हणतात.

मुक्ति मंडप : जगन्नाथ मंदिरात विशिष्ट दिग्गज विद्वानांचे सभास्थान. येथे न्यायनिवाडया बरोबरच मंदिरातील विधी व व्यवस्थेवर नियंत्रण ठेवतात.

मलांगी : कित्येक नावा जोडून बनवलेला तराफा.

माजणा मंडप : स्नान मंडप.

विश्वाबसु : शबर भक्त. श्री जगन्नाथ श्रीक्षेत्र पुरीला येण्यापूर्वी शबरी नारायण म्हणून त्यांची पूजा करणारा भक्त.

शरधा–बाली : श्री जगन्नाथाच्या कृपेने पावन झालेली बडदांड मार्गावरची धूळ.

शासन : राजाने ब्राह्मणांना दान दिलेली गावं.

श्रीनवर : राजप्रासाद.

श्रिया : लोककथेतील एक हरिजन स्त्री. ती लक्ष्मीची परमभक्त होती.

मुनिआं (यां) : भाद्रपद संक्रांत. या दिवशी पुरी गजपति महाराजांच्या संपत्तीची मोजदाद होते.

सान परीछा : श्री मंदिराचे उपमुख्य संचालक. छोटे उपाध्याय.

Printed at Tarang Printers, Delhi